# काळांतील निवडक निबंध

भाग सातवा

शिवराम महादेव परांजपे



प्रस्तावना लेखक

शि. ल. करंदीकर



पुनर्मुद्रण २७ सप्टेंबर १९४६



किंमत

कागदी बांधणी ४ रुपये ] [ कापडी बांधणी ४॥ रुपये

प्रकाशक:

**यशवंत गोपाळ जोशी,**

१२३/१५ सदाशिव, पुणें २.





मुद्रक :—

**न. शं. कुलकर्णी,**
टीचर्स प्रिंटिंग प्रेस,
७७ शनवार, पुणें २.
१ ते ११ फार्म

**व्यंकटेश राघवेंद्र शिंगरे**
हिंदुराष्ट्र मुद्रणालय,
१४०८, कसबा, पुणें २.
१२ ते १६ फार्म.





# अनुक्रमणिका

एकंदर चालू महागतेमुळें काळांतील निवडक निबंधाचीं पुस्तकें जितक्या कमी किंमतीत द्यावयाचीं माझी इच्छा होती तितकी देतां आली नाहींत या करितां—काळांतील निवडक निबंधाचे पहिले भागांत एक सवलतीचें कुपन टाकलें आहे. सवलतीची समग्र माहितीही त्याच खंडांत दिली आहे. ग्राहकांनीं अवश्य वाटल्यास त्याचा फायदा घ्यावा.

व्यवस्थापकः—य. गो. जोशी, प्रकाशन सदाशिव पुणें.

# प्रस्तावना

देशभक्त प्राध्यापक शिवराम महादेव अर्थात् अण्णासाहेब परांजपे हे आपली इहलोकची यात्रा संपवून शुक्रवार दिनांक २७ सप्टेंबर १९२९ रोजीं परलोकवासी झाले. त्यावेळीं त्यांच्या वयाला पासष्ट वर्षें पुरीं होऊन गेलीं होतीं. या पासष्ट वर्षांपैकीं निदान पंचेचाळीस वर्षें तरी प्राध्यापक परांजपे यांचे चित्त एकाच विचाराभोंवतीं व कल्पनेभोंवतीं विहार करीत होतें. आपला देश पारतंत्र्यांत खितपत पडलेला आहे, या दुरवस्थेमुळें देशांतील सर्व कर्तृत्व मातीमोल ठरत आहे आणि निर्भेळ व संपूर्ण स्वातंत्र्य मिळाल्याखेरीज आपल्या देशाला व देशबांधवांना तरणोपाय नाहीं हा स्वतःच्या बुद्धीला पटलेला विचार वाणीनें व लेखणीनें महाराष्ट्रांतल्या तरुण अंतःकरणांवर बिंबविण्यांतच प्राध्यापक परांजपे यांनीं धन्यता मानिली; आणि, या विचाराचा फैलाव करण्याचें प्रायश्चित्त म्हणून परकीय सरकारनें त्यांच्यावर जो देहदंड लादला तो त्यांनीं अत्यंत श्रेष्ठ अशा उदात्तपणानें व कर्तव्यनिष्ठेनें भोगला.

चाळीसपंचेचाळीस वर्षेंपर्यंत ज्या पुरुषाचा आत्मा एकाच विचारांत गुंतून राहिला होता व या दीर्घकालांत ज्यानें आपल्या लेखणीचा, वाणीचा, कल्पनेचा व स्फूर्तीचा उपयोग केवळ त्या एकाच विचाराच्या प्रसारासाठीं व प्रचारासाठीं केला तो स्वातंत्र्यभक्त परलोकांतही कोणत्या तरी श्रेष्ठ पदावर आरूढ झाला असेल, यांत शंका नाहीं; पण, ज्यांच्या इहलोकच्या उदात्त आकांक्षा त्यांच्या आयुर्मर्यादेंत सफल होऊं शकल्या नाहींत असे आत्मे आपल्याला लाभलेल्या पारलौकिक सुखांत संतोष मानून, सुखासीन स्थितींत नांदत असतील, असें मला तरी वाटत नाहीं; "क्षीणे पुण्ये मर्त्यलोकं विशन्ति" हा न्याय लागू करून अशा थोर आत्म्यांची अवहेलना कर-

ण्याला कोणीच समंजस मनुष्य प्रवृत्त होणार नाहीं! अशा आत्म्यांना त्यांचे परलोकांतलें उन्नत स्थान कायमचेंच लाभलेलें असतें, असेंच समजणे जास्त सयुक्तिक होय; पण, या उन्नत स्थानावरून केव्हांतरी दूर सरून हे आत्मे पृथ्वीतलावर भ्रमण करीत नसतीलच आणि आपल्या अतृप्त राहिलेल्या वासना सफल करण्यासाठीं पृथ्वीतलावर कोणकोणते उद्योग चाललेले आहेत याचें परीक्षण ते करीत नसतीलच, असेंहि मानण्याचें कारण नाहीं.

१९२९ च्या सप्टेंबर महिन्याच्या शेवटीं पार्थिव शरीरांतून मुक्त झालेला प्राध्यापक शिवरामपंत परांजपे यांचा आत्मा गेल्या १६–१७ वर्षांच्या अवधींत अनेक वेळां या पृथ्वीतलावर–विशेषतः या हिंदुस्थान देशावर, आणि त्याहूनहि विशेषतः या महाराष्ट्र देशावर–संचार करून गेलाच असला पाहिजे. स्वातंत्र्याच्या नांवानें सुरू झालेल्या १९३० व १९३२ सालच्या चळवळी आपला देश स्वतंत्र करतात कीं काय या उत्सुकतेच्या आशेनें प्रेरित झालेला हा आत्मा त्या काळांत प्रत्यक्ष वावरतांना कोणाला दिसला नसला तरी, तो त्या काळांत अदृश्य व सूक्ष्म अशा रूपानें पुण्यांत व महाराष्ट्रांत निःसंशय संचरला असला पाहिजे. १९४२ सालीं महाराष्ट्रांत संचरणाऱ्या या तेजस्वी आत्म्याला 'चले जाव' ही उघड घोषणा कदाचित् रुचली नसेल–अशा उघड बोलण्यानें येथून निघून जाण्याइतका इंग्रज साधासुधा नाहीं, त्याला घालविण्यासाठीं गुप्त कट केले पाहिजेत, आधुनिक शस्त्रास्त्रें वापरलीं पाहिजेत, असें मत जन्मभर आग्रहानें प्रतिपादणाऱ्या या आत्म्याला इंग्रजांना निघून जाण्याची नोटीस देण्याची कल्पना कशीशीच वाटली असेल–पण, या नोटिशीनंतर–महायुद्धाच्या ऐन धुमश्चक्रींत ब्रिटिश साम्राज्य सांपडलें असतांना–देशांतील साहसी व त्यागी तरुणांनीं जो क्रांतिकारक लढा केला तो पहात असतांना या आत्म्याची दृष्टि निश्चितपणें निवली असेल. या क्रांतिकारक उठावणीचें पर्यवसान सफलतेच्या दृष्टीनें पुरेसें समाधानकारक ठरलें नाहीं, या क्रांतिकारक उठावणीचाच एक भाग म्हणून सुभाषबाबूंनीं उभारलेल्या भारताच्या राष्ट्रीय सैन्यालाहि अखेरीस नामोहरम व्हावें लागलें आणि खुद्द सुभाषबाबूंना आपल्या शत्रूंच्या हातीं पडण्याची नामुष्की टाळण्यासाठीं मरणाला मिठी मारावी लागली–या सर्व घटना पहात असतांना या आत्म्याला सुखदुःखाचे व हर्षामर्षाचे अनेक

अनुभव आले असतील ! अखेरीस ही उठावणी यशस्वी झाली नसली तरी या उठावणीच्या रूपानें देशाचें पाऊल योग्य आणि अचूक अशा मार्गाकडे वळलें या विचारानें या आत्म्याला परमावधीचें समाधानहि वाटलें असेल !

आपल्याला अदृश्य असणारा—पण, आपल्या भोंवतीं सूक्ष्मरूपानें वावरणारा—हा आत्मा गेल्या एप्रिल महिन्याच्या आरंभीं आपल्या संचाराच्या ओघांत अत्यंत समाधान पावला असेल, यांत मला काडीमात्र संदेह वाटत नाहीं. या उदार व पराक्रमी आत्म्याचा एक अंश या भूमितलावरच शिल्लक राहिलेला होता आणि तो गेलीं पस्तीस—छत्तीस वर्षें बंदिवासांत पडलेला होता ! त्याचा हा बंदिवास संपावा म्हणून गेलीं कित्येक वर्षें अनेकांनीं आपापल्या परीनें प्रयत्न चालविले होते. सुमारें सात वर्षांपूर्वी या प्रयत्नांना अत्यंत अल्प असें यश प्राप्त झालें होतें व या बंदिस्त आत्म्याचें अंधुक, ओझरतें व आंशिक दर्शन इतरांना व्हावें, अशी सोय झाली होती; पण, सरकारी अवकृपेमुळें दृष्टिआड होऊन पडलेल्या या आत्म्याचें खरें व समग्र दर्शन घडण्याचा योग यापूर्वी आलेला नव्हता ! परवांच्या एप्रील महिन्यांत आपल्या प्रान्तांत फिरून लोकसत्ता निर्माण झाली; आणि, या लोकसत्तेच्या पहिल्या प्रभावात ज्या चांगल्या गोष्टी घडल्या त्यांतच या बंदिवान् आत्म्याची संपूर्ण मुक्तता या गोष्टीचाहि अंतर्भाव झाला ! परलोकांतल्या अवर्णनीय सुखाचा उपभोग घेत असलेल्या प्राध्यापक परांजपे यांच्या आत्म्याला आपला हा भूतलावरील अंश बंधमुक्त झाल्यामुळें जो आनंद वाटला असेल त्या आनंदापुढें त्याला स्वर्गसुखोपभोगाचा आनंदहि गौण व फिका वाटला असेल. आपल्या नाटकांच्या हस्तलिखिताचीं पत्रें अरण्यांत बसून अग्निसमर्पण करणाऱ्या भास कवीच्या आत्म्याला किती तीव्र यातना होत होत्या याचें वर्णन स्वतः प्राध्यापक परांजपे यांनींच ' भासाची भवितव्यता ' या आपल्या स्फुट लेखांत केलेलें आहे. आपलें मौलिक लेखन नष्ट होत असलेलें पाहून ' भासा ' चा आत्मा जसा व जितका हळहळला व तळमळला असेल तितकाच, आपलें मौलिक लेखन सरकारनें गिळून टाकलें आहे या विचारानें प्राध्यापक परांजपे यांचा आत्माहि हळहळत व तळमळत राहिला असला पाहिजे. त्या आत्म्याची ही दीर्घकालीन हळहळ व तळमळ गेल्या एप्रिलमध्यें संपली यामुळें त्या आत्म्याला जसा संतोष वाटत असला पाहिजे तसाच

संतोष आज महाराष्ट्रांतल्या सहस्रावधी लोकांना वाटत आहे. या समाधानाला कारणीभूत झालेली लोकसत्ता व त्या लोकसत्तेचें दृश्यस्वरूप म्हणजे या प्रान्तांतील मंत्रिमंडळ या उभयतांचेंहि, त्यांनीं समाधानाची ही पर्वणी सर्वांच्या आवाक्यांत आणली याबद्दल, मी मनःपूर्वक अभिनंदन करतों.

परवां एप्रिल महिन्यांत 'काळांतील निवडक निबंध' ही प्रा. परांजपे यांची ग्रंथमाला काँग्रेस–मंत्रिमंडळानें बंधमुक्त केली. या ग्रंथमालेला उद्देशून मी वर 'प्रा. परांजपे यांच्या आत्म्याचा अंश' असे शब्द वापरिले आहेत. ते शब्द मी हेतुपूर्वक वापरिले आहेत. 'काळ' पत्र बंद झाल्यानंतरच्या आपल्या २८-२९ वर्षांच्या आयुर्मर्यादेत प्रा. परांजपे यांनीं पुष्कळ लेखन केलें, ही गोष्ट खरी आहे. या काळांत त्यांनीं लिहिलेली 'गोविंदाची गोष्ट' ही चटकदार आहे. याच काळांत त्यांनीं लिहिलेली 'विंध्याचल' ही कादंबरीवजा गोष्ट हृद्य आहे. या काळांत त्यांनीं लिहिलेले कित्येक सुंदर लेख 'साहित्यसंग्रह' या नावानें प्रसिद्ध झालेले आहेत. या सर्व लेखन–संभारांत प्रा. परांजपे यांचे वैशिष्टय आढळत नाहीं असें नाहीं. पण, सुमारें बारा वर्षे चाललेल्या साप्ताहिक 'काळ' पत्रांत प्रा. परांजपे यांनीं जे विविध आणि विविध प्रकारचे लेख लिहिले त्यांत त्यांचें वैशिष्टय जितक्या तीव्रतेनें व उत्कटत्वानें दिसतें तितकें त्यांच्या उत्तरकालीन लेखांत तें दिसत नाहीं. आपली बुद्धिमत्ता, आपलें पांडित्य, आपला कल्पनाविलास या सर्वांचें एक अद्भुत रसायन बनवून, तें देशभक्ति व स्वातंत्र्यप्रेम यांत घोटून, प्रा. परांजपे यांनीं मराठी वाङ्मयक्षेत्रांत एक अभिनव दालनच उभें केलें. काळांतील लेखनांत प्रा. परांजपे यांचे बौद्धिक व आत्मिक गुण प्रकर्षाप्रत पोंचलेले आढळतात. यामुळेंच या लेखनाचें वर्णन मी 'परांजपे यांच्या आत्म्याचा अंश' या शब्दप्रयोगाच्या मदतीनें केलें आहे.

असें हें अनन्यसामान्य व अलौकिक लेखन करूं शकणारा पुरुष या सामर्थ्यानें कसा संपन्न झाला हें पहाणें मोठें उद्बोधक व मनोरंजकहि आहे. अनुवंशिकता या तत्वावर किती भिस्त ठेवावी हा अेक मोठा जबरदस्त प्रश्न आहे; आणि, हा प्रश्न अनेक वर्षांपासून लोकांपुढें उभा आहे ही गोष्ट 'सूर्यापोटी शनैचर'' या म्हणीवरून सिद्धही होत आहे. असें असलें तरी, मनुष्याचा शारीरिक व मानसिक पिंड बनण्याला अनेक आनुवंशिक गुण

कारणीभूत होतात, हीं अनुभवसिद्ध गोष्ट विसरून चालणार नाहीं. रसिकता व कलाप्रेम हे दोन शब्द प्रायः समानार्थक आहेत आणि प्रा. परांजपे यांच्या अंगीं जी सारस्वतविषयक रसिकता चमकत होती तिची पूर्वपीठिका नेमकी त्याच स्वरूपांत त्यांच्या वंशांत सांपडत नसली तरी, गायनकला, चित्रकला इत्यादि कलांवरील प्रेमाच्या रूपानें ही रसिकता त्यांच्या कित्येक पूर्वजांच्या ठिकाणीं वसत होती; आणि, त्यांचे पुतणे, महाडचे श्री. नारायण विष्णु परांजपे यांच्या ठिकाणींहि रसिकपणाचीं हीं दोन स्वरूपें उत्तम प्रकारें वसत आहेत. रसिकपणा हा गुण परांजपे यांच्या वंशाचा विशेष गुण आहे व खुद्द प्रा. परांजपे यांच्या ठिकाणींहि ही रसिकता विविध प्रकारानें वसत होती. प्रा. परांजपे हे स्वतःचित्रकार नसतील; पण 'ओलेती' या चित्रावरील चर्चेच्या निमित्तानें त्यांनीं आपलें चित्रकलेवरील प्रेम व्यक्त केलें होतें, ही गोष्ट अद्याप अनेकांच्या स्मरणांत असेल. प्रा. परांजपे हे स्वतः गायनकलेंत निष्णात नसतील; आणि, त्यांनी जरी कित्येक नाटकें लिहिलीं असलीं तरी नाट्यकलेचे प्रत्यक्ष उपासक म्हणून ते लोकांच्या परिचयाचे नसतील; पण, गायन व नाट्य या कलांना आधारभूत असलेले स्वरसौष्ठव व अभिनय हे गुण प्रा. परांजपे यांच्या ठिकाणीं मूर्तिमंत नांदत होते हें त्यांच्या वक्तृत्वाचा ज्यांना परिचय आहे ते सर्व लोक बिनतक्रार मान्य करतील.

'काळ'कर्ते परांजपे यांच्या मनःपिंडाच्या रचनेंत रसिकता हा गुण कसा निर्माण झाला याचें दिग्दर्शन केल्यावर त्या मनःपिंडात स्वातंत्र्यप्रेम कसें संचरलें हें पाहिलें पाहिजे. २७-६-१८६४ रोजीं प्रा. परांजपे यांचा कुलाबा जिल्ह्यांतील महाड या गावीं जन्म झाला. प्रा. परांजपे इंग्रजी शिकण्यासाठीं महाड सोडून रत्नागिरीस गेले त्यावेळीं त्यांचे वय सरासरी १३–१४ वर्षांचे होतें. ७–८ वर्षांपासून १४–१५ वर्षांपर्यंतचें वय हें मुलांच्या आयुष्यांतील अत्यंत महत्वाचें वय होय. पुढें जन्मभर उपयोगी पडणाऱ्या शरीरसामर्थ्याचा पाया ज्याप्रमाणें मुलांच्या या वयांतच भरला जात असतो त्याप्रमाणेंच आयुष्यभर टिकणाऱ्या मानसिक संस्कारांची घडणहि मुलांच्या या वयांतच घडली जात असते. कौटुंबिक सुख अनुभवीत, पुष्कळसा खूडपणा आणि बेताचा अभ्यास करीत परांजपे यांनीं महाड येथें आपल्या आयुष्याचीं हीं वर्षें घालविलीं. त्या अवधींत, कळत न कळत, त्यांच्या मनावर

कोणते संस्कार उमटले असतील हें ठरविणें फार महत्त्वाचें आहे. महाड हें गांव असें आहे कीं, तेथून रायगड,–प्रतापगड हे दोन शिवकालीन किल्ले पंधरा-वीस मैलांच्या अंतराच्या आंतबाहेर आहेत. समर्थ रामदासांची शिवतरची घळ महाडपासून फारशी दूर नाहीं. महाडमध्यें रहाणाऱ्या कोणाहि मुलाला दररोज रायगडावरील ‘ टकमक टोक ’ दिसावें इतका छत्रपतींचा रायगड महाडपासून जवळ आहे. चांभारगड म्हणून जें एक जुनें नाक्याचें ठिकाण आहे तें तर महाडच्या इतकें लगत आहे कीं, महाडच्या परांजपे यांच्या घरांतील मुलांनीं व आसपासच्या मुलांनीं सहज फिरण्यासाठीं म्हणून रोज तेथें जाऊन यावें! हीं सर्व ठिकाणें इंग्रजांच्या ताब्यांत गेलीं त्या गोष्टीला १८७०–७२ च्या सुमाराम जेमतेम पन्नास वर्षें झालेलीं होती. आजहि महाडास जाणाऱ्या चौकस माणसाला महाडच्या जुन्या माणसाकडून रायगड-चांभारगडाबद्दलच्या अनेक मनोरंजक दंतकथा ऐकावयास सांपडतील, अशी स्थिती आहे.परांजपे यांच्या महाड येथील बालपणाच्या कालापासून आज आपण इतके दुरावलेले असूनहि जर महाड गांवाभोंवतीं या दंतकथा अद्याप प्रचलित व खेळत्या राहिल्या आहेत तर, बालवयीं परांजपे महाडास वाढत व वावरत होते त्यावेळीं या दंतकथांचे वलय त्यांच्या सभोंवतीं किती दाट पसरलेलें असेल, याची कल्पना कोणालाहि करतां येईल. महाडचे आजचे बालगोपाल चांभारगडावर उन्हाळ्याच्या दिवसांत फिरावयाला गेले तर त्यांपैकीं पुष्कळ-जण कोणत्या छंदांत आनंद मानतात याची माहिती मला आहे. चांभार-गडावरील कोणताहि दगड ऐन उन्हाळ्याच्या दिवसांत उचलला तर त्याच्या-खालीं विंचू अवश्य सांपडतात. या विंचवांच्या नांग्या तोडून, त्यांची माळ तयार करून आणणें हा महाडच्या बाल-गोपालांचा एक छंद आहे. बाल-वयी परांजपे ज्या काळांत महाड येथें वाढत होते त्या काळांत महाड येथील वातावरणांत जुन्या ऐतिहासिक कथांचा व दंतकथांचा सुगंध दरवळत होता. या सुगंधानें भारावलेली चित्तवृत्ति बरोबर घेऊन बालवयी परांजपे चांभार-गडावर चढून बसत असतील तेव्हां त्यांना विंचवांची माळ तयार करण्यांत आनंद वाटला असेल काय? चांभारगडावरील दगडांदगडांतून जिभा बाहेर येत आहेत आणि त्या आपल्याला प्राचीन व स्वातंत्र्यशाली महाराष्ट्राच्या उज्ज्वल कथा सांगत आहेत असाच भास या टेंकाडावर बसलेल्या बालवयी

परांजप्यांना माहीत असला पाहिजे ! सभोंवतालचे दगड उचलूनच विंचू पहावे अशी बालवयीं परांजप्यांच्या मनाची स्थिती नसली पाहिजे. महाराष्ट्राच्या जुन्या वैभवाची ज्याला प्रत्यहीं आठवण होत आहे अशा त्यांच्या मनाला महाराष्ट्राच्या व हिंदुस्थानच्या सध्यांच्या पारतंत्र्याच्या इंगळ्या प्रतिक्षणीं दंश करीत असल्या पाहिजेत. परांजपे यांच्या लेखनांत स्वातंत्र्यदेवतेच्या उपासनेचीं स्तोत्रें अनेक ठिकाणीं विखुरलेलीं आढळतात हें खरें असलें तरी, शिवकालीन स्वातंत्र्य व शिवकालीन वैभव यांच्या वर्णनाचा प्रसंग आला म्हणजे प्रा. परांजपे यांच्या वाणीचें वैभव विशेषच खुलतें. 'काळांतील निवडक निबंध—भाग ७' या पुस्तकांत 'शिवाजीचें पुण्याहवाचन' आणि "सोळाशें सत्तावीस पूर्वी पांच वर्षें' हें दोन निबंध वाचकांना आढळतील. ते रसिकपणानें वाचणाऱ्या वाचकांना बालवयीं परांजपे यांच्या मनाची मशागत रायगडच्या सान्निध्यांत कशी झाली असेल याची कल्पना नीटपणीं करतां येईल, असा माझा विश्वास आहे.

रसिकपणा हा प्रा. परांजपे यांच्या अंगचा गुण आनुवंशिक ठरतो तर त्यांच्या वृत्तींत रसरसलेली स्वातंत्र्यप्रीति प्रा. परांजपे यांच्या बालमनावर भोंवतालच्या भौगोलिक परिस्थतीनें जे संस्कार उमटविले त्यांच्यापाशीं जाऊन भिडते. बालपण व तारुण्य यांच्या संधिकालांत प्रा. परांजपे हे इंग्रजी शिक्षणासाठीं रत्नागिरी येथें जाऊन राहिले होते. ' मी मराठी भाषेचा शिवाजी आहे ' असें यथार्थ अभिमानानें म्हणणारे निबंधमालाकार कै. विष्णुशास्त्री चिपळोणकर हे त्या सुमारास रत्नागिरीच्या सरकारी हायस्कुलांत शिक्षक होते. स्वदेशाच्या सर्वांगीण अवनतीचा विचार करणाऱ्या व या अवनतींतून देश बाहेर पडण्यासाठीं काय घडलें पाहिजे यासंबंधीं अहर्निश विचार करून ते विचार छातीठोकपणें लोकांपुढें मांडणाऱ्या या गुरूंच्या मनांत जो विचारांचा ज्वालामुखी भडकला होता त्यांचें सान्निध्य प्रा. परांजपे यांना त्यांच्या प्रौढ विद्यार्थिदशेंत लाभलें या गोष्टीचाहि त्यांच्या मनःपिंडाच्या विकासावर पुष्कळच परिणाम झाला असला पाहिजे. सरकारी नोकरीची मोहक रुपेरी शृंखला तोडून विष्णुशास्त्री चिपळोणकर प्रभृति देशभक्तांनीं पुण्यास स्वतंत्र बाण्याचें न्यू इंग्लिश स्कूल सुरू केल्याबरोबर, विद्यार्थिदशेंतले परांजपे आपल्या बरोबरीच्या कित्येक विद्यार्थ्यांसह रत्नागिरीचें हायस्कूल सोडून

शिक्षणासाठीं तडक पुण्यास आले. या प्रत्यक्ष घडलेल्या गोष्टींवरून विद्यार्थि-दशेंत असलेल्या परांजपे यांच्या मनावर विष्णुशास्त्री चिपळोणकरांच्या वाणीची व करणीची छाप किती जबरदस्त प्रमाणांत बसलेली होती, हें अनुमानितां येण्यासारखें आहे.

परांजपे विद्यार्थीदशेंत न्यू इंग्लिश स्कूलमध्यें दाखल झाले या गोष्टीचा त्यांच्या भावी जीवनावर दोन तऱ्हेचा परिणाम झालेला दिसतो. त्यावेळचा न्यू इंग्लिश स्कूलमधील शिक्षकवर्ग सध्यांच्या सर्वसामान्य शिक्षकाप्रमाणें अळणी बनलेला नव्हता. पोरें पढवावीं आणि पगार पचवावा या संकुचित ध्येयापेक्षां कितीतरी पटीनें अधिक विशाल व उदात्त असें एक ध्येय त्या वेळच्या न्यू इंग्लिश स्कूल मधील शिक्षकवर्गाच्या मनांत स्फुरत होतें. राष्ट्र-संवर्धनाचें एक अनुपेक्षणीय अंग म्हणूनच ते शिक्षणक्षेत्रांत प्रविष्ट झाले होते व शिक्षणक्षेत्रांतील कार्याबरोबरच राष्ट्रसंवर्धनाच्या इतर बहुविध कार्यांत ते अहमहमिकेनें लक्ष घालीत होते. सुखाची सरकारी नोकरी पायाशीं लोळण घेत यावी अशी या बहुतेक शिक्षकांची योग्यता होती; तरीहि, त्या सुखावर व नोकरीवर लाथ मारून या देशाभिमानी शिक्षकांनीं समाजापुढें एका नव्या आदर्शाची निर्मिति केली होती. हाच आदर्श आपणहि आपल्या डोळ्यापुढें ठेवावा असे विचार परांजपे यांच्या प्रौढ विद्यार्थिदशेंत मनांत स्थिर झाले असले पाहिजेत असें त्यांच्या विद्यार्थिदशेच्या या पार्श्वभूमीवरून उघड उघड दिसतें.

पुण्यांतील प्रौढ विद्यार्थिदशेमुळें परांजपे यांच्या पुढील आयुष्यक्रमाला जसें हें वळण लागलें त्याप्रमाणेंच पुण्यांतील विद्यार्जनामुळेंच त्यांना आणखीही एक लाभ झाला. कै. प्रि. वामन शिवराम आपटे यांची तीक्ष्ण नजर परांजपे यांच्या बुद्धिमत्तेवर पडल्यामुळें, त्यांनीं विद्यार्थि परांजपे यांना हाताशीं धरलें आणि संस्कृत भाषेच्या अभ्यासांत तरबेज केलें. न्यू इंग्लिश स्कूलमध्यें परांजपे यांना संस्कृत विषयाच्या अभ्यासाची जी आवड लागली ती जन्म-भर त्यांना सुटली नाहीं. वेदान्त, न्याय, अलंकार इत्यादि शास्त्रांचे एक गाढे पंडित व संस्कृत भाषेंतल्या काव्यनाटकादि ललितवाङ्मयाचे एक रसिक उपासक या नात्यानें परांजपे यांना अखेरपर्यंत महाराष्ट्र-पंडितमंडळांत जो मान मिळत असे तो त्यांच्या या वयांतील तपस्येमुळेंच मिळत असे. परांजपे

यांच्या लेखनांत व वक्तृत्वांत जो निरुपम तार्किकपणा दृग्गोचर होतो, त्यांच्या लेखनांत व वक्तृत्वांत पुराणें वगैरे मधील कथाभागांचा जो लीलेनें उपयोग केलेला आढळतो आणि त्यांच्या लेखनांत व वक्तृत्वांत बाणभट्टाच्या लेखनशैलीचें जें कळत न कळत अनुकरण केलेलें दिसतें त्याचा संबंध या वयांत संस्कृत ग्रंथांचें अध्ययन परिश्रमपूर्वक व मार्मिकपणानें करण्याची त्यांनीं जी दक्षता घेतली तिच्याशीं पोंचतो. प्रौढ विद्यार्थिदशेंतच प्रा. परांजपे यांनीं अनेक स्वतंत्र व स्वातंत्र्येच्छु देशाच्या इतिहासाचें सूक्ष्मपणानें अवलोकन केलें. 'काळांतील निवडक निबंध : भाग ७' या प्रस्तुत खंडांत समाविष्ट झालेले ' वुल्फ टोन ' व ' पोलंडची अधोगति ' हे दोन निबंध परांजपे यांचा परदेशांतील स्वातंत्र्य चळवळींशीं किती निकट परिचय होता हें स्पष्ट करीत आहेत; 'वेदान्तवृक्ष', 'आमच्या जुन्या मशिनगन्स' हे निबंध त्यांच्या प्राचीन संस्कृत वाङ्मयावरील अधिकाराची साक्ष पटवीत आहेत तर ' शिवाजीचें पुण्याहवाचन ' या लेखाचा उत्तरार्ध प्रा. परांजपे यांची ऐतिहासिक घटना व भारतीयांचे प्राचीन संस्कार यांवर किती भक्ति होती, हें दर्शवीत आहेत.

वडिलार्जित संस्कार, बालपणची भौगोलिक परिस्थिती, विष्णुशास्त्री चिपळोणकर यांच्या सान्निध्याचा परिणाम व कॉलेजजीवनांत घडलेलें अथांग वाचन या सर्वांचा संकलित परिणाम म्हणून शिवरामपंत परांजपे यांच्या मनाचा त्यांच्या ऐन तारुण्यांत जो एक विशिष्ट प्रकारचा सांचा बनला होता त्याचें विकसनच व्हावें असाच तो समय होता. १८९५ ते ९७ या वर्षांत प्रा. परांजपे हे जरी उघडपणानें राजकारणांत शिरले नव्हते तरी, भोंवतालच्या राजकीय घटनांकडे ते सूक्ष्मपणानें पहात होते. जगभर उद्भूत होऊं लागलेल्या क्रान्तिकारक विचारांचा वारा या सुमारास हिंदुस्थानांतहि खेळूं लागला होता आणि स्वातंत्र्य व क्रान्ती यांच्या चिंतनांत गुंगणाऱ्या परांजपे यांच्यासारख्या तरुणांची वृत्ती या क्रान्तिप्रवाहांत अलिप्त राहील हें शक्यच नव्हतें. महाराष्ट्र कॉलेजपाशीं असलेलें प्रोफेसर हें नातें सुटल्यावर, कै. गु. डॉ. भांडारकर यांचा सरकारी नोकरींत शिरून प्रोफेसर म्हणून कीर्ति व धन मिळविण्याचा पोक्त व दूरदर्शीपणाचा उपदेश दुर्लक्षून प्रा. परांजपे हे वृत्तपत्रकार बनले याचें कारण त्यांचे मूळचे मानसिक संस्कार व त्यांच्या

समोंवतालचें क्रान्तिकारक वातावरण हेंच होय.

अल्पकाळ प्रोफेसरी करूनहि जन्मभर प्रोफेसर म्हणूनच समाजमान्य ठरलेल्या या पंडितानें १८९८ च्या आरंभीं म्हणजे त्या वर्षीच्या वर्षप्रतिपदेच्या शुभमुहूर्तावर साप्ताहिक 'काळ' हें पत्र पुण्यात सुरूं केलें. पण या पत्राच्या पूर्वींच प्रा. परांजपे यांचें वक्तृत्व महाराष्ट्रांत गाजूं लागलें होतें. शाळा कॉलेजांतील वादसभांतून भविष्यकाळचे वक्ते निर्माण होतात अशा समजुतीनें बहुतेक सर्व शाळाकॉलेजांत सध्या वादसभा चालविल्या जातात- त्या चालविण्यांत कांहीं चूक आहे, असें मला म्हणावयाचें नाहीं; पण, महाराष्ट्राचा हा 'डेमॉस्थेनिस' शाळा–कॉलेजांतल्या वादसभांच्या तालमींत तयार झाला नव्हता, ही गोष्ट मात्र मला नमूद करावीशी वाटते. पृथ्वीवरील पाण्याची वाफ पोटांत दीर्घकाल सांठवून न ठेवितां ती अकालींच पर्जन्यरूपानें पृथ्वीवर पोंचविणारे ढग उपकारक ठरत नाहींत. ती वाफ आपल्या पोटांत दीर्घकालपर्यंत सांठवून तिचें योग्य रूपान्तर झाल्यावर सुसमयीं तिची पृथ्वीवर पर्जन्यरूपानें पाठवणी करणारे वर्षाकालीन मेघच पृथ्वीला सस्यमयी व फलपुष्पमयी करीत असतात. असाच कांहींसा प्रकार परांजपे यांच्या वक्तृत्वाच्या बाबतींत घडला, असें मला तरी वाटतें.

परांजपे यांनीं 'काळ' हें वृत्तपत्र १८९८ च्या आरंभीं सुरू केलें हे वर सांगितलेंच आहे. वृत्तपत्र या शब्दानें सध्या आपल्याला ज्या वस्तूचा बोध होतो तशा वस्तूचा बोध करून देणारें मात्र हें वृत्तपत्र नव्हतें. वृत्त म्हणजे माहिती किंवा बातमी; ती गोळा करण्याची धांदल-धांवपळ करावयाची व ती आकर्षकपणानें वाचकांपुढें मांडावयाची असा सध्याच्या अनेक वृत्तपत्रांचा बाणा आहे. ज्यांना ही धांदल-धांवपळ करण्याचेंहि त्राण नाहीं अशीं कांहीं वृत्तपत्रें स्वतःचा बडिजाव वाढविण्यासाठीं आपल्याला 'मतपत्र' हा प्रौढ व भारदस्त शब्द लावून घेत असतात; पण अशा वृत्तपत्रांत जी संपादकीय भरताड झालेली असते त्यांतल्या कित्येकांना मतेंच नसल्यामुळें आणि इतर कित्येकांचीं मतें स्थिर नसल्यामुळें–अशीं मतपत्रें धड मतपत्रें ठरत नाहींत आणि धड वृत्तपत्रेंहि ठरत नाहींत! प्रा. परांजपे यांचें 'काळ' पत्र हे खऱ्या अर्थानें मतपत्र होतें. संपादकीय लेखांत किंवा अग्रलेखांत एक प्रकारच्या मतांचा अंश मांडावयाचा आणि वर्तमानपत्राच्या इतर स्तंभांतून त्या

मताचें बल कमी करणाऱ्या अगर त्या मतांना विरोध करणाऱ्या मजकुराचा छेद घालावयाचा आणि वाचकांच्या मनाला या अंशच्छेदाच्या टकरींत शून्यलब्धीचा अनुभव आणून द्यावयाचा, ही हिकमत 'काळ'पत्राला कधींच साधली नाहीं. 'काळ' पत्रांतील लेखन विविध प्रकारचें असे. त्यांत अग्रलेख येत असत, सुबकपणानें गुंफलेलीं स्फुटें त्यांत दिसत असत, संवादांना त्यांत स्थळ मिळत असे, गोष्टींचाहि त्यांत मधूनमधून समावेश केलेला असे. या विविध प्रकारच्या लेखनांतलें पुष्कळसे लेखन स्वतः प्रा. परांजपेच करीत असत. वाचकांनीं पाठविलेलीं पत्रें मधूनमधून 'काळ' मध्यें प्रसिद्ध होत असत. पण, हे वाचकहि परांजपे यांच्या स्फूर्तीच्या दीप्तीनें रसरसून गेलेले असल्यामुळें त्यांनीं धाडिलेल्या पत्रानांहि परांजपे यांच्याच लेखनशैलीचें व विचारसरणीचें वळण लागलेलें दिसे. याचा परिणाम असा होत असे कीं, 'काळ' पत्रांतील सर्व लेखन एका विशिष्ट ठशाचें आणि एका विशिष्ट मतप्रणालीचा फैलाव करणारें ठरत असे.

साप्ताहिक 'काळ' हें मतपत्र १८९८ च्या फेब्रुवारी महिन्यापासून १९१० च्या मध्यापर्यंत चालू होतें. १९०८ च्या जुलै मध्यें प्रा. परांजपे यांना 'काळा'तील कांहीं लेखांबद्दल एकोणीस महिने कारावासाची शिक्षा झाली. या शिक्षेच्या निमित्तानें परांजपे यांचा 'काळ'पत्राशीं असलेला संबंध जवळजवळ सुटला असें मानलें तर स्वतः प्रा. परांजपे यांनीं 'काळ' पत्र दहा वर्षें चालविलें असें निष्पन्न होतें. या दहा वर्षांत प्रा. परांजपे यांनीं 'काळ'पत्रांत जे विविध व बहुमोल लेख लिहिले त्यापैकीं निवडक लेखांचा संग्रह प्रतिवर्षीं प्रसिद्ध करण्याचा प्रघात प्रा. परांजपे यांनी सुरू केला होता. या निवडक निबंधांत सगळेच अग्रलेख पुनर्मुद्रित केले जात असत असेंहि नाहीं; आणि अग्रलेखाव्यतिरिक्त मजकूर या निवडक लेखांच्या संग्रहांत पुनर्मुद्रित होतच नसे असेंहि नाहीं. काळांतील निवडक निबंधाच्या प्रस्तुत विभागांत म्हणजे या सातव्या खंडांत आढळणाऱ्या वीस लेखांपैकीं 'पशूंच्या साम्राज्याचा इतिहास,' 'एक ऐतिहासिक पदार्थसंग्रहालय,' 'देहूहून परत येतांना,' 'जगांतील उच्च रंगभूमीवरील नीच कृत्य' हे चार लेख तरी अग्रलेख नसलेले लेख आहेत. असे असूनही हे लेख वाङ्मय दृष्ट्या किती उच्च दर्जाचे आहेत, देशाच्या पारतंत्र्याबद्दल चीड उत्पन्न करण्याचें कार्य हेहि

लेख किती कसोशीनें करीत आहेत इत्यादि विचार [illegible] लेख वाचतांना मनांत आलें म्हणजे 'काळ'पत्राचें सर्व लेखन कसें एका ठेक्यांत व एका सुरांत चालत असें ह्याची बरोबर कल्पना करता येते.

आणि, प्रा. परांजपे हे भोंवतालच्या घडामोडींपैकीं ज्या घडामोडींवर आपलें लक्ष्य अेकाग्र करीत आणि त्या घडामोडी वाचकांपुढें मांडतांना ते ज्या एका विशिष्ट पद्धतीचा अवलंब करीत त्यांचा विचार केला म्हणजे काळांतील सर्व लेखनाला असा एकसंधीपणा यावा हें अपरिहार्यच ठरतें. स्थानिक राजकारणांतल्या चिल्लर गोष्टी, सनदशीर राजकारणाच्या परांजपे यांना बेचव वाटणांऱ्या उलाढाली वगैरेंना प्रायः फांटा देऊन, प्रा. परांजपे हे भोवतालच्या महत्वपूर्ण घटना आणि भोंवतालीं व्यक्त होत असलेलीं जळजळीत मतें यांचीच निवड करीत असत; आणि वाचकांपुढें मांडा-वयाच्या विषयांचीं अशा प्रकारें निवड झाल्यावर प्रा. परांजपे हे त्या सर्व विषयांचें एकाग्र चित्तानें मनन करीत असत. या मननाच्या ओघांत या प्रचलित घडामोडींवर परांजपे यांच्या कल्पकतेचा, विद्वत्तेचा, उपहासाचा, उपरोधाचा साज चढत असे. असा साज चढल्यावर हे सर्व प्रचलित विषय एका बेमालूम सूत्रांत गुंफल्यासारखे 'काळ' पत्राच्या स्तंभातून प्रकट होत असत. 'काळ' पत्रांतील मजकूर सांगण्याची प्रा. परांजपे यांची पद्धत काय होती या विषयींची एक दंतकथा मी कित्येक वर्षोपूर्वी ऐकलेली आहे. 'काळ' पत्रांतलें बहुतेक मौलिक लेखन मंगळवारीं व बुधवारीं रात्रीं जन्माला येत असे. हा मजकूर ज्याला लिहावयास सांगावयाचा असे, त्या लेखकानें रात्रीं लौकर झोंपीं जावें अशी प्रा. परांजपे यांची सांगी असे. सभोंवतीं सामसूम झालें म्हणजे प्रा. परांजपे हे एकटेच मनन करीत कित्येक तास एकाग्र होऊन बसत आणि, त्या चिंतन–समाधींत असतांना 'काळा'त लिहावयाचा सर्व मजकूर त्यांना स्फुरत असे. ही समाधि उतरली म्हणजे–म्हणजेच मध्यरात्र उलटण्याच्या सुमारास–ते आपल्या लेखकाला उठवीत असत आणि मजकूर सांगण्याला प्रारंभ करीत असत. ही दंतकथा सर्वस्वीं खरी नसली तरी प्रा. परांजपे यांच्या 'काळा'तील लेखन पध्दतीचें मर्म समज-ण्याच्या दृष्टीनें ती फार उद्बोधक आहे. काळांतील लेखन कशाप्रकारें होत असें या विषयाची माहिती स्वतः परांजपे यांनींच निदान दोन प्रसंगीं तरी

सांगितलेली पाहि. रिव्ह्यू ऑफ रिव्ह्यूज या मासिकाचे संपादक मि. स्टेड हे आपल्या मासिकांत 'प्रोग्रेस ऑफ दी वर्ल्ड' या सदरांत जीं स्फुटें लिहीत असत त्याच स्फुटांच्या पद्धतीचा अवलंब आपण करीत असतों, असें प्रा. परांजपे यांनीं प्रस्तुत सातव्या खंडातल्या, 'हृदयाविष्करण' या लेखांत सांगितलें आहे. १९०८ सालीं प्रा. परांजपे यांच्यावर राजद्रोहाचा खटला झाला. हायकोर्टात प्रा. परांजपे यांनीं हा खटला स्वतःच चालविला. या खटल्यांत प्रा. परांजपे यांनीं स्वतःच्या बचावाचें जें भाषण केलें तें इतर अनेक दृष्टींनीं मननीय आहेच; पण, या भाषणांत प्रा. परांजपे यांनीं आपल्या 'काळां'मधील लेखन पद्धतीचें जे स्पष्टीकरण केलें आहे तें प्रस्तुत मुद्द्याच्या स्पष्टीकरणाच्या दृष्टीनें फार महत्वाचें आहे ' एका आठवड्यामध्यें जितक्या कांहीं गोष्टी घडून आल्या असतील तितक्या सर्व पद्धतशीर रीतीनें, कदलीदलन्यायाबरहुकुम सुसंगत अशा, लोकांपुढें मांडून आणि निरनिराळ्या गोष्टींचे दुवे अेकमेकांना जोडून, अेकजीव सांखळी करावयाची ' ही खोड आपल्याला लागली असल्याचें प्रा. परांजपे यांनीं या प्रसिद्ध भाषणांत न्या. दावर यांना सांगितलें होतें. प्रा. परांजपे यांना ही संवय जडली होती म्हणूनच त्यांचें काळांतील लेखन अितक्या ऊच्च दर्जाचें ठरलें आहे. कै. लो. टिळक यांच्या लेखनाचाहि असाच प्रकार होता असें मी विश्वसनीय रीत्या ऐकलेलें आहे. केसरीच्या अग्रलेखाचें चिन्तन चालू असतांना कै. धोंडोपंत विद्वांस अग्रलेखासाठीं टिळकांसमोर येऊन उभे राहिले तर, " अवकाश आहे अजून; एन्जिन तापलें नाहीं " असें म्हणून टिळक त्यांना परत दवडीत आणि मनन पूर्ण झालें असें ठरलें कीं, लेखकाला बोलावून अग्रलेख घडाघड सांगून मोकळे होत! वर्तमानपत्रांतलेंहि मौलिक लेखन अशा अेकाग्र व मननशील चित्तांतुनच उद्‌भूत होत असतें. सहा तास काम करण्याचें नाटक करून टलटिकोरी करणारे आणि आठवड्यांत सरासरी दोन कॉलम लिहून दमल्याभागल्याचा आव आणणारे पुष्कळसे संपादकब्रुव कशा प्रकारचें लेखन लिहितात याचा प्रत्यक्ष अनुभव सध्यां मराठी वाचकांना दुर्लभ नाहीं!

मनाच्या एकाग्रतेच्या अवस्थेत परांजपे हे ज्या अनेक विषयांची बेमालूम गुंफण करीत असत त्या सर्व विषयांचा व त्या सर्व गुंफणीचा सगळा रोख

मात्र एकच असे. कोणत्या ना कोणत्या तरी प्रकारें वाचकांच्या मनांत येथील राज्यकर्ते व राज्यपद्धति यांच्याबद्दलची अप्रीति निर्माण करणें आणि स्वातंत्र्य-प्राप्तीचे जे इतिहाससिद्ध व अनुभवसिद्ध मार्ग आहेत त्यांचा अवलंब करण्याला वाचकांना प्रवृत्त करणें या एकाच भक्कम सूत्रांत परांजपे यांची विविध विचार–पुष्पें गुंफलेलीं असत. या पुष्पात विविधता यावी म्हणून परांजपे हे कित्येक प्रसंगीं आत्मनिरीक्षणबुद्धीनें आपल्या लोकांच्या दोषांचेंहि आविष्करण करीत. हिंदुस्थानच्या राष्ट्रीय दुर्गुणांत फितुरी हा दुर्गुण फार भयंकर आहे असें त्यांचें ठाम मत होतें. तें त्यानीं 'काळ' पत्रांतल्या लेखांतून व इतरही लेखांतून वारंवार ठासून मांडलें आहे. प्रस्तुत सातव्या खंडांत समाविष्ट झालेला 'फितुरी' हा लेख त्यांच्या या ठाम मताची साक्ष पटवीत आहे. अशा विविध प्रकारच्या लेखांनीं 'काळ' पत्राचे स्तंभ नटलेले असत हे खरें असलें तरी, येथील परकीय सत्तेचें शत्रुत्व करण्याला लोकांना शिकविणें हेंच या सर्व लेखनाचें ध्येय व उद्दिष्ट असे. सर व्हॅलेंटाइन चिरोल यांनीं 'Father of Indian unrest' (भारतीय असंतोषाचे जनक) ही पदवी एकट्या लोकमान्य टिळकांनाच दिली आहे, हें खरें आहे; पण १८९८ पासून १९०८ पर्यंत महाराष्ट्रीय वृत्तपत्रांनीं महाराष्ट्रांत निर्माण केलेला असंतोष हिशेबात घेतला तर, भारतीय असंतोषाचे जनक या बहुमान वाचक पदवीवर प्रा. परांजपे यांचा टिळकांच्या इतकाच अधिकार पोंचतो हें नाकबूल करून चालणार नाहीं. पूर्वीचे बरोबरीचे राजे तुल्यबल अशा पराक्रमी पुरुषाला आपल्या आसनाच्या अर्ध्या भागावर गौरवानें बसवून घेत असत. भारतीय असंतोषाचे जनक लो. टिळक यांचा आत्माहि परांजपे यांच्या आत्म्याला आपल्या अर्ध्यासनावर बसवून गौरवीत असेल, असें मानलें तर तें चुकीचें ठरण्याचा मुळींच संभव नाहीं.

राजकीय असंतोष निर्माण करण्याच्या सामर्थ्याच्या बाबतींत टिळक व परांजपे हे तुल्यबल होते व यामुळेंच स्वा. सावरकर यांनीं आपल्या 'मॅझिनी'च्या अर्पणपत्रिकेंत या उभयतांना उद्देशून लोकमान्य ही एकच पदवी अर्पिली आहे. हें खरें असलें तरी टिळक व परांजपे यांच्यामधील महत्वाचा भेदहि लक्षांत ठेवण्यासारखा आहे. असंतोषाच्या भडकत्या ज्वाला निर्माण होत होत शुद्ध व निर्मळ स्वातंत्र्य हें क्रमानें सिद्ध होत असतें; तें सिद्ध

होण्यापूर्वीच्या काळांत परकीय राज्यकर्ते दास्यमग्न लोकांना हळूहळू व नाइलाजानें अधिकार देत असतात; त्यांचा राष्ट्रसंवर्धनाच्या दृष्टीनें उपयोग करून, तद्द्वारा देशाचें सामर्थ्य वाढवून आणि फिरून असंतोषाची आग निर्माण करून, हस्तगत झालेल्या अधिकारांत भर घालणें अपरिहार्य असतें हें मुत्सद्दी टिळक कधींहि विसरत नसत. याच्या उलट, शुद्ध ध्येयवादी परांजपे हे म्युनिसिपालिट्या, लोकलबोर्डें, सत्तासंपन्न नसलेलीं विधिमंडळें या सर्वांच्या आणि अशाच प्रकारच्या संस्थांच्या लाभावर भर देणाऱ्या काँग्रेसच्या सनदशीर राजकारणाचा उपहास व अधिक्षेप करण्यांतच स्वतःला धन्य मानीत असत. लो. टिळक मंडालेहून सुटून परत आल्यावर त्यांनीं फिरून काँग्रेसमध्यें शिरण्याचें ठरविलें. त्यावेळीं परांजपे हे अखेरपर्यंत त्यांना विरोध करीत राहिले. याचें कारण हेंच कीं, काँग्रेस–प्रवेशामुळें राष्ट्रीयपक्षाची स्वातंत्र्यप्राप्तीवरील दृष्टी चलित होईल असें त्यांना वाटत होतें. टिळकांच्या मृत्यूनंतर गांधीजींच्या नेतृत्वाखालीं जी पहिली असहकाराची वावटळ उठली तिचा परांजपे यांनीं मनोभावानें पुरस्कार केला. असहकाराचें पर्यवसान काय होऊं शकतें हें पाहिल्यावर, परांजपे हे १९२४–२५ सालापासून पुढील ४।५ वर्षांत प्रत्यक्ष राजकारणांत प्रायः तटस्थाची व दूरस्थाचीच भूमिका घेऊन वागले. असहकाराच्या चळवळीचें स्वरूप क्रांतिकारक आहे व त्या चळवळींतून राष्ट्रस्वातंत्र्य सिद्ध होण्याचा बराचसा संभव आहे असें देशांतल्या अनेक लोकांप्रमाणेंच परांजपे यांनाहि प्रारंभीं वाटलें असावें; आणि म्हणूनच, स्वातंत्र्यप्राप्तीचें एक साधन म्हणून त्यांनीं या मार्गाचा पुरस्कार केला असावा. चांदण्या रात्रीं कावळे अवेळींच ओरडूं लागतात आणि त्यामुळें प्रभातसमय झाल्याचा भास होऊन कित्येक माणसें निद्रात्याग करून उठतात; कावळ्यांच्या ओरडण्यामुळें आपली दिशाभूल झाली हें लक्षांत येतांच प्रभातकालाकडे लक्ष लावून बसलेलीं हीं माणसें ज्या पद्धतीनें वागतात त्या पद्धतीनेंच परांजपे हेहि या काळांत वागले, हें स्वाभाविकच आहे !

आपल्या लेखनाच्या द्वारां वाचकांच्या मनांत स्वातंत्र्यप्रेम व साहस हे गुण निर्माण करणारे परांजपे लेखनाच्या भरांत कोणतें टोंक गांठीत असत याची कल्पना प्रस्तुत खंडांतील 'एम्. डी. प्लेहवे' या निबंधावरून करतां

येण्यासारखी आहे. हा ( सातवा ) खंड म्हणजे परांजपे यां.। १९०४-०५ या सालीं 'काळां'त लिहिलेल्या निवडक लेखांचा संग्रह होय. यापूर्वी सुरू झालेलें रूसो–जपानी युद्ध, या सुमारास चीनमध्यें होत असलेली जागृति वगैरे विषयांचा परामर्ष परांजपे यानीं या वर्षीच्या 'काळ'पत्राच्या अंकांतून वारंवार घेतलेला आढळतो. रशियांत हळूहळू वाढत चाललेल्या क्रान्तिकारक हालचालींकडेहि परांजपे यांचें पूर्ण लक्ष होतें, असें या वर्षीचे 'काळ'पत्राचे अंक तपासले असतां आढळून येतें. रशियांतील क्रान्तिकारकानीं 'एम्. डी. प्लेह्वे' या प्रधानाचा खून केला ही घटना परांजपे यांनी सांगितली यांत विशेष असें कांहीं नाहीं; पण, 'एम्.डी.प्लेह्वे' याच्या खुनाच्या अध्यायाची समाप्ति आणि लॉर्ड कर्झन यांच्या आख्यानाचा आरंभ यांची सांधेजोड परांजपे यांनीं ज्या पद्धतीनें केली आहे त्या पद्धतींत परांजपे यांचें वैशिष्ट्य दिसून येतें. एम्. डी. प्लेह्वे प्रमाणेंच लॉर्ड कर्झन हेहि क्रान्तिकारकांच्या रोषाला बळी पडले तर त्यांत नवल नाहीं असा ध्वनि या लेखांतून निघतो हें स्पष्टपणें मान्य करण्याला आतां कांहींच हरकत उरलेली नाहीं. या लेखांतून हा ध्वनि निघत असल्यामुळें, मुंबईच्या व लंडनच्या टाइम्स पत्रांनीं या लेखाविरुद्ध खूप बोभाटा केला. यावेळीं परांजपे यांनी स्वसमर्थना-साठीं जो लेख लिहिला तो मुळांत शीर्षकरहित आहे. प्रस्तुत खंडांत सदर लेख 'हृदयाविष्करण' या शीर्षकानें विभूषित झालेला आढळत आहे. 'एम्. डी. प्लेह्वे' हा लेख एका कारणासाठीं वैशिष्ट्यपूर्ण ठरणारा आहे तर 'हृदयाविष्करण' हा लेख दुसऱ्या एका कारणासाठीं वैशिष्ट्यपूर्ण ठरणारा आहे. सांपडेल त्या मार्गानें क्रांतिकारक विचारांचा प्रसार करणें व देशांतील असंतोषाचे प्रदर्शन कोणत्याहि स्वरूपांत झालें तरी तें इष्ट मानणें हें जें परांजपे यांच्या वृत्तींतिले गुण तें 'एम्. डी. प्लेह्वे' या लेखांत उत्कटत्वानें दिसतात. तर्कशुद्धपणा, कोटिबाजपणा, उपरोध, उपहास इत्यादि मार्गांचा आश्रय करून स्वकीय व परकीय टीकाकारांचा फडशा पाडण्याचें परांजपे यांच्या अंगचें सामर्थ्य किती अलौकिक होतें हें 'हृदयाविष्करण' या लेखा-वरून प्रत्ययास येतें.

या दोन लेखानंतर या खंडांत आढळणारा 'दगडी कोळसा' हा लेख तर फारच बहारीचा आहे. या लेखाचें शीर्षक जसें चित्त वेधून घेणारें आहे

त्याप्रमाणेंच या लेखाची उपहासगर्भ सुरवातहि मोठी चित्त-वेधक आहे. अगदीं निरुपद्रवी विषय म्हणून निवडून काढलेल्या 'दगडी कोळशां'तूनहि किती धग निर्माण होऊं शकते हें परांजपे यांच्या या चटकदार लेखावरून कोणाच्याहि सहज लक्षांत येईल. या खंडांतील लेखांपैकीं 'दगडी कोळसा' या लेखाचें शीर्षक जसें चटकदार व आकर्षक आहे त्याप्रमाणेंच प्रस्तुत खंडांतील 'ब्लॅक होल' या निबंधाचें शीर्षकहि चटकदार आहे. हा निबंध वाचण्याला प्रवृत्त होणारा वाचक अशा अपेक्षेनें सुरवात करतो कीं, 'कलकत्त्याची अंधार कोठडी' या ऐतिहासिक प्रसंगाची कांहीं तरी चटकदार व स्फूर्तिदायक चिकित्सा आपल्याला या लेखांत वाचावयाला मिळेल; पण अशा अपेक्षेनें निघणाऱ्या वाचकाला अगदींच वेगळा अनुभव येतो. देशाचें स्वातंत्र्य सिद्ध करण्याच्या दृष्टीनें आपल्या देशाची स्थिति एखाद्या अंधार कोठडीसारखी आहे हा विषय परांजपे यांनीं विस्तारानें मांडल्याचें पाहून वाचकाला चमत्कार वाटतो. 'आमच्या जुन्या मशीनगन्स' हा लेखहि कांहींसा याच वळणाचा आहे. हा लेख वरवर वाचणाराला असेंहि वाटण्याचा संभव आहे कीं, स्वातंत्र्यशाहीर म्हणून नांवाजलेल्या परांजपे यांच्या 'काळ'पत्रांत हिंदूंच्या प्राचीन आत्मिक बलाची एवढी महती कशासाठीं वर्णिली असावी आणि रुद्रांतील अनुभवांच्या फलाची मीमांसा या ठिकाणीं इतक्या विस्तारानें कां करण्यांत आली असावी? परांजपे यांचें पुष्कळसें लेखन व पुष्कळसें वक्तृत्व हें त्यांतील ध्वनि व सूचना यांचें नीट आकलन करणारांच्याच आवाक्यांत येऊं शकत असे! 'आमच्या जुन्या मशीनगन्स' हा लेखहि ध्वनि आणि सूचना यांच्या द्वारांच समजून घेतला पाहिजे. शत्रूंचें निर्दालन करूं पहाणाऱ्या आपल्या पूर्वजांनीं जी उपाय-योजना केली ती किती विविध प्रकारची होती, ती योजना करतांना किती सूक्ष्म विचार केला जात होता आणि ती उपाय-योजना ठरविणारांच्या मनांत सूक्तासूक्त, पापपुण्य इत्यादि मनचळेपणाचे विचार कसे येत नसत याचें विवेचन करणाऱ्या परांजप्यांच्या मनांत सद्यःकालीं आपल्या शत्रूंचें निर्दालन करूं पहाणाऱ्या माणसांनीं प्रभावी उपाय-योजना ठरवितांना कसें वागलें पाहिजे हें सुचविण्याची कल्पना निःसंशय वावरत असली पाहिजे!

'ब्रह्मदेशांतील लॉर्ड क्लाइव्ह' या ऐतिहासिक माहितीच्या आधारें लिहिलेल्या

लेखांत परांजपे यांनीं हिंदूंच्या भोळेपणाची हजेरी घेतली आहे आणि या भोळेपणाचा लाभ कावेबाज ख्रिस्ती मिशनऱ्यांनीं कसा करून घेतला याचें परांजपे यांनीं या लेखांत मार्मिक विवेचन केलें आहे. ' पतित परावर्तनांतील एक भाग ' या नांवाचे तीन निबंध या खंडांत समाविष्ट झालेले आहेत. हिंदूंना ख्रिस्ती करून घेणाऱ्या मिशनऱ्यांची वागणूक व त्यांचें तंत्र याची या निबंधावलींत केलेली छाननी मोठी मार्मिक आहे. हे चार निबंध व याच खंडांत समाविष्ट झालेला ' वेदान्त वृक्ष ' हा पांचवा निबंध अशा लेखांचा साकल्यानें विचार करणाऱ्या माझ्यासारख्या माणसाच्या मनांत एक विचार अगदीं स्वाभाविकपणेंच डोकावून जातो. दे. भ. या पदवीवर हक्क सांगणाऱ्या व स्वातंत्र्यभक्त म्हणून मिरविणाऱ्या प्रत्येक हिंदूनें आपलें हिन्दूपण विसरलें पाहिजे, हिंदुसमाजावर आक्रमण करणाऱ्या व हिंदुसमाजाला गळती लावणाऱ्या पीडकांपुढें नांगी टाकून नमून वागणें हेंच त्यांनीं आपल्या देशभक्तीचें लक्षण मानलें पाहिजे, अशा भ्रामिष्ट विचारांचें जें वेडें पीक सध्यां देशभक्तबुवांनीं पिकविलें आहे तें निदान ' काळ 'कर्ते परांजपे या स्वातंत्र्यशाहिरानें व देशभक्तानें पेरून ठेवलेल्या विचारांशीं तरी सुसंगत नाहीं, असें मला स्पष्टपणें वाटतें. सध्याच्या हिंदी राजकारणाला जें मुसलमान धार्जिणेपणाचें वळण लागलें आहे तें परांजपे यांना कितपत संमत झालें असतें हा प्रश्न सोडवितांना प्रत्येकाला आपापली कल्पनाशक्ति यथाप्रमाण वापरण्याची कितीहि मुभा असली तरी, त्या कल्पनाशक्तीचे धागे अखेरीस परांजपे यांनीं ' काळ ' पत्रांत लिहिलेल्या या व अशा प्रकारच्या लेखांशीं विरोधी असतां कामा नयेत, हें तरी सर्वांनीं लक्षांत ठेविलें पाहिजे.

' काळकर्ते ' परांजपे हे निर्भेळ स्वातंत्र्याच्या कल्पनेची स्फूर्ति देणारे होते; त्या मानानें स्वातंत्र्य संपादन करण्याच्या दृष्टीनें त्यांचें कर्तृत्व कमी होतें असें सुचवितांना कै० अच्युतराव कोल्हटकर यांनीं ' तलवार बहाद्दर आणि तलवारीचे कारखानदार ' या मार्मिक दृष्टान्ताचा उपयोग केला आहे. "तलवारीचे कारखानदार स्वतः तलवार बहाद्दर असतात, असें नाहीं. पण पाणीदार तलवारी कशा कराव्या हें त्यांना समजतें व अशी एखादी तलवार एखाद्या पराक्रमी पुरुषाच्या हातांत पडली म्हणजे तीच भवानी तलवार बनून त्यांस श्रीशिवाजी महाराजांचें यश देतें " या ठसकेबाज वाक्यांत अच्युतराव कोल्हट-

कर यांनी ' काळकर्ते ' परांजपे यांच्या कार्याचें मूल्यमापन केलें आहे. सध्यांच्या काळांत तलवार बहाद्दरीला जो अर्थ बिलगलेला आहे तो लक्षांत घेतां, परांजपे हे अजिबात तलवार बहाद्दर नव्हते हें म्हणणें अनेकांना पटणार नाहीं. मलाहि तें मान्य नाहीं. परांजपे हे भारतीय स्वातंत्र्य संग्रामांतील श्रेष्ठ दर्जाचे तलवार बहाद्दरहि होते; आणि ' काळ ' पत्र चालवून व जन्मभर स्वातंत्र्योद्दीपक लेख लिहून त्यांनी जो तलवारीचा कारखाना चालविला तो त्यांच्या स्वतःच्या तलवार बहाद्दरीपेक्षां अधिक प्रभावशाली ठरला व या पुढेंहि तो तसाच ठरत राहील अशा अर्थानें कै. कोल्हटकर यांच्या वरील विधानांचा विचार झाला पाहिजे, असें मला वाटतें. परांजपे यांनीं आपल्या कारखान्यांत घडविलेल्या अनेक तलवारींपैकीं ही एक तलवार महाराष्ट्रांतील तरुणांना परिचित करून देण्याचें, कोणालाहि प्रिय वाटणारें काम माझे मित्र श्री. य. गो. जोशी यांनीं मजवर सोपविलें याबद्दल त्यांचे आभार मानून व या पुस्तकाचा वाचकवर्ग हा अल्प परिचय गोड मानून घेईल अशी आशा व्यक्त करून मी वाचकांची रजा घेतों.

१ सप्टेंबर १९४६ }　　　　—शि. ल. करंदीकर

महाराष्ट्र प्रांतिक परिषद ( १९२८ )



वासुकाका जोशी, परांजपे ( उभे ), खेर, भोपटकर, सुभाषचंद्र बोस, चिं. वि. वैद्य, केळकर.

# परमेश्वराची प्रार्थना : : : १

काळ : अग्रलेख, ता. १।४।१९०४

● 'काळ' पत्राची वर्षारंभींची प्रार्थना.

जगांतील जी जी वस्तु पहावी, ती ती परमेश्वराचें अस्तित्व प्रदर्शित करीत आहे. नास्तिक लोक परमेश्वर कोठें आहे तो दाखवा, असें म्हणून नेहमीं आक्रोश करीत असतात. वास्तविक पाहिलें असतां परमेश्वर मनुष्याच्या इतका जवळ आहे कीं, तो त्याला दुसऱ्यांनीं दाखविण्याची कांहीं जरूरी नाहीं. तो आपल्याजवळ आहे, तो आपल्यापासून दूर आहे, तो आपल्यापुढें आहे, आपल्या पाठीमागें आहे, आपल्या उजव्या हाताकडे आहे, आपल्या डाव्या हाताकडे आहे, आपल्या वर आहे, आपल्या खालीं आहे, तो सर्वत्र भरलेला आहे. अथवा असें म्हणण्यापेक्षां सर्व विश्व हें परमेश्वरस्वरूपच आहे. आपल्यामध्यें परमेश्वराचें विराटस्वरूप म्हणून ज्याचें वर्णन केलेलें आहे, तेंही ह्याच धोरणावर होय. 'तत्सृष्ट्वा तदेवानुप्राविशत्' या वचनाप्रमाणें परमेश्वरानें हें विश्व निर्माण केलें आहे, व त्या विश्वामध्यें तो प्रविष्ट झाला आहे. त्यामुळें विचाराच्या दृष्टीला तो प्रत्येक ठिकाणीं दृश्यमान होतो. या विश्वांतील सर्व वस्तूंमध्यें परमेश्वराचे अंश थोडयाबहुत प्रमाणानें शिरलेले असल्यामुळें त्या त्या वस्तु पाहिल्या म्हणजे मनावर कांहींएक प्रकारचे विशिष्ट संस्कार उत्पन्न होतात. असें जरी आहे, तरी कांहीं विशेष ठिकाणीं ईश्वरी तेज विशेष उत्कट स्वरूपानें वास करीत असतें, आणि त्यामुळें मनुष्याच्या मनावर विशेष परिणाम होऊन तें मन त्या ठिकाणीं रममाण होतें. अशा प्रकारचीं स्थळें म्हटलीं म्हणजे मोठमोठे पर्वत, गुहा, नद्या, सरोवरें वगैरे होत. परमेश्वरानें आपल्या कर्तृत्वापैकीं कर्तृत्वाचा कांहीं भाग मनुष्याला दिलेला आहे. त्या

कर्तृत्वाच्या जोरानें मनुष्य जें कांहीं करूं शकतो, त्याबद्दल मनुष्याला आश्चर्य न वाटणें हें साहजिक आहे. परंतु जेथें मनुष्याच्या कर्तृत्वाची मर्यादा खुंटते, तेथें मनुष्याची देवाच्या अतुल कर्तृत्वाविषयींची कल्पना सुरू होते. मनुष्याला थोडीशी माती, दगड आणि लांकडें यांनीं घर बांधतां येतें, परंतु माती, दगड आणि लांकडें यांचे असंख्य परमाणु घेऊन त्यांच्यापासून त्याला पर्वत बनवितां येत नाहीं. त्यामुळें जेव्हां तो एखाद्या पर्वताच्या शिखरावर जाऊन उभा राहतो आणि आसमंतात् भागीं आपली दृष्टि फेंकतो, व त्या पर्वताचा विस्तार आणि त्याची उंची पाहतो, त्यावेळीं त्याचें मन थक्क होऊन जातें, हें कोणीं केलें असेल असा प्रश्न त्याच्या मनांत उद्भवतो, हें कोणत्याही एका मनुष्याचें किंवा अनेक मनुष्याच्या समुदायाचें कृत्य नव्हे अशी त्याच्या मनाला खात्री वाटत असते, आणि तरीही पण हें झालेलें आहे तेव्हां तें कोणीं केलेलें असावें, अशी जिज्ञासा त्याच्या मनांत उत्पन्न होते. त्या विचारानें तो वेडा होऊन जातो, त्याचें मन दाही दिशांकडे फांकतें, त्याचे डोळे आकाशाकडे लागतात, आणि परमेश्वराची कल्पना त्याच्या अंतःकरणामध्यें जागृत होते. एखाद्या मोठ्या नदीच्या कांठीं मनुष्य उभा राहतो, आणि तेथें त्याच्या दृष्टीला जो तेथील अद्भुतपणा दिसतो, त्याच्या योगानेंही त्याचें मन गांगरून जातें आणि वर दिलेल्या प्रकारच्याच परंपरेनें तो अखेरीस परमेश्वराच्या कल्पनेला येऊन पोंचतो. सकाळच्या प्रहरीं क्षितिजावर सूर्य उगवत असतां किंवा संध्याकाळीं समुद्राच्या पाण्यांत सूर्यबिंब पतन पावत असतां त्या देखाव्याकडे जो पाहतो, तो हें मनुष्याचें काम नव्हे अशी खात्री झाल्यानंतर परमेश्वराकडेच वळतो. पृथ्वी, आप, तेज, वायु, आकाश, हीं जीं परमेश्वरानें निर्माण केलेलीं स्थूल स्वरूपाचीं पंचमहाभूतें तीं त्यांच्या त्यांच्या विस्तीर्ण आणि उग्र स्वरूपामध्यें पाहिलीं म्हणजेही मनाची वरच्याप्रमाणेंच स्थिति होऊन जाऊन त्या मनाला जिज्ञासेच्या ज्या टोंचण्या लागतात त्या शांत करण्याकरितां परमेश्वराच्या कल्पनेची अत्यंत आवश्यकता उत्पन्न होते. अशा रीतीनें जेथें मनुष्याच्या कल्पनेची धांव संपते, तेथें परमेश्वराच्या अस्तित्वाची कल्पना सुरू होते. ज्या गोष्टी मनुष्याला करितां येतात त्यांत मनुष्य परमेश्वराचा हात शिरकूं द्यावयाचा नाहीं. परंतु जेथें त्याला कांहीं समजत नाहीं, तेथें तो परमेश्वराचें सामर्थ्य कल्पितो. जसजशी मनुष्याच्या ज्ञानाची मर्यादा वाढत जाते, तसतसा देवाच्या सामर्थ्याचा प्रांत

कमी कमी होत जातो. देवाचें राज्य व मनुष्याचें राज्य यांच्या सरहद्दी एक-मेकांना लागलेल्या आहेत. मनुष्याला न कळलेले कार्यकारणभाव, मनुष्याला अज्ञात असलेले संबंध, मनुष्याला करतां येण्याला अशक्य असलेल्या गोष्टी, मनुष्याच्या ज्ञानाला अगोचर असलेलीं अनंत सामर्थ्यें हीं सगळीं परमेश्वराच्या राज्यांत मोडतात. यांजवर मनुष्य नेहमीं हल्ले करीत आहे, व यांतील कांहीं प्रांत आपल्या हस्तगत करून घेत आहे. तरीपण मनुष्याला अज्ञात असलेलीं परमेश्वराचीं सामर्थ्यें इतकीं अनंत आहेत कीं, मनुष्यानें आपले हल्ले जगाच्या अंतापर्यंत असेच चालूं ठेविले तरी देखील तीं विलक्षण सामर्थ्यें मनुष्याच्या हातीं लागणार नाहींत. आणि या कारणामुळेंही परमेश्वराच्या विषयींची बुद्धि मनुष्याच्या हृदयामध्यें दृढतर होते. जन्माच्या आधीं आपण कोठें असतों व मरणानंतर आपण कोठें जातों, आपण ज्या स्थितींत जन्मास येतों त्याच स्थितींत आपण जन्मास यावें अशाबद्दल कांहीं कारणें असतात कीं काय, आणि येथें केलेल्या कृत्यांबद्दल आपल्याला पुढें बक्षीस किंवा शासन कांहीं मिळावयाचें आहे कीं काय, आपल्या शरीराची रचना हल्लीं आहे अशीच कां केलेली आहे, त्यांतील मन हा काय पदार्थ आहे व त्याचे गुणधर्म काय आहेत, आपला जीव अनाद्यनंत आहे किंवा गर्भांतून उत्पन्न होऊन चितेमध्यें विलय पावणारा आहे, इत्यादि अनेक अध्यात्मिक प्रश्नही असे आहेत कीं, ते सुद्धां वर दिलेल्या आधिभौतिक प्रश्नांप्रमाणेंच मनुष्याचें मन प्रथमतः व्यग्र करून नंतर तें परमेश्वराच्या अस्तित्वाच्या आणि कर्तृत्वाच्या कल्पनांनीं पुनरपि जाग्यावर आणून स्थिर करतात. अशा रीतीनें मनुष्याचें मन जेथें जेथें विचार करूं लागतें तेथें तेथें तें कांहीं थोड्याशा अंतरावर जाऊन तेथें तें कुंठित होतें. आणि जेथें तें कुंठित होतें, तेथें त्याला परमेश्वरस्वरूप दिसूं लागतें. जशी आपल्या जिव्हेला उष्ण काळामध्यें तृषा लागते, त्याप्रमाणें मनुष्याच्या मनाला ज्ञानाची तृषा नेहमींच लागलेली आहे. हें काय, तें काय, असले प्रश्न मनुष्य आपल्या बाल्यावस्थेपासून अंतकाळापर्यंत सदोदित आपल्या मनाला विचारीत असतो. त्याला जेवढें समजतें त्याचे कार्यकारणभाव त्यास अवगत झालेले आहेत, त्यांत त्याला विलक्षण किंवा दैविक असें कांहींच वाटत नाहीं. परंतु त्याच्यापलीकडे सर्व देवकृत आहे असें तो मानतो. सारांश, जें मनुष्याचें अज्ञान, तो परमेश्वराच्या कर्तबगारीचा प्रांत असें [illegible], [illegible] परमेश्वराच्या कर्तृत्वाचा प्रांत [illegible] संकु[illegible]

होतो असें नाहीं. कारण, क्षुद्र मनुष्यानें आपल्या ज्ञानाची मर्यादा वाढविली म्हणून ती कितीशी वाढणार आहे ? आतां जेथें मनुष्याचें ज्ञान चालत नाहीं, तेथें परमेश्वर मानला जातो, ही एक सापेक्ष दृष्टि आहे. परंतु मनुष्याला समजत नाहींत, किंवा करितां येत नाहींत, तेवढ्याच गोष्टी फक्त परमेश्वरकर्तृक आहेत आणि बाकीच्या नाहींत असें नाहीं. ज्या गोष्टींचे कार्यकारणभाव मनुष्याला कळलेले आहेत, त्यांत तरी असा प्रश्न उपस्थित होतो कीं, अमुक कारणानें अमुक कार्य उत्पन्न करावें अशी तरी शक्ति त्या कारणामध्यें कोणीं उत्पन्न केली ? परमेश्वरानेंच कीं नव्हे ? हायड्रोजन आणि ऑक्सिजन एकत्र करून मनुष्याला पाणी उत्पन्न करितां येऊं लागलें असेल; परंतु अन्योन्यसंगानें जल उत्पन्न करण्याचें सामर्थ्य हायड्रोजन आणि ऑक्सिजन यांच्यामध्यें कोणीं ठेविलें ? तें परमेश्वरानेंच ठेविलें आहे. तें मनुष्याला ठेवितां येणार नाहीं, किंवा ठेविलेलें काढून घेतां येणार नाहीं. अशा दृष्टीनें पाहिलें असतां ईश्वराच्या कर्तृत्वाचा अंशतः निषेध करणारें मनुष्याचें ज्ञान हें आपल्या अधिकाराच्या प्रांतांत देखील पंगुच आहे. त्याला थोडेंसें चालतां येतें; परंतु त्याला सर्वस्वीं आपल्या पायांवर चालतां यावयाचें नाहीं.

यावरून असें दिसून येईल कीं, जो थोडासा प्रांत मनुष्याच्या ज्ञानानें आक्रमण केलेला म्हणून दिसत आहे, तोसुद्धां वास्तविकपणें स्वतंत्र रीतीनें मनुष्याच्या ताब्यांत नाहीं. तेथेंही परमेश्वराचें अस्तित्व आहे व परमेश्वरानें तेथें बरीचशी पूर्वतयारी करून ठेविलेली असल्यावांचून मनुष्याला त्याच्यावर आपली इमारत उभारतां यावयाची नाहीं. अशा रीतीनें परमेश्वराचें अस्तित्व सर्व ठिकाणीं भरलेलें आहे, व तें सर्व ठिकाणीं अनुमानानें जाणतां येण्यासारखें असतें. परंतु अनुमानानें परमेश्वराचें अस्तित्व जाणून जरी मनुष्याच्या मनाची तृप्तता झाली, तरी त्याचे डोळे समाधान पावत नाहींत. ह्या जगाची उत्पत्ति, स्थिति आणि लय हीं घडवून आणणारा असा जो विलक्षण शक्तिमान् परमेश्वर, त्याचें स्वरूप आपण प्रत्यक्ष पहावें, अशी लालसा डोळ्यांस उत्पन्न होते. ही डोळ्यांची लालसा तृप्त होणें शक्य आहे किंवा नाहीं, हा एक बिकट प्रश्न आहे. कारण, आपल्या डोळ्यांना पहावयाला आणि पाहून समाधान मानावयाला जसें स्वरूप पाहिजे आहे तसें परमेश्वराचें आहे किंवा नाहीं ही एक शंकाच आहे. तें परमेश्वराचें खरें स्वरूप जें काय

असेल, तें ज्यांनीं पाहिलें असेल, ते पुरुष धन्य होत! तरी सामान्य मनुष्याची तशी योग्यता नाहीं. तरीपण सामान्य मनुष्यांना परमेश्वराचें स्वरूप पाहण्याची दिदृक्षा कमी असते असें मात्र नाहीं, व ती दिदृक्षा त्यांनीं अनेक उपायांनीं परिपूर्ण करून घेतलेली आहे. सर्व उत्तम वस्तु ह्या परमेश्वराच्याच होत, व त्यांमध्यें परमेश्वराचाच अंश जास्त प्रमाणानें वास करीत आहे. असल्या सगळ्या चांगल्या वस्तु एकत्र करून मनुष्यांनीं परमेश्वराचें स्वरूप बनविलेलें आहे. हें स्वरूप बनविण्यांत प्रत्येकानें आपली कल्पनाशक्ति कमी अधिक प्रमाणांत चालविलेला आहे. परंतु त्या सर्वांच्या प्रयत्नांतील एकंदर धोरण असें दिसतें कीं, सर्व उत्तम वस्तूंच्या समुच्चयानें अत्यंत उत्तम स्वरूप निर्माण करावयाचें. त्यामुळें ज्यांत सत्त्वगुण जास्त, ज्यांत तेज अतिशय, ज्यांत आकर्षण-शक्ति जोराची, ज्यांत मनोवेधकता सर्वोत्कृष्ट, ज्यांत सौंदर्य अतिशय मोहक, अशा अनेक वस्तूंच्या एकीकरणानें बनविलेलीं जीं परमेश्वराचीं स्वरूपें त्यांमध्यें देखील अशा उपायांनीं ईश्वरी अंश थोडाबहुत तरी उतरतोच, व त्या ईश्वरी अंशाच्या प्रभावानें असल्या मूर्तींच्या उपासकांनाही अंशतः फलप्राप्ति होते. ही मूर्तीची, त्यांच्या उपासनेची आणि त्यांच्यापासून होणाऱ्या फलप्राप्तीची एक प्रकाराची उपपत्ति होय.

अशा रीतीनें उत्तम सात्त्विक वस्तूंच्या समुच्चयापासून मूर्तीमध्यें एक प्रकारचें सामर्थ्य उत्पन्न होतें, परंतु त्या मूर्तीमधील सामर्थ्याला आणखीही एक बाह्य कारण आहे. हें कारण त्या मूर्तीमध्यें वास करीत नसून त्या मूर्तींच्या उपासकांच्या अंतःकरणामध्यें वास करीत असतें. भावावांचून देव नाहीं, ही एक म्हण पुष्कळांनीं ऐकिली असेल; परंतु तिच्यांतील गूढार्थ काय आहे, इकडे फारच थोड्यांचें लक्ष गेलेलें असेल. भजकांच्या उत्तान मनोवृत्तींनीं देवतेच्या अंगामध्यें एक प्रकारचें सामर्थ्य चढत असतें. आपली निष्ठा जसजशी दृढ होईल तसतसें आपल्याला फळ मिळतें अशी जी समजूत आहे आणि जी पुष्कळ वेळां पुष्कळांच्या प्रत्ययाला येते, तिच्यांतील बीज हेंच आहे कीं, आपल्या भक्तीनें आणि एकतानतेनें आपल्या उपास्य देवतेच्या अंगामध्यें एक प्रकारचें विशेष सामर्थ्य उत्पन्न होतें. भजनानें आणि उपासनेनें आपण आपलें मन कमावून इतकें तयार करतों कीं, त्याच्यावर आपल्या उपास्य देवतेला पाहिजे ते परिणाम घडवून आणण्याला एक प्रकारचें शेतच

आपण तयार करून देतों, असें म्हटलें तरी हरकत नाहीं. ह्या उपायांत एका दृष्टीनें आपल्या मानसिक स्थितीपासूनही मूर्तीमधील सामर्थ्य वाढलें जातें असें म्हणण्यास हरकत नाहीं. देवांच्या मूर्ती अनेक ठिकाणीं अनेक आहेत; परंतु त्या सगळयांचीच प्रख्याति न होतां फक्त कांहींचीच विशेष झालेली आहे; याचें देखील मुख्य कारण हेंच कीं, त्यांपैकीं कांहींना उत्तम उपासक मिळाले आणि बाकीच्यांना मिळाले नाहींत. असे फरक पडल्यामुळें देवतांच्या फलदायकत्वामध्यें फरक पडतो. अनेक लहान लहान देवता हे त्या सर्वशक्तिमान् परमेश्वराचे प्रतिनिधि होत. तेव्हां त्यांच्यामध्यें तारतम्यभाव असला म्हणून त्याच्या योगानें परमेश्वराच्या सर्व सामर्थ्याला कोणत्याही प्रकारचा बाध येतो असें नाहीं. उलट निरनिराळ्या प्रतीच्या अज्ञजनांना त्यांच्या उपासनेच्या मानानें लौकिक फळें देण्याकरितां देवता व त्यांच्या मूर्ती ह्या अवश्य आहेत. पण वस्तुतः यांचें जें भजनपूजन, तें त्या सर्वशक्तिमान् परमेश्वराचें भजनपूजन होय. कोणत्याही मूर्तीपुढें आपण अनन्यभावानें नमस्कार केले, तरी ते सगळे नमस्कार त्या परमेश्वरापाशीं जाऊन पोहोंचतात. कोणत्याही देवतेपाशीं आपण नवस करून कांहीं मागितलें, तरी तें त्या जगन्नियंत्यापाशींच मागितल्यासारखें आहे, व कोणत्याही देवतांनीं किंवा मूर्तींनीं कांहीं अनुग्रह केला असला, तरी तो सर्व अनुग्रह त्या परमेश्वरापासूनच आलेला असतो, असें आपण समजावें. जो परमेश्वर आब्रह्मस्तंबपर्यंत यच्चयावत् सर्व वस्तूंमध्यें भरून राहिलेला आहे, तो उत्तम सात्त्विक वस्तूंनीं बनविलेल्या आपल्या प्रतिनिधीभूत मूर्तींच्या ठिकाणींच कांहीं नास्तिक लोकांच्या खुशामतीसाठीं वास्तव्य करणार नाहीं, हें कसें संभवेल? मनुष्याचें मन परमेश्वराची जेथें कल्पना करील तेथें परमेश्वर उभा राहील आणि मनुष्याचा कंठ जेथें परमेश्वराला हांक मारील, तेथें तो त्याच्या हांकेला हांक देईल. हेंच आपल्या धर्मांतील मूर्तिपूजेच्या कल्पनेचें मूळ होय व आपल्यांतील प्राणप्रतिष्ठेची क्रिया आणि तत्संबंधींचे मंत्र यांतील बाह्यांग सोडून केवळ तत्त्वाचा विचार केला तर त्यामध्येंही हेंच तत्त्व दिसून येतें. ह्या क्रियेंत योग, धारणा, समाधि, वगैरे अनेक सात्त्विक मनोधर्मांचें तत्त्व प्रविष्ट झालेलें आहे. जो योगी आपल्या मनोनिग्रहानें पाहिजे त्या ठिकाणीं पाहिजे तें उत्पन्न करूं शकतो, तो एखाद्या प्रतिमेच्या ठिकाणीं आपल्या योगबलानें बलिष्ठ झालेल्या मंत्रोच्चारानें कांहीं विशेष गुणधर्म उत्पन्न

करूं शकणार नाहीं असें नाहीं. शिवाय योगी, साधुपुरुष वगैरेंच्या अंगामध्यें त्यांच्या अद्भुत तपोबलानें कांहीं अघटित सामर्थ्यें उत्पन्न झालेलीं असतात व हस्तस्पर्शानें त्यांच्या अंगांतील तीं सामर्थ्यें दुसऱ्या वस्तूंमध्यें प्रवेश करूं शकतात. अशा लोकांच्या हातून ज्या मूर्तींची स्थापना झालेली आहे, त्यांच्या अंगामध्यें कांहीं अलौकिक सामर्थ्य उत्पन्न होणें संभवनीय आहे, आणि म्हणूनच या बाबतींत कित्येक मूर्तींची ख्याति झालेली आहे. ह्याशिवाय मूर्तींच्यामध्यें सामर्थ्य उत्पन्न होण्याला दुसरींही कांहीं कारणें कित्येक ठिकाणीं असतात. नास्तिक लोक ज्यांना केवळ दगड, धोंडे, पाणी वगैरे म्हणतात, त्यांच्या ठिकाणीं सृष्टिनियमाप्रमाणें कांहीं अद्भुत संस्कार मूळचेच उत्पन्न झालेले असतात. परंतु ते संस्कार कां व कसे उत्पन्न झालेले आहेत याच्याबद्दलची सामान्य लोकांना माहिती नसल्यामुळें त्यांमध्येंही कांहीं दैविक अंश आहे अशी कल्पना होऊन कित्येक लोक त्यांच्या भजनीं लागतात. अशा प्रकारचीं देवांच्या मूर्तींना महत्त्व येण्याचीं अनेक कारणें आहेत. परंतु तीं कांहींही कारणें असलीं, तरी ह्या मूर्ती म्हणजे त्या अनंतकोटिब्रह्मांडनायक परमेश्वराचे केवळ प्रतिनिधीच होत, ही कल्पना सर्वांच्या मनांत जागृत असते. त्या निर्गुण, निराकार, निरंजन आणि निरालंब अशा परमेश्वराचें मनुष्याला त्याच्या इच्छेप्रमाणें पूजन-अर्चन करितां येत नाहीं; म्हणून जाणून बुजून केवळ उपासनेसाठीं आपल्यामध्यें ही प्रतिमांची पद्धत प्रचलित झालेली आहे. सर्व जग हेंच ज्या परमेश्वराचें देऊळ त्याला त्याचे उपासक दुसरें देऊळ काय बांधणार, जगाच्या बाहेरील कोणत्या उपकरणांनीं बांधणार आणि या जगाच्या पलीकडील कोणत्या जागेमध्यें बांधणार? ज्याच्यापासून सर्व वाणी निवृत्त झाल्या, त्याचीं स्तोत्रें मनुष्य काय म्हणणार? व जो डोळ्यांना दिसत नाहीं, त्याला उपासक लोक डोळे भरून काय पाहणार? अशा प्रकारच्या अनेक व्यावहारिक अडचणींच्या परिहारासाठीं ज्या मूर्तींचे अवतार झाले त्या मूर्तींची आपल्या लोकांनीं अनादिकाळापासून उपासना चालविलेली आहे, व ती आपली उपासना ह्या सगळ्या मूर्तींची हस्तें लागून परमेश्वराच्या घरीं जमा आहे. ती आपली जमा काय आहे, आणि प्रस्तुतच्या आपल्या राष्ट्रीय आपत्तीच्या प्रसंगांत तिच्या मोबदला परमेश्वरापाशीं किंवा त्याच्या निरनिराळ्या ठिकाणच्या गुमास्त्यांपाशीं आपल्याला काय मागणें जरूर आहे, याच्याबद्दल

आपण थोडासा विचार केला तर तो केवळ अप्रासंगिकच होईल असें नाहीं, ईश्वरोपासनेचा किंवा धार्मिक कृत्यांचा ऐहिक, राष्ट्रीय आणि स्वकीय कामाकडे कोणीं उपयोग केला नाहीं असें नाहीं.

जगद्वंद्य जगद्गुरु श्रीविद्यारण्यस्वामी यांची अशी एक गोष्ट सांगतात कीं, त्यांनीं चोवीस वर्षेंपर्यंत गायत्रीपुरश्चरण करून ती देवता सुप्रसन्न करून घेण्याचा प्रयत्न केला. परंतु गायत्री प्रसन्न झाली नाहीं, तेव्हां ते उद्वेगानें संन्यस्त होऊन घराच्या बाहेर पडले. तेव्हां गायत्री देवी प्रसन्न होऊन 'काय मागावयाचें असेल तें माग' असें म्हणाली. तेव्हां इतकीं वर्षें मीं तपश्चरण केलें असतां गायत्री प्रसन्न झाली नाहीं म्हणून त्यांना अतिशय क्रोध आला. हें जाणून गायत्रीनें त्यांना त्यांच्या पातकांचे पर्वत जळत असलेले दाखविले व "तुझीं पूर्वजन्मींचीं पातकें जाळून टाकण्यामध्येंच तुझी या जन्मींची तपश्चर्या बहुतेक खर्च झाली आहे. तरीपण आतां मी तुजवर प्रसन्न झालें आहें, तेव्हां तूं कांहींतरी वर मागून घे," असें देवी म्हणाली. तेव्हां विद्यारण्यस्वामी म्हणाले कीं, "मी आतां संन्याशी झालों. आतां मला तुझा वर काय करावयाचा आहे? मला कशाचीच इच्छा नाहीं, तर मी आतां काय वर मागूं?" हें त्यांचें भाषण गायत्रीनें श्रवण केलें, तरी पण विद्यारण्यांनीं कांहींतरी वर मागून घेतलाच पाहिजे असा त्या देवतेनें अतिशय आग्रह धरिला. तेव्हां, "मला तर कांहींच नको, परंतु आपला निर्बंधच असेल तर एक प्रहरपर्यंत माझ्या ग्रामावर होनांचा पाऊस पाडावा," असें विद्यारण्यांनीं सांगितलें. ती गोष्ट देवतेनें कबूल केली व त्याप्रमाणें एक प्रहरपर्यंत विद्यारण्यस्वामींच्या गांवावर होनांचा पाऊस पडून विद्यारण्यांच्या गांवांतील लोक वंशपरंपरेचे श्रीमंत व सुखी झाले. अशा प्रकारचीं आपलीं आणि आपल्या पूर्वजांचीं कांहीं पुरश्चरणें परमेश्वराचे घरीं शिल्लक असतील आणि आपण आतांपर्यंत केलेल्या पातकांचे पर्वत जाळून त्यांतून जर कांहीं बाकी उरत असेल, तर तिच्या सामर्थ्यानें आपल्या या हतभाग्य हिंदुस्थान देशावर सौख्याचा पाऊस पाडण्याविषयीं आपण त्या परमेश्वराची आणि त्याच्या अंशभूत देवतांची प्रार्थना करणें गैरवाजवी होणार नाहीं.

हे आर्यभूमींत वास करणाऱ्या अनेक देवतांनो, तुमच्याकडे ह्या आर्यभूमीचें आणि या आर्यभूमींतील लोकांचें कांहीं मागणें आहे. पूर्वींच्या

राजांनीं आमच्याकरितां तुमच्यापाशीं कांहीं ठेवी ठेविल्या आहेत, त्या तुम्ही आम्हांला या वेळीं द्या. आमच्या पूर्वीच्या राजांना त्यांच्या त्या वेळच्या प्रजेची तर काळजी होतीच, परंतु पुढें होणाऱ्या प्रजेची सुद्धां त्यांना फार काळजी होती. ते आपल्या वेळच्या प्रजेचें आपल्या सैन्यानें यथाशक्ति संरक्षण करीतच होते. पण हें सैन्य आपल्या पुढच्या देशबांधवांचें संरक्षण करण्याला टिकणार नाहीं, हें ते जाणून होते. परंतु मग आपल्या भावी देशबांधवांचें आपण संरक्षण कसें करूं शकूं, अशी त्यांना चिंता पडली असतां, देवता आणि धर्म हें कायम टिकणारें सैन्य आहे, ही दैवी कल्पना त्यांच्या मनामध्यें त्या वेळीं प्रकाशमान झाली. आणि म्हणून त्यांनीं तुम्हांला देवळें बांधून दिलीं, जहागिरी दिल्या, नंदादीप सुरू केले, चौघड्यांची योजना केली, आणि अन्नछत्रें घातलीं. त्या पूर्वीच्या राजांना माहीत होतें कीं, आतां आपल्याजवळ कितीही द्रव्यसंचय असला, तरी तो आपल्या पुढील करंट्या देशबांधवांच्या वेळेपर्यंत कायम रहावयाचा नाहीं. म्हणून, हे देवतांनो, त्यांनीं आपले कोट्यवधि रुपयांचे खजिने अशा कामीं लाविले आहेत कीं, ते तेथें कधींही बुडावयाचे नाहींत, आणि ते शतगुणित होऊन आपल्या देशबांधवांच्या संकटसमयीं त्यांच्या गरजेला उपयोगीं पडतील. त्यांना माहीत होतें कीं, आतां आपण कितीही मजबूत किल्ले बांधिले, तरी पुढें नवीन शोधाच्या अशा विलक्षण तोफा आणि बंदुका निघावयाच्या आहेत कीं, त्यांच्या माऱ्यापुढें आपले किल्ले फार वेळ टिकावयाचे नाहींत, आणि आपल्या देशबांधवांचें व्हावें तसें संरक्षण व्हावयाचें नाहीं. ही स्थिति लक्षांत आणून, हे देवतांनो, त्यांनीं तुमचीं देवळें बांधलीं आणि धर्माचे दुर्भेद्य किल्ले उभारले ! हे देवतांचे आणि धर्माचे किल्ले बांधून ठेवण्यामध्यें आपल्या भावी देशबांधवांच्या हिताच्या कामीं त्यांनीं फारच दूरदर्शीपणा दाखविलेला आहे. त्यांना माहीत होतें कीं, आपल्या देशबांधवांवर आपल्या पाठीमागून अंमल करण्याकरितां येणारे लोक आपल्या सर्व गोष्टींचा उच्छेद करून टाकतील. म्हणून आमच्या जुन्या राजांनीं युक्ति काढून असे किल्ले बांधिले कीं, ते हिंदुस्थानच्या परकीय राजांनाही मोडण्याचें धारिष्ट होऊं नये. ते किल्ले जमीनदोस्त केले तर धर्माच्या आवेशानें लोकांचीं मनें खवळून जावीं आणि ते कायम ठेविले तर सहजगत्याच लोकांचा कार्य-भाग व्हावा, असा दुहेरी फायदा पाहून आमच्या पूर्वीच्या राजांनीं, हे देवतांनो,

तुमचीं देवळें बांधलीं आहेत. जेथें कांहीं नैसर्गिक सौंदर्य होतें आणि त्या कारणानें मूळचीच परमेश्वरस्वरूपाची थोडीबहुत साक्ष पटत होती, तेथें आमच्या पूर्वजांनीं धर्माचो पताका लावून आणि तुमची स्थापना करून हा सर्व भरतखंडाचा प्रदेश त्यांनीं तुमच्या पदरांत घातलेला आहे. याचें संरक्षण तुम्हीं करावयाला पाहिजे आहे. सृष्टिसौंदर्यानें मनोहर आणि प्रेक्षणीय झालेल्या बहुतेक टेकड्यांच्या आणि पर्वतांच्या शिखरांवरून तुमची स्थापना त्यांनीं केली आहे. हिंदुस्थानांतील कोणत्याहि प्रदेशांत उभें राहून एखाद्यानें आसमंतात् भागीं दृष्टि फेंकली, तर कोठें तरी आसपास, हे देवतांनो, तुमच्या पताका आणि तुमचीं निशाणें फडकत असलेलीं त्याच्या दृष्टीस पडतात, आणि चार प्रहरांचे चार चौघडे तुमच्या मंदिरांतून झडत असलेले दुरून त्याचे कानावर येतात. सद्यःस्थितीला वैतागून, भुकेनें व्याकुळ होऊन आणि उन्हानें होरपळून तो एखाद्या अरण्यांत निराशेनें भटकत असला, तरी देखील, हे देवतांनो, एखाद्या डोंगरावर त्यानें तुमचें निशाण पाहिलें किंवा तुमच्या चौघड्यांचा ध्वनि ऐकला, म्हणजे तेवढ्यानेंही त्याच्या मनाला थोडासा धीर येतो. या जगांत आपलें कोणीतरी आहे असें त्याला वाटतें, आपल्याला मनुष्यांनीं गांजलें आहे तरी ह्या देवता आपल्याला विसरणार नाहींत अशी त्याला आशा उत्पन्न होते, सात्त्विक विकारांनीं त्याचें अंतःकरण उचंबळून जाऊन त्याच्या नेत्रांतून अश्रुधारा वाहूं लागतात, तो आपल्या अश्रुजलांनीं आपल्या वाटेवरील दगडही आर्द्र करितो, आपल्या सभोंवार पसरलेल्या निर्जन अरण्याकडे पाहून त्याचें मन उदास होत असलें तरी, हे देवतांनो, तुमच्याकडे पाहून त्याचें पोट भरतें, त्याला मध्यान्हींच्या सूर्याचेंही ऊन लागेनासें होतें, व 'ह्या देवता आपल्या देशाला सुखाचे दिवस खात्रीनें दाखवितील' असे उद्गार त्याचे तोंडून निघतात. हे देवतांनो, पूर्वींच्या राजांनीं ह्या ज्या तुमच्या संस्थापना केल्या आहेत आणि त्यांच्या ज्या देणग्या तुम्हीं स्वीकारल्या आहेत, त्यांच्या योगानें तुमच्यावर एक प्रकारची जबाबदारी आलेली आहे. तुमच्या उपासकांवर ज्या आपत्ति आल्या आहेत, त्या पर्यायानें तुमच्याही आपत्ति होत. ज्या वेळेला एखाद्या देशांतील लोक गुलाम बनतात, त्या वेळीं त्या देशावर अधिष्ठान करणाऱ्या आणि त्या देशाचें संरक्षण करणाऱ्या देवतांवरही एक प्रकारची गुलामगिरीची कळा येते; व ज्या देवता सदोदित

तेजोमय असावयाच्या, त्यांचाही वारंवार तेजोभंग होऊं लागतो. हे देवतांनो, हा तुमचा तेजोभंग झालेला पाहून या भरतखंडांतील लोकांना अतिशय खेद होत आहे. आमचें विशेषसें नाहीं; परंतु, हे देवतांनो, आमचें अंतःकरण तुमच्यासाठीं फार हळहळतें. कांहीं थोड्या शतकांपूर्वी तुमचें वैभव केवढें होतें ! तुमचें माहात्म्य केवढें असे ! व तुमच्याबद्दल लोकांना श्रद्धा आणि अभिमान किती वाटत असे ! परंतु आतां तें कांहींच नाहीं ! तुम्हीही आमच्यासारख्या परतंत्रतेपासून उत्पन्न होणाऱ्या दुःखाचा अनुभव घेत आहां, असें दिसतें. म्हणून, "हे देवतांनो, आमच्यासाठीं नसेल तर नसो, परंतु निदान तुम्ही आपल्या स्वतःसाठीं तरी आतां जागृत झालें पाहिजे. मनुष्यांना सुद्धां जी पायमल्ली सहन होत नाहीं ती देवतांना कशी सहन व्हावी ? अथवा मनुष्यांपेक्षां देवतांच्या अंगांत सर्वच गुण जास्त असतात, त्याप्रमाणें सहनशीलतेचा गुण सुद्धां जास्तच आहे कीं काय ? पण दुर्बळ मनुष्याप्रमाणें हे देवतांनो, तुम्हीं काय म्हणून अपराध सहन करावेत ? तुम्ही काय दुर्बळ आहां ? आणि असाल तर तुमच्यापेक्षां जास्त बळ मनुष्याच्या अंगांत कधीं येणार आहे ? तुम्ही आतां जागृत झालेंच पाहिजे. तुम्हीं प्रकाशमान होण्याला सुरवात केली पाहिजे. तुम्हीं आपल्या सत्त्वगुणांत तमोगुण कालविला पाहिजे. तुम्हीं आमचें संरक्षण केलें पाहिजे. आमचें संरक्षण तुम्हीं केलें नाहीं तर तुमचें भजन कोण करील ? तुमच्यामध्यें जें कांहीं दैविक तेज संचित झालेलें आहे, तुमच्यामध्यें जी कांहीं विद्युत्शक्ति एकीकृत आहे, तिचा उपयोग तुम्ही केव्हां करणार ? आकाशांतील मेघगर्जना, विद्युत्पात आणि वज्रास्त्रें हीं तुमच्या ताब्यांत आहेत असें म्हणतात, तें तुम्ही खरें केव्हां करून दाखविणार ? मनुष्यांचीं अंतःकरणें एका क्षणांत बदलून टाकण्याचें सामर्थ्य जें तुमच्या अंगामध्यें आहे, त्याचा प्रयोग तुम्ही लोकांच्या अंतःकरणावर केव्हां करणार ? ह्या आर्यावर्तांत कोट्यवधि लोक टाळ घेऊन तुमचेपुढें नाचतात; घरदार सोडून तुमच्या यात्रा करितात; तुम्ही डोंगरांत, नदींत, गुहेंत, दरींत, बर्फांत, अरण्यांत, अंधारांत, समुद्रांत जेथें असाल तेथें तुम्हांला शोधीत येतात; तुमच्या-साठीं लाखों रुपये खर्च करितात; तुमचें नांव घेत नदींतून बुड्या मारितात आणि गुहेंतून समाधि लावितात, अशा लोकांच्यासाठीं तुम्ही काय करीत आहां ? त्यांनीं हालांत रहावें आणि तुम्हीं त्यांच्याबद्दल कांहींही करूं

नये, हें उचित आहे काय ? या आर्यभूमींतील आर्य लोकांची किती अनार्य स्थिति झाली आहे, हें तुम्हांला दिसत नाहीं काय ? किंवा दिसत असूनही तुम्ही उपेक्षा करतां काय ? परंतु उपेक्षा करण्याची ही वेळ नव्हे. पूर्वी जशी ही मेदिनी त्रस्त झाली होती, तशीच ती आतांही झालेली आहे. मागें जशी ती गायीचें रूप धारण करून परमात्म्याकडे गेली होती, त्याचप्रमाणें ती आतांही अगदीं दीन गाय होऊन 'आपल्याला कोणी परमात्म्याकडे नेईल काय ?' अशी वाट पहात बसली आहे. हे देवतांनो, पूर्वी ह्या गाय झालेल्या पृथ्वीला आणि पृथ्वीवरील लोकांना बरोबर घेऊन तुम्ही ज्याप्रमाणें क्षीरसागरामध्यें निजलेल्या परमात्म्याकडे गेलां, तशाच प्रकारची वेळ आतांही आलेली आहे. आपण सर्वांनीं मिळून त्या जगन्नियंत्या परमेश्वराकडे धांव घेतली पाहिजे, आणि त्याची स्तुति गाऊन त्याला करुणस्वरानें आपल्या संकटाचें निवारण करण्याकरितां आळविलें पाहिजे. सृष्टि निर्माण करण्यांतील मूळचे तुझे जे हेतु ते सिद्धीस न जातां जगांत अन्याय, जुलूम, असत्य आणि अनन्वितपणा यांची भयंकर वाढ होऊन मनुष्यें मनुष्यांना खाऊं लागण्यापर्यंत मजल आलेली आहे, व त्यामुळें ह्या जगांत जो एक प्रकारचा समतोलपणा असावयाला पाहिजे आहे तो नष्ट होत आहे, व तूं चालूं केलेलें हें कालचक्र बिघडत चाललेलें आहे, तें नीट होणें फार जरूर आहे, असें आपण सविनय प्रार्थना करून परमेश्वराला कळविलें पाहिजे.

---

# जगाच्या उच्च
# रंगभूमीवरील नीच कृत्य : १

काळ : स्वतंत्र, ता. १५।४।१९०४

इंग्लिशांचें शांततेचें मिशन कर्नल यंग हसबंड यांचे नेतृत्वाखालीं तिबेटांत गेलें होतें. मिशनबरोबर सैन्य होतें व त्यांत हिंदी पलटणी होत्या. या सैन्यानें टयूना येथें तिबेटी सैन्यावर जय मिळविला. ल्हासाच्या लामानें रशियाशीं कारस्थानें करण्याऐवजीं आपल्याबरोबर संगनमत करावें असा या मिशनचा डाव होता.

स्थळः—हिमालय पर्वतांतील बर्फाच्छादित प्रदेश. वेळः—टयूनाच्या लढाईनंतरची एक काळोखी रात्र. टयूनाच्या लढाईत जखमी होऊन हॉस्पिटलच्या एका तंबूंत एक शीख शिपाई कण्हत पडला असतां तेथें डोलीवाले दुसरा एक गुरखा शिपाई आणून टाकतात.

शीखः—अरे, हा रे कोण ?

गुरखाः—जसा तूं, तसाच मी.

शीखः—तुझा देश कोणता ?

गुरखाः—मी नेपाळांतला.

शीखः—तुला जखम कोठें झाली आहे ?

गुरखाः—पायांत गोळी लागली आहे.

शीखः—तर मग, ज्या पायांनीं तुला तुझ्या नेपाळांतून या ठिकाणीं दुसऱ्याच्या हद्दीचें अन्यायानें आक्रमण करण्याकरितां आणिलें, त्या तुझ्या पायांना ही चांगलीच शिक्षा झाली असें म्हटलें पाहिजे.

गुरखाः—तुझें राहण्याचें ठिकाण कोणचें ?

शीखः—मी तिकडे पंजाबांत राहतों. तरवारीच्या घावानें माझा हात तुटला आहे.

गुरखाः—मग त्याबद्दल तुला दुःख वाटत नाहीं काय ?

शीखः—दुःख काय म्हणून वाटावें ! जसें करावें तसें भरावें ! मी दुसऱ्याच्या हद्दींत जाऊन चोरी करूं लागलों, त्याबद्दल त्यांनीं माझे हात कापले, तर मीं आतां काय म्हणून रडावें ?

गु०ः—तूं चोरी करीत होतास ?

शी०ः—नाहीं तर काय ? आपण कोठें आलों आहों आणि कशाकरितां आलों आहों, हें तुला माहीत आहे ? तूं हल्लीं कोठें आहेस सांग पाहूं ?

गु०ः—हा तिबेटचा मुलूख आहे.

शी०ः—ह्या दुसऱ्याच्या घरांत तूं काय म्हणून शिरलास ? तिबेटी लोकांनीं आपल्या घरांत येण्याविषयीं तुला परवानगी दिली होती ?

गु०ः—मी लढण्याकरितां आलों आहें.

शी०ः—तूं तिबेटी लोकांशीं कां लढतोस ? त्यांनीं तुझें काय केलें आहे ? तुझ्या बायकापोरांना मारण्याकरितां, तुझें घरदार जाळून टाकण्याकरितां, आणि शेतवाडीचा नाश करण्याकरितां हे तिबेटी लोक कधीं तुझ्या मुलखांत आले होते ? त्यांनीं तुझें असें काय वाईट केलें आहे कीं, ज्यासाठीं तूं त्यांची गर्दन छाटण्याला तयार झाला होतास ?

गु०ः—तिबेटी लोकांना याच्यापूर्वीं मीं काळे कीं गोरे पाहिलेसुद्धां नव्हते. त्यांनीं माझा अन्याय केला आहे असें मी विनाकारण कसें म्हणूं ?

शी०ः—मग तूं त्या निरपराधी लोकांचे खून पाडण्याकरितां कां आलास ?

गु०ः—माझी पलटण आली म्हणून मी आलों.

शी०ः—पण पलटण तरी कां आली ? पलटणींतील बाकीच्या शिपायांना तरी तुझ्यापेक्षां कांहीं जास्त कारण होतें असें नाहीं. आपण दुसऱ्यांना मारण्याकरितां कां जातों आणि तिबेटी लोकांनीं आपलें काय केलें आहे, ह्याच्याबद्दल पलटणींतील बाकीच्या शिपायांनीं कधीं विचार केला आहे काय ?

गु०ः—नाहीं ! आम्हां जनावरांना असा विचार करण्याची कधीं संवयच नाहीं. छूः म्हटलें कीं लचका तोडावयाचा, या अविचारांत आमचा जन्म गेला. साहेबांनीं पलटणीला हुकूम केला कीं, [illegible]

निघाली! जणुं काय आम्ही लग्नाला चाललों आहों!

शी०:—पण साहेब लोक तरी आपल्या पलटणींना थंडीवाऱ्यांतून आणि बर्फांतून जाण्याचा हुकूम कां करितात, हें तुम्हीं त्यांना कधीं विचारलें आहे काय?

गु०:—आम्ही कधीं विचारलें नाहीं. माझ्या आजापासून माझी ही तिसरी पिढी आहे. आम्ही तीन पिढ्या लढाया करीत आहों, पण आम्हीं अजून साहेबाला असा प्रश्न कधीं विचारला नाहीं.

शी०:—तीन पिढ्या लढाईचें काम चालविलें आहे! मग तर तुम्हीं बरेंचसें मोठें राज्य संपादन करून घेतलें असेल!

गु०:—या परमेश्वराच्या विस्तीर्ण जगांत आमच्या मालकीची वीतभर-सुद्धां जमीन नाहीं.

शी०:—तूं माझी थट्टा करीत आहेस.

गु०:—मी तुझ्या गळ्याशपथ खोटें बोलत नाहीं.

शी०:—तीन पिढ्या लढाया मारून वीतभरसुद्धां जमीन नाहीं, मग केलें तरी काय?

गु०:—आम्ही शौर्यानें हिंदुस्थानांतील किती तरी नेटिव्ह राजांचीं राज्यें इंग्रज बहाद्दरांना जिंकून दिलीं आहेत!

शी०:—तुमच्यासारखे परोपकारी पुरुष जगांत कोठेंही सांपडावयाचे नाहींत! ज्या नेटिव्ह राजांचीं राज्यें तुम्हीं बुडविलीं, त्यांनीं तुमचा बहुतकरून कांहींतरी फार मोठा गुन्हा केला असला पाहिजे. एरव्हीं तुम्ही धर्मयोद्धे निरपराध्यांवर शस्त्र चालवावयाचे नाहीं!

गु०:—छेः छेः! त्यांनीं आमचें कांहीं एक केलें नव्हतें. उलट ते आणि आम्ही एका देशांतले, एका धर्माचे, एका रक्ताचे आणि एका हाडामांसाचे होतों. आणि आमच्या अनेक पिढ्यांनीं अनेक वेळां त्यांचें अन्न खाल्लेलें होतें.

शी०:—असें असून परकीय देशांतून आलेल्या इंग्लिशांची बाजू घेऊन तुम्ही त्यांच्यावर उठलां, तेव्हां इंग्लिशांनीं तुम्हांला तशाच कांहींतरी मोठ्या जहागिरी, सरंजाम व इनामें करून दिलीं असलीं पाहिजेत. कारण, तुमच्या आशेवांचून उष्टें कोण चाटणार!

गु०:—माझ्या सगळ्या जहागिरी माझ्या गळ्यांत आहेत! इंग्रज बहाद्दरांनीं दिलेल्या बिल्ल्यांची माळ माझ्या गळ्यांत आहे! आपल्या राजेसाहेबांना आपलें राज्य वाढवावें असें नेहमीं वाटत असल्यावरून आम्हांला खर्चीं घालून ते आपल्या साम्राज्याचा विस्तार वाढवीत असतात!

शी०:—काय? हल्लीं ब्रिटिश साम्राज्याचें एक कोटीच्यावर जें क्षेत्रफळ आहे, तेवढें राजेसाहेबांना पुरत नाहीं काय? मनुष्याचा देह मोजून पाहिला तर तो साडेतीन हात भरतो. त्या एकट्या साडेतीन हातांसाठीं एक कोटीहून जास्त क्षेत्रफळाची जमीन! आणि तरी देखील तृप्ति नाहीं! एकट्या साडेतीन हातांसाठीं लोकांची इतकी जमीन बुचाडून काय करावयाचें आहे? एक कोटीहून जास्त क्षेत्रफळाची जमीन एकट्याला पुरेशी न होण्याला तो प्राणी कितीतरी विस्तीर्ण असला पाहिजे! बरें पण, तूं ही एक कोटीहून जास्त क्षेत्रफळाची अडचणीची जागा एका साडेतीन हातांच्या देहासाठीं जरा जास्त रुंद आणि ऐसपैस करण्यासाठीं जो या हिमालयाच्या बर्फावर मरणोन्मुख होऊन पडला आहेस, त्या तुला स्वतःला मेल्यावर पुरण्याची वेळ आली तर तुझ्या धडग्याला जास्त जागा मिळण्याची तूं कांहीं तरी तजवीज केलीच असशील? नाहीं बरें?

गु०:—जास्त जागा काय करावयाची आहे? राजा असो किंवा माझ्यासारखा रंक असो, मेल्यावर सगळ्यांना साडेतीन हात जागा बस्स होते. कोणाच्या ताब्यांत कोट्यवधि एकर जमीन असली तरी मेल्यावर तो साडेतीन हात जमिनीचाच मालक! अशी खरी स्थिति असूनही मनुष्यें लोभाला गुंतून अनन्वित कृत्यें करण्याला तयार होतात.

शी०:—आणि तुमच्यासारखे बैल असल्या अन्यायाच्या कामीं त्यांना मदत करण्याला तयार होतात! व अशानेंच आपण आपला देश दुसऱ्यांच्या हातांत देऊन आज आपण त्यांचे गुलाम होऊन बसलों आहों.

गु०:—आपण गुलाम झालों आहों, हें मला समजतें. कारण सोजीर आणि आपण सारखेच पराक्रम करीत असतां, किंबहुना त्यांच्यापेक्षां आपण जास्त धैर्य दाखवीत असतांही, आपल्याला पगार थोडा आणि त्रास जास्त! यावरून आपली गुलामगिरी आपल्याला सांगण्याला दुसरा कोणी नको; परंतु आपला देश म्हणून म्हणतात तो कोणता, आणि त्याच्यासाठीं आपण

काय केलें पाहिजे व तें कां केलें पाहिजे, याच्याबद्दल मला कांहीं समजत नाहीं.

शी०:—हिंदुस्थान हा आपला देश. हिमालय पर्वतापासून लंकेपर्यंत जो विस्तीर्ण आणि सुंदर प्रदेश आहे, तो आपला देश. त्या देशांत आपण सगळे जन्मास आलेले आहों. एका आईच्या पोटीं जशीं अनेक लेंकरें निपजतात, तसे आपण हिंदुस्थानांत निपजलों आहों, त्या आपण एकमेकांनीं एकमेकांचीं डोकीं फोडावींत, मद्रासेंतल्या लोकांनीं मुंबईतल्या लोकांना गोळ्या घालाव्यात, आणि मुंबईतील लोकांनीं पंजाबच्या लोकांना ठार मारावें, हा क्रम बरोबर नाहीं! जर तुझा भाऊ तुझ्यापुढें येऊन उभा राहिला आणि प्रत्यक्ष ब्रह्मदेवानें तुला सांगितलें कीं, ह्याच्यावर तूं गोळी घाल, तर तूं घालशील काय ?

गु०:—मी आपल्या भावाला कधींही ठार मारणार नाहीं.

शी०:—तूं तोंडानें मात्र असें म्हणतोस, परंतु तूं हजारों वेळां आपल्या भावांना गोळ्या घातल्या आहेस. कारण, हिंदुस्थानांतील लोक हे तुझे भाऊच होत. सर्व पशूंत अतिशय मूर्ख पशु म्हणजे बैल होय. त्या बैलाप्रमाणें तुमची ही कृति चालली आहे.

गु०:—आपल्या देशावर आम्ही नांगर फिरवीत आहों व त्या नांगराचें जोखड आम्ही आपल्या मानेवर वहात आहों, हें खरें. पण तो नांगर मी एकटाच ओढीत नाहीं. माझ्या जोडीला दुसरा एक बैल आहे, असें मला वाटतें.

शी०:—अलबत ! माझींही कृत्यें तुझ्यासारखींच आहेत. तुला मी दोष देतों त्यावेळीं मी त्या दोषापासून अलिप्त आहें असें मी मुळींच समजत नाहीं. आपले सगळयांचे हे दोष आहेत, आणि आपल्या सगळयांच्या हातून या चुका झालेल्या आहेत. मात्र दुःखाची गोष्ट एवढीच आहे कीं, आपल्या गुन्ह्याबद्दल तुला आणि मला जसें शासन मिळालें आहे, त्याप्रमाणें बाकीच्या गुन्हेगारांच्या पायांना अजून गोळ्या लागत नाहींत आणि त्यांचे हात अजून छाटले जात नाहींत. त्यांची बुद्धि पालटून ते असल्या कामापासून परावृत्त होतील, अशी आशा करणें व्यर्थ आहे. यासाठीं ते लंगडे आणि थोटेच झाले पाहिजेत ! अथवा आपल्या पातकांबद्दल ही शिक्षा फार थोडी होईल; हात, पाय तुटून न्यायदेवतेचें समाधान होणार नाहीं. आपलींच

पिलें आपण खाणारी असली ही अमंगळ किड्यांची जात समूळ उच्छिन्न आणि उध्वस्तच झाली पाहिजे ! रानोमाळ सैरावैरां उगवत चाललेल्या गवताचा वणवा पेटून त्याची राख झाल्यावांचून त्या क्षेत्रांत नवीन जोमाचें धान्य कधींही पिकावयाचें नाहीं !

[ इतकें बोलणें चाललें आहे तों हिमालयांत एक भयंकर वादळ उत्पन्न झालें व आकाशांतून भयंकर बर्फ कोसळूं लागलें. झंझावातानें हॉस्पिटलचा तंबू उडून गेला आणि हिमालयाच्या डोंगराची एक दरड एकाएकी कोसळून त्याखालीं वरील पात्रें दडपून या संभाषणाखेरीज दुसरा त्यांचा कांहीं एक मागमूस राहिला नाहीं. ]

---

# ब्लॅक होल : : : : ३

काळ : अग्रलेख, ता. २२।४।१९०४

ब्लॅक होलची कथा बनावट असल्याचें शाबीत झालें आहे; आणि हिंदुस्थानच्या अंधारकोठडीच्या भिंतीही फोडून काढल्या आहेत. आतां मरावयाची भीति नाहीं—जगण्याची हिंमत आहे.

कोणत्याही राष्ट्रामध्यें देशद्रोहाच्या विचाराचीं माणसें असणें ही फार दुर्दैवाची गोष्ट आहे. ज्या राष्ट्रांत असले विचार आहेत तें राष्ट्र कुजलेलें आहे, म्हणून समजावें; व कोणत्याही शरीरांत इतकें कुजलेलें आणि नासलेलें रक्त हितावह नाहीं. ज्या ज्या भागांत नासलेलें रक्त सांचलेलें असेल ते ते भाग छाटूनच टाकले पाहिजेत. भलभलत्या कल्पना, अनेक पिढ्यांपासून चालत आलेल्या राष्ट्रहितविघातक रूढी, जगाच्या वस्तुस्थितीविषयीं अत्यंत अज्ञान, मूर्खपणाच्या धर्मकल्पना आणि सामाजिक आचारविचार यांचें जोखड, स्वहिताबद्दलच्या कोत्या समजुती आणि सार्वजनिक हिताबद्दल अत्यंत अनास्था, हे गुण ज्या राष्ट्रांच्या अंगीं पिढीजाद खिळलेले आहेत, तीं राष्ट्रें गुलामगिरीची स्थिति अनुभवण्याला परिपक्व झालीं म्हणून समजावें. अशा राष्ट्रांवर इंग्लिशांनीं स्वारी केली म्हणून इंग्लिशांवर रागावण्याचें कांहीं कारण नाहीं. इंग्लिशांनीं तो देश जिंकला नाहीं तर दुसरे कोणीतरी तो जिंकणारच. ज्याच्या अंगांतील सद्‌गुणरूपी प्राण निघून गेला व जें प्रेत झालें तें जाळलें काय, किंवा पुरलें काय, किंवा कोणी गिधाडांनीं खाल्लें काय, सर्व सारखेंच. तें गिधाडांनीं खाल्लें नाहीं, तर कुत्रीं त्याचे लचके तोडतील. परंतु त्याचें स्वतःचें नशीब काय तें ठरलें गेलें! अज्ञान हा राष्ट्राचा भयंकर शत्रु होय. वस्तुस्थितीचा अपरिचय हे सर्व दुर्बळ राज्यांचे अपरिहार्य इंग्लिश होत. आपल्या

मूर्खपणाची आणि आपसांतील कलहाची तोफ आपल्याला जितकी मारते, तितका आपला संहार इंग्लिशांच्या कोणत्याही मशीन गननें केला नाहीं. आपण होऊन आपल्या चहाड्या इंग्लिशांना जितक्या सांगितल्या आहेत, तितक्या त्यांच्या अतिशय मोठ्या पगाराच्या इन्टेलिजन्स डिपार्टमेंटमधील ऑफिसरालासुद्धां कळल्या नसतील. आपण आपल्या राष्ट्रहानिकारक वेडगळ धार्मिक समजुती आणि समाजबंधनें यांनीं जितके खालावलों आहों, तितके इंग्लिशांच्या करांच्या ओझ्यांनीं खात्रीनें खालावलों नाहीं. इंग्लिश लोक हिंदुस्थानांतून पैसा नेतात अशी आपली ओरड आहे, परंतु आपण आपल्या हातानें जितका पैसा परदेशीं पाठवितों तितका ते खात्रीनें येथून नेत नसतील. आम्हांला एक काम धड करितां येत नाहीं. आपण चार लोक एकत्र झालों तर चौघांचें मिळून एकमत आपल्याला बनवितां येत नाहीं. आपल्यांत एकाचा दुसऱ्यावर विश्वास नाहीं. वरच्यानें खालच्याला फसवावें, आणि त्यानें आपल्या खालच्याला फसवावें, अशावर सगळा चरितार्थ चालला आहे. मरु प्रदेशांतील पाण्याप्रमाणें आपल्यामध्यें प्रामाणिकपणा अत्यंत दुर्मिळ झाला आहे. जन्मास यावें, खावें, प्यावें, लग्न करावें, संतति वाढवावी, आपण भीक मागावी आणि पोरांकडूनही भीक मागवावी व अखेरीस जाळण्याच्या पैशाचीही तरतूद न करितां मरून जावें, हे आज आपले चार पुरुषार्थ होऊन बसले आहेत. ब्राह्मण्याचा दिमाख मात्र उरला आहे. क्षत्रियांना वेदोक्त मात्र पाहिजे आहे. वैश्यांना धाडसी वाणिज्यवृत्तीची ओळखही उरली नाहीं. शूद्रांची मात्र दास्यवृत्ति कायम राहिली आहे. इतकेंच नव्हे, तर बाकीच्या सर्व गोष्टी बर्फमय प्रदेशांतील झाडांप्रमाणें चोहोंकडे वठत चालल्या असतां पूर्वी मन्वादिकांनीं फक्त शूद्रांकरितां म्हणून राखून ठेवलेल्या दास्यवृत्तीचा अतिशय जारीनें फैलाव होऊन ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य हे सुद्धां ह्या दास्यवृत्तीचा सुखानुभव घेऊं लागले आहेत. अशी आज आपल्या चातुर्वर्ण्याची स्थिति आहे. अल्पवयांत आया झालेल्या मुली आणि ब्रह्मचर्याबरोबरच गृहस्थाश्रमामध्यें पाऊल टाकलेले बाप, धर्माची ओळख विसरलेले ऋत्विज, कापसाच्या गादीवर बसलेले राजे आणि आपल्या राजाचे अहित चिंतणाऱ्या प्रजा, सरकारी पगारांनीं हातपाय बांधलेले विद्वान् लोक आणि अज्ञानानें हातपाय बांधलेले अशिक्षित लोक, अकालीं पडणारा पाऊस आणि जन्मास येणारी संतति,

अल्पायुषी प्रजा, पाण्यावांचून डोळे, जोरावांचून मनगटें, रुंदीवांचून छात्या, बुद्धीवांचून डोकीं, चपळपणावांचून पाय व साहसावांचून मनें, अशा प्रकारचे उद्वेगजनक आणि डोळ्यांतून टिपें ओढून काढणारे देखावे आपल्यामध्यें पदोपदीं दृष्टीस पडतात. आपल्या स्थितीचा विचार कोणीही करीत नाहींत, जे कोणी करितात त्यांना त्याजवर काय उपाय योजावा हें समजत नाहीं, ज्यांना समजतें त्यांच्या अंगांत ते उपाय घडवून आणण्याची ताकद नाहीं, आणि ज्यांच्या अंगांत ताकद आहे त्यांच्यावर कोणाचा विश्वास नाहीं. यामुळें एखाद्या कड्यावरून जसें पाणी खालीं पडावें, त्याप्रमाणें आपण सर्व-जण मूर्खपणाच्या ओघांत सांपडून वाहत जाऊन परराज्याच्या कड्याखालीं एकापाठीमागून एक उड्या घेत आहों. एखादी क्षुल्लक गोष्ट पाहण्यासाठीं किंवा ऐकण्यासाठीं हजारों लोक एकत्र जमतात; परंतु कोणी अधिकाऱ्यानें दरडावल्याबरोबर दहांपेक्षां आणखी जास्त दिशा असत्या तर बरें झालें असतें अशी दशा करून सोडतात! स्थैर्य कोणाच्याच डोक्यांत नाहीं. सगळ्यांच्या खांद्यांवर मेंढरांचींच डोकीं चिकटविलेलीं! दुसऱ्यांचें धोरण काय? ते आपल्याला कां फसवितात? आपलें काय चुकतें आहे? आपण त्याला काय केलें पाहिजे? हे विचार कोणाच्याही मनांत नाहींत. अपमानाबद्दल द्वेष, गुलामगिरी-बद्दल खंती, उत्कर्षाबद्दल महत्त्वाकांक्षा आणि स्वाभिमानासाठीं स्फुरण, या गोष्टींचा खप आपल्यामध्यें इतका कमी झाला आहे कीं, एखाद्या व्यापाऱ्यानें एखादी लहान आगबोट या मालानें भरून आपल्या किनाऱ्यावर आणिली तर ती देखील त्याला जशीच्या तशीच माघारी न्यावी लागेल. आपण निःपक्षपातबुद्धीनें आपल्या कोणत्याही संस्थांचें परीक्षण केलें, तर आपण प्रत्येक बाबतींत अजून फारच मागें आहों असें दिसून येतें, व तेणेंकरून धैर्य खचून आपल्याकरितां या जगांत कांहीं एक सुख नाहीं असें वाटूं लागतें, सर्वत्र अंधार पसरलेला दिसतो, दीर्घ आयुष्याचा कंटाळा येतो, प्लेगसारखी सार्वजनिक रोगाची सांथ आली म्हणजे आनंद होतो, आणि हतभाग्य लोकांकरितां निदान मृत्यूचें तरी सुख परमेश्वरानें ठेविलें आहे म्हणून त्याचे आभार मानावे असें वाटतें. जिकडे पहावें तिकडे आंधळ्याच्या दृष्टीला ज्याप्रमाणें काळोख त्याप्रमाणें आपल्या दृष्टीला आपलीं वैगुण्यें दिसतात. आपले उद्योगधंदे कितीतरी मागसलेले! कारखाने, यंत्रशास्त्र, मोठाल्या प्रमाणावर मोठालीं कामें, यांचा तर आपल्या-

मध्यें मागमूसच नाहीं. आपली चित्रकला चुकीची, आपली रंगकला अमनो-वेधक, आपलीं नाटकें गैराशिस्त, आपली कविता बेचव, आपली व्यवस्था अव्यवस्थित, आपली शिस्त बिनटापटिपीची, असा चोहोंकडून बुद्धिहीनत्वाचा भयंकर अंमल माजलेला आपल्या दृष्टीला पडतो. शितावरून हंड्याची परीक्षा करण्याकरितां, उदाहरणार्थ अर्वाचीन नाटकांतील एखादा कवि घेऊन राष्ट्राच्या कोणत्या कल्पना त्याच्या काव्यांत प्रतिबिंबित झाल्या आहेत, आणि त्याच्या काव्यावरून राष्ट्राच्या काय कल्पना असाव्या असा दुसऱ्यांचा तर्क होईल, याविषयीं विचार करूं लागल्यास विचार करणाऱ्याच्या मनांत लज्जेशिवाय दुसरा कोणताहि मनोविकार उत्पन्न होणें शक्य नाहीं. राष्ट्रांतील चित्रकार राष्ट्राची काय कल्पना व्यक्त करीत आहेत आणि कवी आपल्या राष्ट्राचे काय विचार जगापुढें मांडीत आहेत, त्या विचारांची योग्यता कितपत आहे, ते विचारांच्या महत्त्वाच्या थर्मामीटरमध्यें किती वर चढतील, या प्रश्नांना समाधानकारक उत्तरें मिळण्याला जागा नाहीं! इतर राष्ट्रांतील विचारप्रागल्भ्य जर पोक्त मनुष्यांचें आहे असें म्हटलें तर आपल्यामधील कित्येक अर्वाचीन कवी व चित्रकार यांची कृति म्हणजे निवळ अर्भकांची बडबड आहे असेंच म्हणावें लागेल. आपल्यांतील वैद्य काय करीत आहेत, आपल्यांतील वकील काय करीत आहेत, आपले इंजिनिअर्स काय करीत आहेत, आपले शिपाई काय कामें करीत आहेत, आणि आपले खलाशी कशांत व्यग्र आहेत, इकडे पाहिलें म्हणजे आपल्या राष्ट्राच्या फुटलेल्या कपाळावरील खोक आपल्याला चांगली दिसूं लागते. आपल्या राष्ट्रांतील प्रत्येक जातीचे आणि धंद्याचे लोक या जीवनकलहाच्या जिन्याच्या अगदीं शेवटच्या पायरीवर धडपडत पडलेले आहेत. आपले बिनशिकलेले देशी वैद्य आपल्या कुलपरंपरागत आलेल्या आजोबांच्या बटव्याच्या पलीकडे कधींहि न जातां सगळ्या जगांतील रसायन-शास्त्राचें संपुटीकरण आपल्या एका बटव्यामध्यें करीत आहेत; आणि आपले शिकलेले डॉक्टर त्यांचीं विलायती औषधें आणून तीं खपविण्याचें एजन्सीचें काम करीत आहेत. दुसऱ्यांच्या कलहावर आपल्या कुटुंबाची एकी आणि दुसऱ्याच्या कर्जबाजारीपणावर आपली श्रीमंती अवलंबून ठेवून आपल्यांतील वकील स्वदेशबांधवांत अनीतीचा आणि कोर्टफीच्या तिकिटांचा फैलाव करण्याकरितां झटत आहेत. पाहिल्याबरोबर डोळे फिरून जावेत आणि हें काम

कसें केलें असेल याच्याबद्दल बघणाराची अक्कल गुंग होऊन जावी, अशा प्रकारचीं प्रतिसृष्टितुल्य कामें करण्याच्या ऐवजीं खडी फोडणारांच्यावर देखरेख करण्याचें अत्यंत जबाबदारीचें काम आपले इंजिनिअर्स बजावीत आहेत. आजचें आपलें शिपायाचें काम म्हटलें म्हणजे शिरस्तेदारापुढचा कागद साहेबापुढें आणि साहेबापुढचा कागद शिरस्तेदारापुढें नेऊन ठेवण्यापलीकडे कांहीं एक नाहीं. आणि परदेशचे दर्यावर्दी अटलांटिक महासागरांतून हिंदीमहासागरांत आणि हिंदीमहासागरांतून पॅसिफिक समुद्रांत तेथील लाटांशीं आणि वादळांशीं आपल्या आगबोटींनीं टकरा देत सगळ्या जगाचा व्यापार चालवीत असतां आमचे खलाशी हातभर रुंदीच्या होड्यांत बसून किनाऱ्याजवळच्या ढोंपरभर पाण्यांत मासे मारीत किंवा त्यांच्या आगबोटीवरील तेलकट यंत्रें सुताच्या बोळ्यांनीं साफ करीत पोटाची खांच भरीत आहेत. असा जिकडे तिकडे अधःपात झालेला आहे.

अशा स्थितींत आशेला कोठें शोधावें ? ती कोठें आहे ? ती कोणाला सांपडेल ? नेटिव्ह राजांच्या दरबारांत ती नाहीं असें पुष्कळ लोक सांगतात; आणि नेटिव्ह राजेच आशेच्या शोधासाठीं सामान्य लोकांमध्यें फिरत असतात. तेव्हां त्यांच्यांत आशा काय सांपडावयाची आहे ? भाताच्या दाण्यांतून तांदुळाचा कण एकदांच निघतो, त्याप्रमाणें शिंदे, होळकर, वगैरे घराण्यांच्या भाताच्या दाण्यांच्या पोटांतून जनकोजी शिंदे, अहल्याबाई होळकरीण, वगैरे तांदुळाचे कण एकदां निघाले आतां मागें जें कांहीं राहिलें आहे, तें निवळ फोलकट आहे, तो कोंडा आहे. त्या कोंड्यामधून आतां दुसरा दाणा निघेल ही आशा व्यर्थ आहे. एखाद्या सोसाट्याच्या वाऱ्यानें यावें, आणि या फोलकटांना उडवून न्यावें, एवढेंच यांच्यासंबंधीं आतां उरलें आहे. पूर्वीचे सरदार आणि जहागीरदार यांच्यामध्येंही आशा सांपडणें दुर्घट आहे. एखाद्या एजंटनें, गव्हर्नरनें किंवा व्हाइसरॉयनें दरबार भरविला तर ज्यांचे टोळांच्या-प्रमाणें थवेच्या थवे उजव्या बाजूच्या खुर्च्या भरून काढतात ते देशाच्या उन्नतीला काडीइतकेही उपयोगी नाहींत. पूर्वी मोंगलाईत किंवा पेशवाईत यांना इनामें आणि जहागिरी होत्या तें ठीक होतें. कारण, त्याबद्दल त्यांच्यापासून चाकरी करून घेण्यांत येत होती. परंतु आतां सरकारच्या नवीन पद्धतीप्रमाणें या बारभाई खेतीपासून लष्करी चाकरी घेणें म्हणजे आपल्या

सुव्यवस्थित राज्यव्यवस्थेमध्यें जास्त घोटाळा करून घेणें होय, अशी स्थिति असल्यामुळें यांची चाकरी सरकार घेत नाहीं. परंतु आपण यांची चाकरी घेत नाहीं म्हणून यांचीं सगळींच जातइनामेंही काढून घेतलीं तर हे पूर्वीचे गर्भश्रीमंत आतां भिकार होऊन कदाचित् असंतुष्ट होतील, तेव्हां लांचा-दाखल यांच्याकडे पूर्वींचीं कांहीं इनामें ठेवून सरकारानें यांना आपले मिंधे करून ठेविलें आहे. त्या इनामांच्या पायीं देशाचा जो पैसा खर्च होत आहे त्यापासून स्वराज्य असतें तर चाकरीच्या रूपानें कांहीं फायदा झाला असता. परंतु हल्लीं परराज्य असल्यामुळें त्यांच्या चाकरीचा फायदा देशाला न मिळून देशाचे इतके पैसे निवळ फुकट जातात, व फिरून आपल्याच देशांतील पैशांनीं हे इतके लोक ब्रिटिश सरकारचे मिंधे होतात, हा कांहीं देशाचा लहान तोटा नव्हे. येथें काम करून विलायतेस गेलेल्या युरोपियन अधिकाऱ्यांच्या पेन्शनचा पैसा हिंदुस्थानचा बुडीत खर्च आहे, अशी नेहमीं ओरड करणाऱ्या लोकांच्या लक्षांत हा स्वदेशीं होत असलेला बुडीत खर्च येत नाहीं, हें मोठें आश्चर्य आहे. त्यांतल्या त्यांत युरोपियनांनीं परदेशांत पैसा नेण्यापेक्षां आपलेच लोक आपल्या देशांत त्याचा उपभोग घेत आहेत, यामुळें आपण कोणी याबद्दल गवगवा करीत नाहीं इतकेंच काय तें. बाकी दोन्ही बाबी सारख्याच! सारांश, युरोपियन पेन्शनरां-प्रमाणेंच जे सरकारचे मिंधे झालेले, त्यांच्यापासून देशाला आशा काय अस-णार? जशी ही जहागीरदारांची स्थिति तशीच देवस्थानांची स्थिति झालेली आहे. देवासाठीं दिलेल्या मिळकती खासगी उत्पन्नें होऊन बसलीं आहेत, आणि अनायासें पैसे मिळत असल्यामुळें धार्मिक किंवा व्यावहारिक बाबतींत कांहीं एक उद्योग न करितां अनेक लोक आळशी, स्वैराचरणी, धर्मभ्रष्ट, दुर्व्यसनी आणि कुलकलंक होऊन बसलेले आहेत. इंग्रज सरकारला हिंदु-स्थानांत आपलें राज्य कायम राखावयाचें आहे, म्हणून कोणाच्या धर्मांत हात घालावयाचा नाहीं, असा त्यांनीं नियम केला आहे. धर्मांत हात घाला-वयाचा नसल्यामुळें देवस्थानांच्या उत्पन्नांत ठेवावयास पाहिजे तशी व्यवस्था त्यांना ठेवतां येत नाहीं व सरकारी दाब नसल्यामुळें धर्मसंस्थानें आणि देव-स्थानें यांच्यामध्यें पूर्ण बेबंदशाही माजलेली आहे. पण सरकार या संस्थानां-कडे जो पैसा खर्च करितें तो कोठला? आमच्याच देशांतील. पण सरकार

आमच्या देशाचा पैसा खर्च करीत असून त्याच्या योग्य विनियोगाकडे योग्य तऱ्हेनें पहात नसल्याकारणानें देशाचे पैसे मात्र खर्च होऊन धर्माभिवृद्धीपासून देशाचा जो फायदा व्हावयाचा तो न होतां अधर्मापासून देशाचें उलट नुकसान मात्र होत आहे. अशी चोहोंकडे स्थिति असल्यामुळें आशेला कोठेंही जागा नाहीं. फ्रान्समध्यें मागें जी पहिली राज्यक्रांति झाली त्यावेळींही फ्रान्समध्यें अशीच स्थिति झाली होती. तिकडीलही सरदार, जहागीरदार, धर्माधिकारी आणि देवस्थानांचे अधिकारी आपल्या इकडच्या प्रमाणेंच स्वार्थलोलुप, कर्तव्यपराङ्मुख, अनाथांबद्दल बेफिकीर व स्वतःच्या सुखलेशासाठीं इतरांना अत्यंत पीडा देणारे, धर्मभ्रष्ट आणि धर्माच्या रूढीच्या नांवाखालीं अघोर अधर्म आणि अनन्वित पातकें करणारे असे झाले होते. तशी हुबेहूब स्थिति आज आपल्यामध्यें झाली आहे. राष्ट्राचा प्रत्येक अवयव नासलेला, कुजलेला आणि सडलेला झाला आहे. एकाही भागामध्यें ताकद उरली नाहीं. प्रत्येक कामांत आणि धंद्यांत इंग्लिशांच्या उच्छिष्टावर आपला चरितार्थ चालला आहे. स्वतःची कल्पकता, बुद्धीचा जोर, सामर्थ्याचा उपयोग, इत्यादि गोष्टी कोठेंच दिसत नाहींत. हिंदुस्थानांतील लोकांची म्हणून जी एक कांहीं विशिष्ट मर्यादा ठरलेली आहे, तिच्या आंतमध्येंच नाचण्यांत जो तो भूषण मानीत आहे. तिचें उल्लंघन करण्याचें धैर्य एकामध्येंही नाहीं. एक विशिष्ट उंची ठरवून दिलेली आहे, तेथपर्यंत अचाट बुद्धीचे आणि विलक्षण देणगीचे हिंदुस्थानांतील महापुरुष उंच वाढतात; पण त्याच्यावर डोकें काढण्याची महत्त्वाकांक्षा किंवा समर्थता एकामध्येंही नाहीं. सगळें राष्ट्र रेमेडोक्यांचें! सगळे लोक एका साच्यांतून काढलेले! कांहीं तरी अचाट, अद्‌भुत आणि विलक्षण कृत्य करणारा एकही मनुष्य नाहीं. तशी कोणाची बुद्धिही नाहीं. सामाजिक रूढींचीं बंधनें फार प्रबळ झालीं आहेत, आणि त्यांनीं लोकांचे हातपाय जखडून टाकिले आहेत, अशी एक सुधारकांची ओरड आहे. कांहीं विलक्षण सामाजिक रूढींनीं आमचे हातपाय जखडून टाकिले आहेत, हें तर खरेंच; परंतु कित्येक राजकीय रूढींचीं बंधनेंही तितकींच दृढ उत्तरोत्तर होत चाललीं आहेत, व त्यामुळें आपण सामाजिक रूढींच्या दाबाखालीं जितके दडपले जात आहों तितकेच वेडगळ राजकीय रूढींच्या दाबाखालींही दडपले जात आहों. अशीं अनेक कारणें चोहोंकडून

हिंदुस्थानांतील लोकांवर आपापले परिणाम घडवून आणीत असल्यामुळें, जिकडे तिकडे सर्व सपाट झालेलें आहे. सामान्यपणाशिवाय दुसरें कोठें कांहीं नाहीं. अद्भुत शक्तीचा किंवा बुद्धीचा उंचवटा कोठेंच नाहीं. कोणत्याही कामांत का होईना, साहस आणि अद्भुतपणा हीं पाहिजेत. पण हिंदुस्थानांत तसें कांहीं नाहीं. सुधारक धर्मावर आणि समाजावर पूर्वी हल्ला करीत असत; तेंच का काम होईना, पण त्यांत देखील अचाटपणा पाहिजे होता. पण सगळे सुधारकसुद्धां रेमेडोकेच! सुधारणेच्या बाबतींतच का होईना पण एखाद्यानें एखादें छातीठोक काम केलें आणि सर्व जगाला थक्क करून सोडिलें असें उदाहरण नाहीं. करूं कीं नको करूं, केलें तर समाज काय म्हणेल आणि न केलें तर आपले सुधारक मित्र काय म्हणतील, अशा बुच-कळ्यांत पडून 'घुणाक्षरन्यायानें' एखादें सुधारणेचें काम झालें तर सुधारक, आणि नाहीं झालें तर जुन्याचा अभिमानी, अशी धरसोडीचीं सगळीं कामें चाललीं आहेत. तात्पर्य, खरें धैर्य कोठें नाहीं. अचाट कृत्यें करण्याची हिंमत आणि इच्छा कोणामध्यें नाहीं. कुचरोटी, कुचलंगोटी असें करून कसें तरी पोट जाळावें, याच्यापलीकडे दीर्घोद्यम नाहीं. याचा खिसा कातर आणि त्याचें पागोटें घे, इत्यादि एकमेकांतील लबाड्यांच्या पलीकडे दृष्टीचा पल्ला गेलेला नाहीं. आहे तें राखावें याच्या पलीकडे नवीन संपादन करण्याची धाडसी महत्त्वाकांक्षा नाहीं. सगळे सरडे बनलेले आहेत, आणि आपल्या समोरच्या कुंपणापर्यंत आपण धांवत गेलों म्हणजे आपण शतकृत्य केलें, याच्या पलीकडे जगांतील महात्म्यांच्या महत्कृत्यांची ओळख नाहीं. सर्व शेणांत सांपडलेले किडे आहेत. त्या शेणांतच घरें घ्यावीं, वाडे बांधावे, बागांतून हवा खावी, असले क्षुद्र उद्योग जिकडे तिकडे चालू आहेत. परंतु शेणाची घाण कोणाच्याही नाकाला येत नाहीं. अत्यंत हीन स्थितीमध्यें पूर्ण संतोष नांदत आहे. तीस कोटी डोक्यांपैकीं कांहीं दहा पांच डोक्यांतील मेंदूंतसुद्धां कांहीं असामान्यपणाचे, वैलक्षण्याचे आणि अद्भुतपणाचे तंतु नसावेत, इतकी विलक्षण सृष्टि हिंदुस्थानाकरितां अलीकडे देवानें मुद्दाम केली आहे, असें असेल तर हा परमेश्वराचा मोठा रोषच होय. कदाचित् कांहीं डोक्यांतून असे तंतु असतीलही; परंतु त्यांना कधीं चालना न मिळाल्यामुळें अंगांतून बाहेर ओढून काढलेल्या नारूप्रमाणें ते बहुधा मृतप्राय झाले असावेत;

किंवा रावणाच्या घरच्या नवग्रहाप्रमाणें ते कदाचित् उपडेही पडले असतील ! कांहींही असलें तरी आजकाल हिंदुस्थानांत मठ्ठ डोक्यांचें आणि मंद मेंदूचें साम्राज्य माजलें आहे. त्यामुळें लोकाच्या जीवनक्रमामध्यें कांहीं नवीन असें उरलेंच नाहीं. पुढील दिवसांबद्दल कांहीं आशा नाहीं. लोकांना आयुष्याचे दिवस बेचव, नीरस आणि कंटाळवाणे वाटतात. आजपासून पुढें दहा दिवस काय काय गोष्टी होतील हें ज्योतिषशास्त्राच्या माहितीच्या गंधावांचूनही प्रत्येकाला सांगतां येईल, अशी स्थिति आहे. कारण, दिवस उगवणें, निजून उठणें, दुपार होणें, जेवणें, वगैरे ठराविक गोष्टींपलीकडे दुसरें कांहीं व्हावयाचें नाहीं, हें ठरलेलेंच आहे. कोणी नियमानें आपली डायरी लिहिणारा असला आणि त्याची वर्षानुवर्षाची डायरी चाळली तरी जेवणें, खाणें, बसणें, बोलणें, निजणें, उठणें यांच्याहून जास्त महत्त्वाची गोष्ट त्यामध्यें कधींही आढळावयाची नाहीं. असा लोकांच्या वर्तनक्रमामध्यें हाताच्या कर्तव्यांत आणि डोक्याच्या गतींत एक प्रकारचा कंटाळवाणा एकसारखेपणा भरलेला असून तो सर्वांना हिंदुस्थानांतील आयुष्याचा वीट आणि तिटकारा आणीत चालला आहे. जेव्हां मनुष्यांच्या डोक्यांत असा मंदपणा उत्पन्न होतो, तेव्हां धरणीकंप, ज्वालामुखीचे स्फोट, उल्कापात, भयंकर मेघगर्जना, विद्युत्पतन, अग्निप्रलय वगैरेसारख्या आधिभौतिक सृष्टिचमत्कारांनीं त्यांच्या झोंपी गेलेल्या मेंदूमध्यें कधीं कधीं एकदम उजेड पडतो. परंतु हिंदुस्थानांत लोकांना जागृत करण्याला असेंही कोठें होत नाहीं. त्यामुळें सगळी गति कुंठित झाली आहे. नासलेल्या तळ्याचें पाणी कुजून आणि किडे पडून जसें स्तब्ध आणि गति-शून्य होतें, तशी स्थिति झाली आहे. एखाद्या मोठ्या शहरांतल्या अतिशय रहदारीच्या स्मशानांत प्लेग, पटकी, वगैरेसारख्या रोगांच्या हंगामांत प्रेतांची अतिशय गर्दी जमते, तरीपण त्यांच्यांत कांहींएक हालचाल नसते, तद्वत् देखावा दिसत आहे. चोंहोकडून कोंडल्यासारखें दिसतें. वाट कोठेंच पडत नाहीं. नजरेच्या टप्प्याहून अतिशय उंच अशा निराशेच्या भिंतींनें चोंहोंकडून वेष्टिलें आहे. कांहीं केल्यानें कोंडी फुटत नाहीं ! आणि स्तब्ध झालेल्या पाण्याला ओघ फोडितां येत नाहीं ! सर्व रेमीडोकीं माणसें आणि जिकडे जावें तिकडे थोडयाशा अंतरानंतर प्रतिबंधाचे दरवाजे ! “ काय करावें, कसें करावें ” ही विवंचना सगळ्यांच्या डोक्यांत चाललेली आहे, परंतु तोंड मात्र

सांपडत नाहीं. रासेलसला जसें चोंहोकडून डोंगरांनीं कोंडून टाकिलें होतें, तशी अवस्था झाली आहे ! प्रत्येक प्रयत्नांत निराशा होत आहे. प्रत्येक कामांत अपयश येत आहे. निरुपाय झाला आहे, उमेद उरली नाहीं, उत्साहाचें नांव नाहीं, हात टेकले आहेत, कंबर खचली आहे आणि सभोंवतालच्या डोंगरांचीं शिखरें जास्त जास्तच उंच आणि अगम्य होत चाललीं आहेत ! कलकत्त्यास आमच्या सुजाउद्दवाल्यानें कांहीं शंभर सवाशें युरोपियन लोकांना " ब्लॅक होल " नामक एका लहानशा खोलीमध्यें कोंडून ठेविलें होतें, अशी इतिहासामध्यें एक गोष्ट आहे. सुजाउद्दवल्याच्या या अघोर कृत्याचा परमेश्वर बहुधा त्याच्या हल्लींच्या देशबांधवांवर सूड उगवीत आहे, असें दिसतें ! आपण हल्लीं तशाच प्रकारच्या एका ब्लॅकहोलमध्यें गुदमरून चाललों आहों. आपल्या दृष्टीला काळोखाशिवाय दुसरें कांहीं दिसत नाहीं, आपल्या हाताला आपल्याला कोंडणाऱ्या भिंतीवांचून दुसरें कांहीं लागत नाहीं, आपल्या कानांना आपल्या शेजाऱ्यांच्या किंकाळ्यांवांचून दुसरें कांहीं ऐकूं येत नाहीं, आणि आपल्या मनाला निराशेवांचून दुसरें कांहीं भासत नाहीं. तान्हेनें तोंडें कोरडीं पडलीं आहेत, ओरडून घसे बसले आहेत, भुकेनें पोटें खपाटीला गेलीं आहेत, गाल बसले आहेत, डोळे खोल गेले आहेत, दातांच्या कवळ्या पुढें आल्या आहेत, पाय गार पडले आहेत, हातांतील नाड्या सुटत चालल्या आहेत, श्वासोच्छ्वासांत चलबिचल उडाली आहे, लागलेल्या घरघरीच्या आवाजांत मंदत्व येऊं लागलें आहे, नाकापुढील कापूसही हलेनासा झाला आहे. अशा स्थितींत या ब्लॅक होलच्या भिंती आपण फोडिल्या तरी पाहिजेत, किंवा यांच्या आंत आपण मेलें तरी पाहिजे. याशिवाय तिसरा मार्ग नाहीं !

---

# वुल्फ टोन : : : ४

काळ : अग्रलेख, ता. २९।४।१९०४

● देशभक्ताला हातकड्या हेंच भूषण—देशभक्त हा गुन्हेगार नसून बंडखोर आहे.

देशद्रोही लोकांनो, तुम्ही हें वुल्फ टोनचें चरित्र वाचूं नका; कारण, ह्यापासून स्वदेशद्रोह कसा करावा हें तुम्हांला यत्किंचित्‌ही समजणार नाहीं. सरकारी सेवकजनहो, तुम्ही हें वाचूं नका; कारण, सरकारची खुषामत कशी करावी याबद्दल यांत एक अक्षरही नाहीं. आपसांत भांडणाऱ्या लोकांनो, तुम्ही हें वाचूं नका; कारण, तुमच्या धंद्याला उपयोगी पडण्यासारखें ज्ञानभांडार यांत नाहीं. हे कूपमंडूकहो, तुमच्याकरितां हें चरित्र नव्हे; कारण, ह्यामध्यें कल्पनांचा संकुचितपणा नाहीं. त्याचप्रमाणें हे अज्ञानांतच गोडी मानणाऱ्या लोकांनो, धर्माच्या व समाजरूढीच्या खोट्या कल्पनांनीं बद्ध झालेल्या लोकांनो, म्युनिसिपालिट्या, कायदेकौन्सिलें व पार्लमेंटें यांमधून सभासद पाठवून आपलें डोकें वर काढूं पाहणाऱ्या भ्रमिष्ट लोकांनो, स्वदेश अत्यंत निकृष्टावस्थेला जाऊन पोंचला तरी आपला पिढीजाद मूर्खपणा न सोडतां अत्यंत निंद्य व्यसनांमध्यें निमग्न होणाऱ्या लोकांनो, तापलेल्या तव्यावर उभे केलें असतांही बर्फाप्रमाणें थंड-गार असणाऱ्या लोकांनो, आणि अतिशय खोल तुटलेल्या कड्याच्या कांठा-वरही नानाप्रकारची चैन करणाऱ्या लोकांनो, हें चरित्र तुमच्याकरितां नव्हे; कारण, तुमच्या चरितार्थाच्या ज्या विद्या आहेत त्या वुल्फ टोनला कांहींच अवगत नव्हत्या.

तो एक साधा व सरळ देशभक्त होता. १७६४ च्या जून महिन्यांत तो आयर्लंडमधील डब्लिन शहरीं जन्मास आला. त्याच्या बापाचा धंदा

गाड्या नीट करण्याचा होता. त्यानें डब्लिन येथील ट्रिनिटी कॉलेजमध्यें जाऊन चांगला विद्याभ्यास केला व पुढें कायद्याची परीक्षा देऊन तो १७८९ मध्यें लंडन येथें वकिलीचें काम करूं लागला. परंतु त्याचें लक्ष वकिलीच्या कामामध्यें नसून आपला आयर्लंड देश स्वतंत्र कसा करितां येईल या गोष्टीमध्यें गुंतून गेलें होतें. १७९१ सालीं युनायटेड आयरिशमेनची एक सोसायटी स्थापन झाली. त्या सोसायटीच्या उत्पादकांपैकीं वुल्फ टोन हा एक होता. कायदेशीर रीतीनें भांडून कॅथॉलिक लोकांवर होत असलेले जुलूम सरकार-कडून दूर करून घ्यावे, असा ह्या संस्थेचा पहिला उद्देश होता. परंतु पार्लमेंटमध्यें कायदेशीर रीतीनें बडबड करून किंवा अर्ज करून कांहींएक फायदा व्हावयाचा नाहीं, ही गोष्ट त्यावेळीं प्रत्येक आयरिश मनुष्याच्या अंतःकरणावर अतिशय स्पष्टपणें ठसत चालली होती याच सुमाराला अमेरिकेंतील स्वातंत्र्याची लढाई नुक्तीच होऊन गेली होती व फ्रान्समधील राज्यक्रांतीची धामधूम तर चालूच होती. असलीं दोन ठळक उदाहरणें डोळ्यापुढें असतां इंग्लिशांच्या गुलामगिरीला कंटाळलेल्या तरुण आयरिश लोकांच्या मनांत काय तरंग आले असतील याची कल्पना करणें फारसें कठीण नाहीं. आयर्लंडमधील सर्व लोकांचीं मनें अगदीं क्षुब्ध होऊन गेलेलीं होतीं. अशा वेळीं वर सांगितलेली जी कायदेशीर काम करणारी संस्था होती, तिचें स्वरूप बदलून ती एक राज्यक्रांतिकारक गुप्त मंडळी बनली. वुल्फ टोन आणि त्याचे साथीदार ह्या संस्थेंतील प्रमुख झाले, व त्यांनीं आयर्लंडमधील ब्रिटिश सत्ता कशी घालवून लावावी याबद्दल विचार सुरू केला. १७९४ च्या सुमाराला फ्रेंच लोक राज्यक्रांतीनें नवीन मिळालेल्या स्वातंत्र्याच्या भर अमदानीमध्यें होते व त्यामुळें इंग्लंडावर हल्ला करून इंग्लिशांना पादाक्रांत करावें असे त्याचे विचार चालले होते. या कामीं आपल्याला आयर्लंडकडून किती मदत होईल हें जाणण्याकरितां फ्रान्सनें एक गुप्त हेर पाठविला होता. त्याच्याशीं वुल्फ टोन याचा संबंध आहे असें ब्रिटिश सरकारच्या दृष्टोत्पत्तीस आलें. तेव्हां सरकारचा दोष टाळण्यासाठीं तो १७९५ च्या मे महिन्यांत अमेरिकेंतील फिलाडेल्फिया शहरीं निघून गेला. परंतु तेथें जाऊन तो स्वस्थ बसला नाहीं. तेथें असलेल्या फ्रेंच वकिलाला भेटून त्यानें आयर्लंडच्या दैन्यावस्थेची हकीकत सांगितली, व १७९६ च्या जानेवारी महिन्यांत

आयर्लंडची दाद लावण्याकरितां तो स्वतः पॅरिसमध्यें जाण्याकरितां निघाला. अमेरिकेमध्यें त्याची चांगली सोय जुळली असती व तेथें त्याला पुष्कळ पैसा मिळून अतिशय सुखानें राहतां आलें असतें; परंतु आपल्या आयर्लंडासाठीं आपल्या सर्व सुखावर लाथ मारून जगणें हें आपलें कर्तव्यकर्म आहे, असा त्यानें निश्चय केला व त्याच्या शूर पत्नीनेंही त्याला या कामीं अनुमोदन दिलें. पॅरिसमध्यें गेल्यावर तेथील अधिकाऱ्यांच्या भेटी घेऊन वुल्फ टोननें त्यांना असें सांगितलें कीं, तुम्ही फक्त वीस हजार सैन्य आयर्लंडमध्यें पाठवा, व आयरिश शेतकऱ्यांकारितां पुष्कळशीं हत्यारें द्या, म्हणजे आयर्लंड इंग्लंडच्या जोखडाखालून सुटण्याला विलंब लागणार नाहीं. त्या वेळचा फ्रान्समधील लढाईच्या खात्यावरील मुख्य प्रधान कार्नो व वुल्फ टोन यांची गांठ पडून दोघांनीं याबद्दल वाटाघाट केली, व अखेरीस डिसेंबर महिन्यांत आयर्लंडच्या मदतीकरितां पंधरा हजार फ्रेंच सैन्य, आपल्याबरोबर आयरिश देशभक्तांकरितां हत्यारांचा लागेल तितका पुरवठा घेऊन निघालें. ही मोहीम जर सुरक्षितपणें आयर्लंडमध्यें येऊन पोंचती, तर आयर्लंड खात्रीनें स्वतंत्र झालें असतें; परंतु मध्येंच वादळ उत्पन्न होऊन फ्रान्समधून निघालेल्या गलबतांची फाटाफूट झाली, आणि कित्येक दिवसपर्यंत हीं फ्रेंच गलबतें समुद्रामध्यें घोंटाळून अखेरीस कांहींएक न करितां तीं जशीं गेलीं तशीं फ्रान्सच्या किनाऱ्याला परत येऊन लागलीं. हा जो डाव फसला त्या योगानें आयरिश देशभक्तांच्या मनाला फारच मोठा धक्का बसला, आणि वुल्फ टोन याची जी निराशा झाली ती तर सांगतांच येत नाहीं. परंतु आपलें पहिलें जाळें कोणीं उडवून टाकिलें तरी दुसरें विणण्यासाठीं एखादा कोळी ज्याप्रमाणें उद्युक्त होतो, त्याप्रमाणें वुल्फ टोन हा आपल्या दुर्दैवी देशाच्या स्वतंत्रतेसाठीं फिरून प्रयत्न करूं लागला. त्या वेळीं डच लोकांनीं आपल्याकरितां स्वतंत्र आणि लोकसत्ताक राज्य स्थापन केलें होतें व स्वतः गुलामगिरीचीं दुःखें काय आहेत याचा अनुभव असल्यामुळें अशा लोकांना गुलामगिरींत सांपडलेल्या देशाची जितकी कींव येते तितकी दुसऱ्या कोणालाही येत नाहीं. फ्रान्सचा प्रयत्न फसल्यावर डच लोकांनीं आयर्लंडच्या स्वातंत्र्या-करितां मदत करण्याचें कबूल केलें. गलबतें तयार झालीं, त्यांजवर तोफा चढल्या, शिपाई लोक सिद्ध झाले आणि १७९७ च्या जुलई महिन्यांत

वुल्फ टोन हा त्या आरमारांतील मुख्य निशाणाच्या जहाजावर चढला व ती मोहीम आयर्लंडकडे निघाली. आयर्लंडला स्वतंत्र करण्यासाठीं मनुष्यांनीं प्रयत्न सुरू केले, परंतु तो देश स्वतंत्र व्हावा असें परमेश्वराच्या मनांत आलें नव्हतें. त्यामुळें त्या गलबतांना अनुकूल असा वारा एक महिनाभर वाहीना. महिनाभर गलबतें बसून राहिल्यामुळें त्यांजवरची अन्नसामग्री संपली. ऑफिसर लोक कंटाळून गेले. सैन्यांतील शिपाई निराश होऊन गलबतांतून जमिनीवर उतरले. हातीं घेतलेलें काम तितकेंच पडलें. आयर्लंड परतंत्रच राहिलें आणि वुल्फ टोनचें अंतःकरण निराशेनें खचून गेलें. असले योग वारंवार जुळून येत नाहींत आणि देनदां जुळून आलेले योग बिघडले, यावरून वुल्फ टोन हताश झाला. परंतु आमचा इंग्लंडवर स्वारी करण्याचा निश्चय कायम आहे व तो योग आम्ही केव्हांतरी घडवून आणल्यावांचून रहाणार नाहीं, अशा प्रकारचीं उत्तेजनें फ्रेंच सरकारकडून वुल्फ टोनला वरच्यावर मिळत होतीं, व १७९७ मध्यें तर इंग्लंडवर स्वारी करण्याकरितां म्हणून फ्रान्समध्यें प्रत्यक्ष एक स्वतंत्र सैन्य तयार करण्यांत आलें, व जनरल बोनापार्ट याची त्याजवर नेमणूक झाली. येथपर्यंत प्रगति झालेली पाहून वुल्फ टोनला बरीच उमेद आली व तो खुद्द बोनापार्टालाही जाऊन भेटला. पुढें १७९८ च्या मे महिन्यांत जनरल बोनापार्ट हा आपलीं जहाजें घेऊन टयूलोन येथून निघाला, परंतु तो आयर्लंड किंवा इंग्लंडकडे न जातां इजिप्तवर स्वारी करण्याकरितां गेला. अशा रीतीनें एकंदर गोष्टी घडून येऊं लागल्यामुळें बाहेरच्या मदतीसंबंधानें आयर्लंडमधील लोक फारच निराश झाले. परंतु बाहेरच्या शिकलेल्या सैन्याची कांहीं तरी मदत आल्यावांचून नुस्तेंच आपल्या लोकांनीं केलेलें बंड कधींही यशस्वी होणार नाहीं अशी आयरिश लोकांना खात्री होती. त्यामुळें ते बंड करण्याच्या घाईत नव्हते. परंतु त्यांची बंडाची तयारी चालली आहे, अशी कुणकुण सरकारला कळली होती, व तो त्यांचा बेत परिपक्व होण्याचे पूर्वींच त्यांचें बंड उघडकीस आणावें म्हणजे तें निष्फळ होईल, असा सरकारानें विचार ठरविला व त्याप्रमाणें त्यांनीं लॉर्ड एडवर्ड फिटझीरल्ड वगैरे लोकांना कैद केलें, आणि शेतकरी लोकांवर नानाप्रकारचे जलूम चालविले. तेव्हां निरुपाय होऊन आयरिश देशभक्तांनीं जनरल बोनापार्ट टयूलोन येथून निघाल्यानंतर तीन दिवसांनीं बंडाचें निशाण उभारिलें.

ही बातमी वुल्फ टोनला पॅरिसमध्यें जेव्हां कळली तेव्हां तो फारच घाबरून गेला, व फ्रेंच सरकारनें आपल्या स्वतंत्र होऊं पाहणाऱ्या देशाला कांहीं तरी मदत करावी म्हणून त्याने फार खटपटी चालविल्या. जनरल हंबर्ट या नांवाचा एक विलक्षण धाडसाचा मनुष्य त्या वेळीं फ्रान्समध्यें होता. त्यानें फ्रान्समधील कांहीं व्यापाऱ्यां-जवळून कांहीं पैसा गोळा करून मोहिमेची तयारी केली. त्यानें एक हजार लोक, एक हजार शिलकी बंदुका, एक हजार गिनी आणि कांहीं तोफा, इतकें सामान घेतलें आणि तो आयर्लंडकडे जाण्याकरितां निघाला. जनरल हंबर्ट याला प्रारंभीं थोडेंसें यश आलें, परंतु अखेरीस त्याचा पराभव झाला. नंतर फ्रान्स-मधून आयर्लंडला मदत करण्याकरितां दुसरी मोहीम निघाली. जनरल हार्डी हा तिचा मुख्य होता व त्याच्याजवळ पांच हजार सैन्य दिलें होतें. ह्या मदतीचा फारसा उपयोग होईल असें वुल्फ टोनला वाटत नव्हतें. तरी पण वुल्फ टोन हा त्या मोहिमेबरोबर निघाला. फ्रेंच सरकार अगदीं अतिशय थोडे लोक आयर्लंडच्या मदतीला देईल तरी देखील त्यांच्याबरोबर जाणें हें माझें कर्तव्यकर्म आहे, असें वुल्फ टोननें सांगितलें आणि तो त्या सैन्याबरोबर निघाला; परंतु या मोहिमेलाही यश आलें नाहीं. इंग्लिशाच्या आरमारानें या फ्रेंच आरमाराचा पराभव केला. आपला पराभव खात्रीनें होतो असें जेव्हां दिसून आलें, तेव्हां फ्रेंच ॲडमिरलनें आपलीं कांहीं लहान लहान गलबतें सुरक्षितपणें बाहेर काढून परत लाविलीं. त्यांत वुल्फ टोननें बसून जावें, आणि आपला बचाव करावा, असें सुचविण्यांत आलें होतें. परंतु वुल्फ टोननें ती गोष्ट कबूल केली नाहीं. फ्रेंच लोक माझ्या देशाच्या लढाया लढत असतां मी पळून गेलों असें लोक मला म्हणतील, तेव्हां असली नीच गोष्ट मी कधींही करणार नाहीं, असें म्हणून तो आपल्या जाग्यावर कायम उभा राहिला. इतक्यांत इंग्लिशांनीं वुल्फ टोनचें गलबत चोहोंकडून वेढिलें, आणि कांहीं वेळ लढाई होऊन फ्रेंच आरमाराची वाताहत झाल्यानंतर त्याजवरील सर्व लोक कैदी करण्यांत आले. फ्रेंच लोक हे लढाईचे कैदी असल्यामुळें त्यांना चांगल्या रीतीनें वागविण्यांत आलें. परंतु वुल्फ टोन याजवर मात्र फार भयंकर प्रसंग येऊन कोसळला. त्याला ब्रिटिश सरकारच्या पोलिसांनीं पकडून आपल्या ताब्यांत घेतलें. त्या वेळीं त्याच्या अंगावर फ्रेंच आफिसरचा पोषाख होता; व आपण फ्रेंच ऑफिसर आहों, सबब आपल्याला कोणत्याही

अपमानास्पद रीतीनें वागवूं नये, असें त्याचें म्हणणें होतें. परंतु पोलिस ती गोष्ट कबूल करीनात, व ते त्याच्या हातांत बिडया घालण्याकरितां गेले. त्या वेळीं 'ह्या फ्रेंच ऑफिसरच्या पोषाखाला हा अपमानाचा डाग लावणें बरोबर नाहीं', असें म्हणून त्यानें आपल्या अंगांतील तो पोषाख आवेशानें फाडून फेंकून दिला, आणि नंतर बिडया घालण्याकरितां आपले हात पुढें करून तो म्हणाला, "मीं आपल्या देशाचा जो पक्ष स्वीकारला आहे त्या कामीं माझ्या हातांत बिडया पडल्या, तरी इंग्लंडच्या मोठमोठ्या पदव्यांपेक्षां मला त्यांतच जास्त भूषण वाटत आहे." वुल्फ टोनला ताबडतोब डब्लिन येथें नेण्यांत आलें. तेथें इतर कोर्टें चालू असतांही मुद्दाम कोर्ट मार्शलपुढें त्याचा खटला चालवून आणि त्याला अपराधी ठरवून शिक्षा सांगण्यांत आली. सदर कोर्टापुढें वुल्फ टोन यानें जें भाषण केलें तें वक्तृत्वासाठीं जरी फारसें प्रख्यात नाहीं तरी आयरिश लोकांच्या अंतःकरणांतील सर्व मनोविकारांचें पूर्ण चित्र त्यामध्यें आहे.

वुल्फ टोन म्हणालाः—कोर्टाला विनाकारण त्रास द्यावा अशी माझी बिलकूल इच्छा नाहीं, व साक्षीदारांची तपासणी करण्यामध्यें कोर्टाचा वेळ फुकट जावा हेंही मला इष्ट वाटत नाहीं. म्हणून तुम्हीं मजवर जे आरोप आणिले आहेत, ते सर्व मी एकदम कबूल करितों. मी आपल्या जन्मभूमीमध्यें इंग्लंडच्या राजाच्या शिपायांविरुद्ध शस्त्र उचललें हा मजवर आरोप आहे. हा आरोप मजला कबूल आहे, व अशी गोष्ट मीं कां केली, आणि त्यांतील हेतु काय, हें मी तुम्हांला स्पष्टपणें सांगतों. मीं ब्रिटिश सरकारच्या विरुद्ध शस्त्र उचललें, ही गोष्ट मी कबूलच करीत आहें. परंतु असें करण्याला मी कां प्रवृत्त झालों याबद्दलचें कारण असें आहे कीं, लहानपणापासून माझी पक्की समजूत होऊन चुकली आहे ती अशी कीं, ग्रेटब्रिटन आणि आयर्लंड यांच्यामध्यें जो हा सेव्यसेवकभावसंबंध जुळलेला आहे, त्याच्या योगानें आयर्लंडचें राष्ट्र रसातळाला गेल्यावांचून कधींही रहावयाचें नाहीं. आणि जोंपर्यंत हा संबंध कायम आहे, तोंपर्यंत आयर्लंडला सुख आणि स्वातंत्र्य हीं कधीं मिळावयाचीं नाहींत. एकापाठीमागून एक जीं वर्षें लोटत आहेत व माझ्या डोळ्यांपुढें दिसणाऱ्या प्रत्येक गोष्टीपासून जीं अनुमानें निघत आहेत त्या सगळ्यांवरून पहातां हें माझें मत खरें आहे, अशीच माझी कल्पना बळावत

गेली. त्यामुळें माझा आयर्लंड देश इंग्लंडापासून निराळा करण्याकरितां माझ्या एकट्याच्या हातून होतील तितके सर्व प्रयत्न करून पहाण्याचा मीं संकल्प केला. हें इंग्लंडचें जोखड एकट्या आयर्लंडला कधींही झुगारून देतां यावयाचें नाहीं, हें मला पक्कें माहीत होतें आणि म्हणून जेथें मदत मिळण्यासारखी होती तेथें ती मिळण्यासाठीं मीं खटपटी केल्या. माझी घरची गरिबी होती व मला पैसे मिळण्याचे अनेक प्रसंग आले होते, आणि माझ्यासारख्या स्थितींतल्या मनुष्याला ते पैसे थोडे थोडके होते असेंही नाहीं. तरीपण मीं गरिबीच पत्करिली, आणि आपल्या देशाशीं इमानेंइतबारें वागण्याचा मीं निश्चय केला. आपल्या देशाला मदत मिळावी म्हणून शोध करीत असतां फ्रान्सच्या लोकसत्तात्मक राज्यामध्यें मला मदत देणारे उदार अंतःकरणाचे महात्मे भेटले, आणि माझ्या तीस लाख बांधवांना इंग्लिशांच्या जुलमापासून सोडविण्याकरितां मी फ्रेंचांची मदत घेण्याला तयार झालों. फ्रान्समध्यें असतांना मी त्यांच्यापैकीं कोणत्याही पक्षाचा विशेष अभिमान धरला नव्हता. तसें करण्यांत माझा कांहीं हेतुही नव्हता. माझ्यापाशीं पैसा नव्हता. मी फार गरिबीनें आणि साधेपणानें वागत असे. मी त्यांची मदत मिळविण्यासाठीं कांहीं कपटयुक्त्या केल्या नाहींत. मीं आपलीं मतें उघड उघड आणि प्रामाणिकपणें त्यांना सांगत असे. या माझ्या गुणांनीं त्यांचा माझ्याबद्दल चांगला ग्रह झाला आणि त्यांनीं मला लष्करी ऑफिसरची जागा दिली. फ्रान्समधील एक्झिक्युटिव्ह डायरेक्टरीचा माझ्यावर विश्वास बसला. माझे सेनापति माझी तारीफ करूं लागले, आणि माझ्या शिपायांना मी प्रियकर झालों. माझा देश स्वतंत्र करण्याकरितां आणि इंग्लिशांच्या जुलमापासून सोडविण्याकरितां मी फ्रेंचांच्या निशाणाखालीं चाकरीला राहिलों. लढाईचे बरेवाईट परिणाम जे होतील ते सर्व स्वदेशासाठीं सोसण्याला मी तयार झालों. समुद्रावर इंग्लिशांची सत्ता अजिंक्य आहे हें मला माहीत होतें, तरीपण मी आपल्या देशासाठीं त्या समुद्रावरचींही संकटें सोसण्याला तयार झालों. ह्या आयुष्यांत माझ्या ज्या कांहीं इतर महत्त्वाकांक्षा होत्या त्या सगळ्या मीं ह्या एका उद्देशाच्यापायीं सोडून दिल्या. मी पैसे मिळविण्याची अपेक्षा न धरितां गरिबींतच संतोष मानून राहिलों. माझ्या प्रिय पत्नीला आणि माझ्या लाडक्या मुलांना अनाथ अवस्थेमध्यें पाडण्याला मी तयार झालों. ज्या माझ्या देशासाठीं आजपर्यंत मीं

इतक्या गोष्टी सोडल्या, त्या मला त्या देशासाठीं आतां माझा प्राण अर्पण करण्याला फारसें जड जाईल असें मुळींच नाहीं. असल्या गोष्टींतून यश येणें हेंच सर्वस्व आहे. यश आलें तर मग तो राजा आणि अपयश आलें तर तो चोरापेक्षांही चोर. बहुतेक लोक अज्ञानी असतात; त्यांना खऱ्या गुणांची किंमत नसते. यशावरून ते गुणाची किंमत ठरवितात. वॉशिंग्टन आणि कोशिअस्को या दोघांचाही उद्देश एकच होता. अमेरिका स्वतंत्र व्हावी अशी वॉशिंग्टनची आणि पोलंड देश स्वतंत्र व्हावा अशी कोशिअस्कोची इच्छा होती. दोघेही स्वदेशाच्या स्वतंत्रतेसाठींच झटत होते. तरीपण दैवाच्या विलक्षण गतीनें वॉशिंग्टनला यश आलें आणि कोशिअस्कोचा बेत फसला. म्हणून कोशिअस्को नीच किंवा गुन्हेगार झाला असें नाहीं. आणि माझीही तशीच स्थिति आहे. माझाही उद्देश स्वदेश स्वतंत्र करण्याचाच होता. परंतु दुर्दैवानें तो फसला. माझे शत्रु उदार अंतःकरणाचे असते, तर त्यांनीं माझ्या ह्या कृत्याबद्दल माझा सन्मानच केला असता; परंतु तशी स्थिति नसल्यामुळें मला आज कैदी होऊन येथें येण्याचा प्रसंग आला आहे. जसा एखादा बदमाष गुन्हेगार असावा, त्याप्रमाणें माझ्या हातांत बिड्या घालून मला येथें आणिलें आहे. दुसऱ्यांच्या माहितीकरितां मी ही गोष्ट सांगत आहें. मी स्वतः त्याबद्दल अगदीं उदासीन आहें. तुम्हीं कशाही रीतीनें वागविलें तरी मला स्वतःला त्याचें सुखदुःख कांहींच नाहीं. तुम्ही मला काय शिक्षा देणार हें मी जाणून आहें, परंतु त्याच्याविरुद्ध कुरकुर करणें किंवा त्याच्यासाठीं तुमच्या हातींपायीं पडणें, ही गोष्ट मी तुच्छ मानितों. अशी गोष्ट मी कधींही करणार नाहीं. ग्रेट ब्रिटन आणि माझा देश यांच्यामध्यें जो घातक संबंध जडलेला आहे, तो तोडून टाकण्याच्या उद्देशानें मी जें कांहीं बोललों असेन, लिहिलें असेल, किंवा केलें असेल, तें सर्व मी जाणूनबुजून केलें आहे. तें मी पूर्ण विचारानें केलें आहे, आणि तसेंच केलें पाहिजे असें माझें मत आहे. आणि तसें केल्याबद्दल आपल्या कोर्टाचें जें कांहीं शासन असेल, तें भोगण्याला मी तयार आहें. तुमचें जें कर्तव्यकर्म असेल तें तुम्ही करा आणि माझें जें कर्तव्यकर्म आहे तें करण्याला मीही कधीं मागें सरणार नाहीं! इतकें भाषण केल्यानंतर वुल्फ टोननें कोर्टाला अशी विनंति केली कीं, मी शिपाई आहें, याकरितां शिपायाप्रमाणें मला गोळी घालून तुम्ही मारा; एखाद्या गुन्हेगारा-

प्रमाणें मला फांशीं देऊन माझा जीव घेऊं नका. परंतु ब्रिटिश न्यायाच्या नियमाप्रमाणें तसें करण्यांत आलें नाहीं, व अखेरीस शिक्षा सांगितल्यापासून अठ्ठेचाळीस तासांच्या आंत वुल्फ टोनला फांशीं देण्याचा हुकूम झाला. गोळी घालून मारण्याची आपली विनंति कोर्ट मान्य करीत नाहीं, असें ठरल्यावर रात्रीं वुल्फ टोननें आपल्याकडे कोणी पहात नाहीं अशी संधि साधून चाकूनें आपल्या गळ्याची एक शीर कापून घेतली. नोव्हेंबरच्या १० तारखेला वुल्फ टोनची चौकशी झाली व ११ व्या तारखेच्या रात्रीं वर दिलेली गोष्ट घडून आली. तारीख १२ रोजीं ॲडव्होकेट क्यूरन यांनीं किंग्स बेन्च कोर्टांत अशी तक्रार केली कीं, लष्करी कोर्टामध्यें वुल्फ टोनची चौकशी झाली हा अन्याय होय. सबब त्या कोर्टाचा हुकूम रद्द करून व तो खटला सिव्हिल कोर्टांत मागवून येथें त्याची चौकशी व्हावी. या कामीं हुकूम देण्याला कोर्टानें उशीर केला तर तें कोर्ट आरोपीला फांशीं देऊन टाकील. असा अर्ज झाल्याबरोबर वुल्फ टोनला सोडवून आणण्याकरितां लष्करी बराकीमध्यें ताबडतोब जासूद पाठविण्यांत आला. परंतु आमच्या लष्करी खात्यांतील वरिष्ठ अधिकाऱ्यांचा हुकूम आल्यावांचून आम्ही त्याला सोडीत नाहीं, असा परत निरोप आला. नंतर चीफ जस्टिस यांनीं वुल्फ टोनला असेल तेथून घेऊन येण्याविषयीं शेरीफला अतिशय जरूरीचा हुकूम पाठविला. शेरीफनें जाऊन शोध केला, व अशी बातमी आणिली कीं, वुल्फ टोन यानें आपल्या गळ्याची शीर कापून घेतली आहे, त्यामुळें त्याला आणितां येणें शक्य नाहीं. यानंतर त्याला फांशीं देऊं नये, असा चीफ जस्टिसनें हुकूम पाठविला. पुढें सात दिवसपर्यंत वुल्फ टोन अंथरुणावर पडून होता, व एकोणिसाव्या तारखेला त्याचें प्राणोत्क्रमण झालें. तो तुरुंगांत असतांना त्याच्याजवळ जाण्याची कोणालाही परवानगी नव्हती. त्याचे आप्त किंवा इष्टमित्र यांपैकीं कोणीही अंतकाळीं त्याच्याजवळ नव्हते. त्या तुरुंगांतील जेलर आणि त्याचे नोकर हेच काय ते त्याच्या जवळ होते, आणि त्याच्या दारापुढें पहारा करण्याकरितां फिरणाऱ्या संत्री शिपायांच्या पावलांशिवाय त्याला अंतकाळीं दुसरा कशाचाही आवाज ऐकूं येत नव्हता. अशी जरी स्थिति होती, तरी आपण आपल्या देशासाठीं मरत आहों हें ज्ञान कायम होतें; आणि त्यामुळें शेवटपर्यंत त्याचें धैर्य न खचतां सत्कृत्य केल्याच्या समाधानानें तो शांतपणानें हा लोक सोडून परलोकीं गेला.

# वेदान्तवृक्ष : : : ६

काळ : अग्रलेख, ता. १३।५।१९०४

● आदल्याच आठवड्यांत पुण्यांत श्री शंकराचार्यांचें आगमन व सत्कार झाला होता.

ह्या जगांतील जीवयात्रा सुखकर व्हावी आणि परलोकाची प्राप्ति सुलभ व्हावी यासाठीं धर्माचें अस्तित्व होय. परमेश्वरानें मनुष्याला कांहीं विशेष देणग्या दिल्या आहेत, म्हणून त्यांच्या नियमनासाठीं मनुष्यांमध्यें कांहीं विशेष प्रकारचे कायदे असणें अवश्यच आहे. पशु, पक्षी इत्यादि तिर्यग्योनींमध्यें आपण ज्याला धर्म म्हणून समजतों तसला कांहीं पदार्थ आहे किंवा नाहीं, याच्याबद्दल कोणाला जरी शंका असली, तरी आजकालच्या सामान्य समजुतीप्रमाणें त्यांना धर्म नाहीं असेंच दिसतें. परंतु मनुष्याला परमेश्वरानें मन, बुद्धि, अहंकार, संकल्प, विकल्प, वासना इत्यादि पुष्कळ अनन्यसामान्य गोष्टी दिलेल्या आहेत. त्यांच्या नियमनाला धर्माची फार अवश्यकता आहे. ज्या देशांत आगगाड्या नाहींत त्या देशांत आगगाडी-संबंधाचे कायदे नसणें हें साहजिकच आहे. त्याप्रमाणें आत्मा, मन, बुद्धि इत्यादि आगगाडीपेक्षांही जलद धांवणारे वेग तिर्यग्योनींतील प्राण्यांचे अंगांत दिसून येत नाहींत, तर त्यांच्यामध्यें त्या वेगाचें आकलन करण्याचें बलाढ्य साधन जें धर्म तेंही नाहीं, असेंच म्हणणें ओघाला येतें. परंतु मनुष्याची स्थिति तशी नाहीं. मनुष्याला परमेश्वरानें नुसता जड देहच दिलेला नाहीं. देहरूपी मातीच्या गोळ्यांत चैतन्याचे निरानिराळे विकार घालून परमेश्वरानें मनुष्य हा प्राणी निर्माण केलेला आहे. मनुष्याच्या अंगामध्यें चैतन्याचे अनेक वेग चारी दिशांनीं उचंबळत आहेत. त्यांचें संयमन मनुष्याच्या ऐहिक

योगक्षेमासाठीं आणि पारलौकिक निश्रेयसासाठीं होणें अत्यंत जरूर आहे, आणि तें नियमन धर्माच्या द्वारानें होत असतें. आपले पाय फार चपळ आहेत आणि ते पाहिजे तिकडे धांवतील असें आपल्याला वाटतें; परंतु ते पाय आपल्या वासनांच्यापुढें किती धांवणार ? आणि पाय फारच धांवूं लागले तर एक लहानशी दोरी त्यांच्या गतीचा प्रतिबंध करूं शकेल. पण आपल्या वासनांना कोण बांधूं शकणार आहे ? एका धर्माच्या दोरीशिवाय दुसऱ्या कोणामध्येंही त्यांचें नियंत्रण करण्याचें सामर्थ्य नाहीं. आयुर्वेदामध्यें ज्याप्रमाणें शरीरगत रोगांवर औषधें आहेत, त्याप्रमाणें मानसिक रोगांवर औषधें देऊन त्यांना बरें करण्याचें सामर्थ्य धर्मामध्यें आहे. शरीराचे भाग जड असतात, त्याप्रमाणें त्यांच्यावर झाडपाल्यांचीं किंवा मात्रादिकांचीं जडस्वरूपाचीं औषधें उपयोगीं पडतात. परंतु ज्याच्यावर औषध घ्यावयाचें त्याचें स्वरूप जसें जसें सूक्ष्म असेल, तसें तसें त्या औषधाचें स्वरूपही सूक्ष्मच असलें पाहिजे. जीवात्मा, मन, बुद्धि, अहंकार, वासना हीं किती सूक्ष्म आहेत, हें अंतर्मुख दृष्टीनें विचार करणाऱ्या कोणाही मनुष्याला सांगावयाला पाहिजे असें नाहीं. त्यांजवर जे उपाय योजावयाचे तेही यांच्याच इतके सूक्ष्म पाहिजेत, किंबहुना यांच्यापेक्षांही जास्त सूक्ष्म आणि जास्त सामर्थ्यवान् पाहिजेत, व हेच उपाय धर्मामध्यें सांगितलेले असतात. आत्मा, बुद्धि, मन, यांची गति मानवी ज्ञानाला अगम्य असते. तेव्हां यांच्यावरही नियंत्रण चालविणारें जें धर्माचें सामर्थ्य तें मानवी बुद्धीला किती अगम्य असेल याची कल्पना करणें फारसें कठीण नाहीं, आणि यामुळेंच धर्म हा ईश्वरप्रणीत आहे ही कल्पना साहजिक उत्पन्न झाली आहे. एखादा पाय तुटला तर डॉक्टरला दुसरा लांकडाचा पाय करून बसावितां येतो, परंतु एखाद्याच्या मनामध्यें इच्छा, द्वेष, राग, लोभ हे जर नसले तर ते लांकडाचे करून कोणालाही बसवितां येत नाहींत. कारण, ह्या शरीरांतील चैतन्यमूलक ज्या गोष्टी आहेत त्या केवळ परमेश्वराधीन आहेत, त्यांजवर आपली सत्ता चालत नाहीं, अशी मनुष्याची पूर्णपणें खात्री होऊन चुकली आहे. तेव्हां ह्या शरीरांतर्गत चैतन्यविषयक गोष्टींवर नियामक सत्ता चालविणारें जें वरिष्ठ चैतन्य आणि ज्यालाच धर्म असें नांव देतां येतें, त्याचा परमेश्वराव्यतिरिक्त इतर कोणापासून उगम असेल, असें मनुष्याच्या कल्पनेमध्यें येणें ही गोष्ट सर्वथैव अशक्य आहे. परमेश्वर चिद्घन आहे.

तो या सृष्टींतील सर्व चैतन्याचा मालक आहे. तेव्हां त्याच्यापासूनच धर्म उत्पन्न झाला, अशी कल्पना साहजिकपणें प्रचलित झाली. सृष्टीमध्यें पुष्कळ शास्त्रीय आणि लौकिक प्रयोगांवरून कधीं कधीं आढळून येतें कीं, कित्येक अत्यंत सूक्ष्म पदार्थ हे स्थूल पदार्थांपासून उत्पन्न होतात. लांकडाच्या घर्षणा-पासून अग्नि आणि प्रकाश, व रेशीम आदिकरून वस्तूंपासून विद्युच्छाक्ति उत्पन्न होतात. मन हें अत्यंत सूक्ष्म असून त्याच्यावरही जड अशा सात्विक अन्नाचे सात्विक परिणाम आणि तामस अन्नाचे तामस परिणाम झालेले स्पष्टपणें दृष्टीस पडतात. अशा उदाहरणांवरून स्थूलापासूनच सूक्ष्म उत्पन्न होत गेलेलें आहे असें दिसतें, व त्यावरून चैतन्य म्हणजे जडापैकींच विशेष गुणयुक्त असा कांहीं अत्यंत सूक्ष्म भाग असावा असें वाटूं लागतें. परंतु अशी उपपत्ति बांधण्याला आणि जडाच्या शेवटच्या पायरीपासून चैतन्याच्या वरील पायरीपर्यंत जाण्याला आपल्या ज्ञानापाशीं इतकी थोडी सामग्री आहे कीं, त्यावरून एखाद्या अज्ञात गोष्टीविषयीं एखादा तर्क करणें कधींही श्रेयस्कर होणार नाहीं. अशा रीतीनें प्रत्यक्ष आणि अनुमान यांची गति कुंठित झाल्याकारणानें मनुष्य अखेरीस शाब्द प्रमाणावरच भार ठेवून स्तब्ध बसतो, धर्म हा ईश्वर-प्रणीत आहे असें मानतो, आणि त्या धर्मांत जे आचारविचार सांगितले असतील त्यांप्रमाणें वागूं लागतो.

धर्म हें मनाच्या रोगावरील औषध होय, व त्या धर्मांत निष्णात असणारे साधु पुरुष हे व्याधिग्रस्त झालेल्या मनाचे वैद्य होत. सत्वगुणाच्या अभि-वृद्धीनें शरीरांतर्गत चैतन्याला पुष्टि द्यावयाची, हें सगळ्या धर्मकृत्यांचें आणि धार्मिक गुरूंच्या उपदेशाचें पर्यवसान दिसतें. आयुर्वेदी वैद्य ज्याप्रमाणें शरीरामध्यें शक्ति वाढवून सर्व रोगांचें निराकरण करीत असतो, त्याचप्रमाणें मानसशास्त्रवेत्त्या वैद्याचेही प्रयत्न चाललेले असतात. जसे शरीराचे अनेक रोग आहेत, तसे मनाचेही अनेक रोग आहेत, व त्या सर्वांवर औषधें पुरविणें हें धर्मशास्त्राचें, धर्मगुरूंचें आणि साधुपुरुषांचें काम आहे. पुष्कळ साधुपुरुषांच्या आपण अशा गोष्टी ऐकतों कीं, ते एखाद्या मनोविकारावर कांहीं विलक्षण उपाय सांगतात. अमक्या देवाला दररोज पाणी घालीत जा, किंवा अमक्या पिंपळाला प्रदक्षणा घालीत जा, किंवा अमक्या तीर्थयात्रा करून ये, असल्या आज्ञा सकृ-द्दर्शनीं पुष्कळ नास्तिकांना वेडगळपणाच्या वाटतात. त्यांच्यांत कार्यकारण-

भावाचा धागा त्यांना कोठेंच आढळत नाहीं. परंतु सूक्ष्म रीतीनें त्यांच्या ह्या उपायांमध्यें कारण आपलें कार्य घडवून आणण्याचें काम करीतच असतेंच. आपण सांगितलेल्या उपायांचे रोग्याच्या मनावर काय परिणाम होतील, हें सत्पुरुष जाणत असतात, आणि म्हणून ज्याला जो पथ्य असेल त्याला त्या प्रकारचा औषधोपचार ते सांगत असतात. सर्व धर्मशास्त्रें आणि तदंगभूत सर्व आचारशास्त्रें हीं मनाचें आरोग्य ठेवणारीं शास्त्रें होत. हीं प्रत्येक देशांतील मनुष्यांना पाहिजेतच, व तीं त्यांच्यापाशीं आहेतही. एक वेळ वैद्यशास्त्रावांचून शरीर टिकूं शकेल, पण धर्मशास्त्रावांचून कोणतेंही मन शाबूत रहावयाचें नाहीं, इतकी ह्या शास्त्राची मानवी प्राण्यांना आवश्यकता आहे. धर्मशास्त्र हें पहिलें आहे, आणि वैद्यशास्त्र हें दुसरें होय. जो धर्मशास्त्राप्रमाणें वागेल, त्याला बहुधा वैद्यशास्त्राची फारशी जरुरीच लागणार नाहीं. इतक्या महत्त्वाचें जें धर्मशास्त्र तें पृथ्वीच्या पाठीवरील प्रत्येक जातीच्या आणि ठिकाणच्या लोकांमध्यें प्रचलित झालें आहे. निरनिराळ्या लोकांचीं निरनिराळीं धर्मशास्त्रें आहेत, आणि तीं एकमेकांपासून अगदीं भिन्न आहेत, असा एक प्रवाद आहे; परंतु त्यांत फारसें तथ्य नाहीं. उपाधिभेदामुळें कित्येक ठिकाणीं कांहीं भेद दृष्टीस पडोत, परंतु असे कांहीं सामान्य सिद्धांत आहेत कीं, ते प्रत्येक धर्मांमध्यें सांपडलेच पाहिजेत. ते असले तरच तो धर्म, नाहींतर तो धर्मच नव्हे, इतके अवश्यापेक्षणीय असे ते सामान्य सिद्धांत आहेत. कोणी ते सामान्य सिद्धांत मनूनें लिहिले म्हणून म्हणतो, कोणी महंमदानें लिहिले म्हणून म्हणतो, कोणी गौतमबुद्धानें लिहिले म्हणून म्हणतो, आणि कोणी ते जीजस ख्राइस्टनें लिहिले म्हणून म्हणतो. परंतु वास्तविक स्थिति अशी आहे कीं, ते सामान्य सिद्धांत मनूचे नव्हेत, महंमदाचे नव्हेत, बुद्धाचे नव्हेत किंवा जीजस ख्राइस्ट याचेही नव्हेत. ते सामान्य सिद्धांत परमेश्वराचे आहेत, ते सृष्टीचे आहेत, ते प्रत्येक मनुष्याचे आहेत. ते दिव्यदृष्टीला दिसलेले आहेत आणि ते उदात्त अंतःकरणांनीं अनुभवून पाहिलेले आहेत. अशा दृष्टीनें पाहिलें असतां आणि धर्माची ही कल्पना घेतली असतां आपण जगांतील सर्व माणसें एकाच धर्माचीं आहों; वास्तविक भेद नाहीं. सर्व धर्मांचें अंत्य प्रयोजन एकच आहे. मनु आणि महंमद, बुद्ध आणि ख्राइस्ट यांच्यामध्यें विरोध नाहीं. परमेश्वरानें मनूच्या दिव्य दृष्टीला जें दाखविलें तेंच महंमदाच्या कानामध्यें दिव्य

लोकांतील खबूतरें येऊन सांगत होतीं, आणि बोधिवृक्षाच्या तळाशीं गौतम-बुद्धाच्या अंतःकरणामध्यें परमेश्वरानें ज्यांचा प्रकाश पाडिला त्याच गोष्टी त्यानें पॅलेस्टाइनमध्यें जीजस खाइस्टच्या तोंडून वदविल्या. उदात्त दृष्टीनें पाहिलें तर जगांतील सर्व लोक मनूला जितका मान देत आहेत तितकेच ते महंमदाचे अनुयायी आहेत, आणि ते बौद्धधर्माचें जितकें अनुकरण करतात तितकेच ते सद्धर्माचरणानें खिस्तीही आहेत. ज्याचें पवित्र आचरण नाहीं, तो येशू खिस्ताच्या कळपांत असला म्हणून काय झालें? आणि ज्याच्या नखशिखान्त शुद्ध सत्य भरलें आहे, तो हिंदुधर्मात असला म्हणून त्याला काय कमी आहे? सारांश, मुळांत धर्मभेद नाहीं. परंतु अनेक उपाधींच्या योगानें सर्वसामान्य धर्मालाही भिन्नत्व प्राप्त झालें आहे, व या भेदाला मनुष्याच्या मिथ्या अभिमानामुळें विशेष जोर आलेला आहे. त्या जोराच्या आवेशांत येऊन प्रत्येकजण मी अमक्या धर्माचा आणि मी तमक्या धर्माचा अशा पुष्कळ वल्गना करीत असतो. सगळे धर्म परमेश्वराचींच लेंकरें आहेत. तरीपण जीजस खाइस्ट म्हणतो कीं, मीच काय तो एकटा आकाशांतील बापाचा मुलगा होय, आणि बाकी तुम्ही सगळे लुच्चे; तुम्ही माझ्या बापाच्या पोटचे नव्हेत! अशा प्रकारची ही सख्ख्या भावांमध्यें माजलेली लाथाळी पाहून कोणालाही हंसू आल्यावांचून राहणार नाहीं. अलीकडे पृथ्वीच्या पाठीवर जिवंत राहिलेल्या आणि बलाढ्य झालेल्या बहुतेक धर्मांची अशाच प्रकारची आकुंचित दृष्टि आहे. या सकलधर्ममंडलांत या आकुंचित दृष्टीच्या पलीकडे गेलेला असा जर एखादा धर्म असला तर तो आमचा वेदान्तच होय. सृष्टि आणि सृष्टिकर्ता परमेश्वर, जीवात्मा आणि परमात्मा, प्रकृति आणि पुरुष, इत्यादिकांचे परस्परसंबंध स्पष्टपणें व्यक्त करून धर्माचें खरें उज्वल स्वरूप काय आहे, सर्वत्र समदृष्टि कां ठेविली पाहिजे, उपाधिमूलक भेद हे खरे भेद कां नाहींत, इत्यादि अनेक बिकट प्रश्नांवर प्रकाश पाडण्याची कामगिरी जर कोणीं बजाविली असेल, तर ती आमच्या वेदान्तानेंच होय. वेदान्तानें आपल्या वेळच्या बौद्ध, जैन, पंचरात्र, सांख्य, लोकायतिक, मीमांसक वगैरे पंथांच्या लोकांनाच जिंकलें आहे असें नाहीं, तर पुढें उत्पन्न होणाऱ्याही सर्व प्रकारच्या वितंडवाद्यांना त्यानें आधींच जिंकून ठेविलें आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं. वेदान्तधर्माचीं मतें इतकीं उदात्त आणि व्यापक

आहेत कीं, त्यांच्याहून आपलीं धर्ममतें भिन्न आहेत असें समजून जो त्यांच्याशीं विरोध करूं लागेल, तो गोत्यांत पडलाच म्हणून समजावें. कारण तो परमेश्वराच्या आणि सृष्टीच्या आदि नियमांशीं विरोध करितो. आणि त्यांच्याशीं जो विरोध करितो, त्याला जय कोठून येणार? वेदान्तशास्त्र हें अमुक एका धर्माकरितां किंवा जातीकरितां किंवा व्यक्तीकरितां आहे, असें मुळींच नाहीं. वेदान्त हा सर्व धर्मांचा धर्म आहे, आणि इतर कोणत्याही धर्मांपासून अंतःकरणाच्या ज्या पृच्छांचें आणि जिज्ञासांचें समाधान होत नाहीं, त्या सगळ्यांचें समाधान करण्याचें सामर्थ्य यां वेदान्तांत आहे. हल्लीं अमेरिका, जर्मनी, इंग्लंड इत्यादि खिस्ती देशांतून देखील वेदान्ताचीं मतें खिस्ती लोकांना मान्य होत आहेत, आणि तेथें त्यांचा प्रसार होत आहे, याचें कारण त्या मतांचा सत्यपणा आणि व्यापकपणा हेंच होय. खिस्तीलोकही हिंदुस्थानांत येऊन दुष्काळांत उपाशीं मरणाऱ्या माणसांना अन्नाची लालूच दाखवून आणि अल्पवयी अर्भकांना खाऊची गोडी लावून बाटवीत असतात. विवेकानंदांनीं खाऊसाठीं एक कवडीही कधीं खर्च केली नसेल. आणि एशियाटिक राष्ट्रांतील पैसे चोरून नेल्यामुळें जेथें लक्ष्मीचा धूर निघत आहे तेथें कधीं दुष्काळ पडणें हें तर संभवनीयच नाहीं. अशा ठिकाणीं विवेकानंदादिकांनीं ज्या लोकांना मानवी विचाराच्या शिडीच्या वरच्या पायरीवर नेऊन चढविलें, तीं अज्ञान मुलें किंवा दुष्काळांत मरणोन्मुख झालेलीं मोठीं माणसें खात्रीनें नव्हतीं. तेथें जर कशाची लालूच असेल तर ती वेदान्तमताच्या सत्यत्वाची, उदात्तपणाची आणि व्यापकत्वाची लालूच होय. अशी लालूच पाहून फक्त ज्ञानी लोकच फसतात, आणि अशा रीतीनें जे फसतात ते मोक्षपदाला जाऊन मिळतात! त्यांना जन्म आणि मृत्यु ह्यांचें भय उरत नाहीं!

अशा प्रकारच्या अद्भुत सामर्थ्याचें वेदान्तशास्त्र सुदैवानें वंशपरंपरेच्या हक्कानें आजकाल आपल्या हातामध्यें आहे. वेदाच्या अंतीं उपनिषद्भाग सांगितलेला आहे, म्हणून त्यांतील तात्त्विक विचारांना वेदान्तशास्त्र अशी संज्ञा प्राप्त झालेली आहे. ह्या वेदान्तशास्त्राप्रमाणें एकदां आपल्या समाजाच्या सर्व घडामोडी यथास्थित रीतीनें चालल्या होत्या. परंतु कालांतरानें कल्पनांमध्यें फरक पडत पडत वेदान्ताचीं तत्त्वें लुप्तप्राय झालीं, आणि कुमारिलभट्ट, मंडनमिश्र वगैरेसारखे कर्मकांडी लोक प्राधान्य पावले. त्यांनीं आधार दिलेल्या

यज्ञादि कर्मांतून पशूंची हिंसा होऊं लागली, म्हणून त्याचा प्रतिकार करण्याकरितां बौद्धांचा पंथ निघाला. त्या बौद्धांनीं क्षणभंगवाद, विज्ञानवाद, इत्यादि अनेक तर्ककुतर्क काढून वेदांचें प्रामाण्य न मानितां भलभलतेच सिद्धांत स्थापित करण्याचा प्रयत्न केला. बौद्धांच्या पाठीमागून सप्तभंगीनयानें सर्व जगाची विल्हेवाट लावून देणारा जैनांचा पंथ निघाला. अशा रीतीनें सर्व जगांतील अतिशय उत्तम असें जें वेदान्तशास्त्र त्याचा पूर्ण लोप होण्याचा एकदां प्रसंग आला होता. परंतु त्या वेळीं प्रत्यक्ष शंकरांनीं अवतार धारण करून वेदान्तमत फिरून प्रस्थापित केलें. मद्रास इलाख्यांतील चिदंबर येथील एका पवित्र ब्राह्मणाच्या कुळामध्यें त्यांनीं अवतार घेतला. तो अवतार श्रीमच्छंकराचार्य या नांवानें सुप्रसिद्ध आहे. आचार्यांनीं अल्पवयांतच सर्व विद्या साध्य करून घेतल्या व वेदान्तशास्त्राचें प्रतिपादन करण्याला योग्य असा जो चतुर्थाश्रम त्याचाही त्यांनीं अंगीकार केला व नंतर व्यासांच्या ब्रह्मसूत्रांवर भाष्य करून आणि सर्व मतवाद्यांचें खंडण करून त्यांनीं वेदान्तमताची सर्वत्र स्थापना केली. नंतर आपली अद्वैतवेदान्ताची परंपरा कायम रहावी म्हणून त्या आदि शंकराचार्यांनीं हिंदुस्थानच्या चार दिशांस चार मठ स्थापन केले. बदरीकेदार, जगन्नाथ, द्वारका आणि शृंगेरी हीं त्या चार मठांचीं चार आदिस्थानें होत. ह्या चार मठांच्या द्वारानें सर्व हिंदुस्थानामध्यें अजूनपर्यंत अद्वैतवेदान्ताचे सिद्धांत प्रसृत केले जात आहेत. या चार मठांपैकीं शृंगेरीच्या मठाच्या पोटांतूनच आपण हल्लीं ज्याच्या आश्रयाखालीं आहों तो संकेश्वरचा मठ निघालेला आहे. विद्याशंकरभारती हे शृंगेरीच्या गादीवर आरूढ झाल्यानंतर कांहीं दिवसांनीं महायात्रेला गेले. तेथून ते हिमालयामध्यें आदि शंकराचार्यांचे गुरु गोविंद-भगवत्पूज्यपादाचार्य यांच्या दर्शनाकरितां एका गुहेमध्यें गेले व त्यांची शिष्य मंडळी बाहेर राहिली. परंतु विद्याशंकरभारती बरेच दिवस बाहेर आले नाहींत, म्हणून त्यांनीं आपल्यापैकींच एकाला आचार्यपद गुरूच्या आज्ञेप्रमाणें दिलें, आणि ते परत देशीं येण्याकरितां निघाले. ही गोष्ट शृंगेरीस कळली तेव्हां यात्रेस गेलेल्या शिष्यांनीं केलेला गुरु शृंगेरीच्या मठांतील लोकांना मान्य न होऊन त्यांनीं दुसऱ्याच एकाला गादीवर बसविलें. याप्रमाणें एका गादीला दोन आचार्य झाले. इतक्यांत गोविंदपूज्यपादाचार्यांच्या गुहेंत गेलेले विद्याशंकर-भारती हे त्याच गादीकरितां तिसरे शंकराचार्य परत आले. परत आल्यावर

सर्व वस्तुस्थिति त्यांच्या लक्षांत आली. तेव्हां त्यांनीं शृंगेरीस परत न जातां कुडलगी मुक्कामीं नवीन मठ स्थापन करून समाधानवृत्तीनें रहाण्याचा निश्चय केला. पवित्र आणि पुण्यवान् पुरुष जेथें रहातील तेथें त्यांचें घरच आहे ! विद्याशंकरभारती कुडलगीस राहूं लागल्यापासून तेथें सर्व वैभव त्यांच्या भोंवतीं जमा होऊं लागलें. कोल्हापुरास त्याच वेळीं कोणी एक सोमवंशी हिंदुराजा होता, त्यानें आग्रह करून स्वामींना करवीर क्षेत्रीं आणविलें. त्यावेळीं स्वामींनीं करवीरास एक आणि संकेश्वरास एक असे दोन मठ स्थापन केले. कोल्हापुराच्या ज्या राजांनीं शंकरभारतींना आपल्या राज्यांत आणिलें आणि ज्या राजांनीं त्यांना इनामें करून दिलीं, त्यांनीं स्वामींच्या चरणीं त्यावेळीं निवेदन केलेली भाषा फार निराळी होती. "करवीर क्षेत्र ही दक्षिणकाशी आहे. येथें येऊन स्वामींनीं निवास करावा व माझेकडून नेहमीं यथाशक्ति सेवा घ्यावी" अशी विनंति करून स्वामींना त्या वेळच्या राजानें कुडलगीहून करवीरास आणिलें; स्वामींना आपल्या घरीं वेदोक्त कर्म करण्यासाठीं आणिलें नाहीं किंवा राजाच्या मंजुरीवर आपली सत्ता अवलंबून ठेवून श्रींची स्वारी करवीरास आली, असेंही नाहीं. ज्या अटींवर करवीर मठ स्थापन झाला आणि त्याला इनामें मिळालीं त्या अटींतील मुख्य तत्त्व श्रीचरणांची राजाकडून कांहीं तरी सेवा व्हावी हें होतें. ही मूळची पीठिका विसरून जाऊन अलीकडच्या राजांनीं भलभलत्याच अटी घालणें हें अगदीं अप्रशस्त आहे. विद्याशंकरभारतींना मुसलमान राजे आणि सरदार यांच्याकडूनही कित्येक गांव मिळाले आहेत; पण म्हणून त्यांच्या धर्माप्रमाणें हिंदूंच्या शंकराचार्यांनीं चालावयाचें आहे कीं काय ?

करवीर आणि संकेश्वर या मठांची अशा प्रकारची मूळपीठिका अहे. विद्याशंकरभारती हे मूळचे शृंगेरीच्या गादीवरचे होत व त्यांनींच हे मठ स्थापन केले. यावरून शृंगेरीची परंपरा मध्यंतरीं उच्छिन्न झाली असून आदि शंकराचार्यांनीं प्रचलित केलेली परंपरा आपल्या इकडेच चालत आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. करवीर व संकेश्वर या मठांची स्थापना शके पंधराशेंच्या सुमारास झालेली आहे, व तेव्हांपासून सवातीनशें वर्षेंपर्यंत ती अव्याहत चालत आलेली आहे. आदि शंकराचार्यांनीं सर्व हिंदुस्थानच्या धार्मिक व्यवस्थेसाठीं चार मठ करून त्यांच्या हद्दी ठरवून दिल्या होत्या, त्या त्या वेळच्या राजांच्या सोयींप्रमाणें होत्या

हें उघड आहे. पुढें करवीर क्षेत्रांतील राजानें आपण आमच्या प्रांतीं येऊन धर्मप्रसार करावा, अशी विज्ञप्ति केल्यावरून श्रीशंकरभारती तद्वत् आचरण करूं लागले, व त्या विनंतीला अनुसरून सदर गादीवरील आचार्य अजूनपर्यंतही त्याच प्रांतामध्यें धर्मोपदेश करीत आहेत. कित्येक अज्ञ लोकांनीं अलीकडे आचार्यांच्या हद्दीचे प्रश्न उपस्थित केले आहेत. परंतु हद्दी ह्या राजांच्या होत; धर्माचार्यांना हद्दी नाहींत. सूर्याच्या प्रकाशाला ज्याप्रमाणें हद्द नाहीं, त्याचप्रमाणें ती सद्धर्माच्या उपदेशालाही नाहीं. जेथें जेथें सदुपदेशाची अपेक्षा आहे, आणि तो देण्याला समर्थ असा मनुष्य तयार आहे, तेथें तेथें त्याची हद्द आहेच. त्याला प्रतिबंध कोण करणार? आदि शंकराचार्यांनीं हद्दी ठरवून दिल्या अशी एक भ्रामक कल्पना कित्येकांच्या डोक्यांत शिरलेली दिसते. परंतु आदि जगद्गुरूंचें डोकें इतकें संकुचित खात्रीनें नव्हतें. "आसेतुहिमवच्छैलं सदाचारान् विचारय" असें एक आचार्यांचेंच वचन आहे. या वचनावरून हें उघड दिसून येत आहे कीं, सेतुबंधापासून हिमालयापर्यंत सर्व हिंदुस्थान देश स्वामींनीं आपल्या उपदेशक शिष्यांकरितां मोकळा सोडला होता. त्यांनीं सदाचाराच्या संप्रवर्तकत्वाला कधीं हद्द घालून दिलेली नव्हती. ही त्या वेळची स्थिति होय, आणि त्या वेळेपेक्षां आतां तर सदाचाराची कितीतरी पटीनें अवश्यकता आहे. अशा प्रसंगीं आपल्या हद्दीपेक्षां आपल्या कर्तव्याकडे मनुष्याचें लक्ष जास्त पाहिजे. हिंदुस्थान देश इतका मोठा आहे, आणि हिंदुस्थान देशांतील अनाचाराचा विस्तार हल्लीं इतका मोठा झाला आहे कीं, आदि शंकराचार्यांनीं स्थापन केलेले चार मठच काय, परंतु तसले चार हजार मठ असले तरी ते आजच्या कामाला पुरे होतील किंवा नाहीं याची शंकाच आहे. अशी आपल्या देशाची धार्मिक, राजकीय आणि सामाजिक बाबतींत विपन्नावस्था झाली असतां सुदैवानें ज्यांच्या हातांत धर्मोपदेशकत्व आलें आहे त्यांनीं तें काम उत्तम रीतीनें बजावावें, हेंच त्यांना उचित होय. जे आचार्य इंडियन गव्हर्मेंटप्रमाणें आपली हद्द वाढवूं पहात आहेत, त्यांनीं आपल्या वाट्यांत असलेल्या हद्दींतील धर्मव्यवस्था यथास्थित केली आहे काय? तशी गोष्ट जोंपर्यंत झाली नाहीं, तोंपर्यंत स्वतःच्या हद्दीवरीलच त्यांचा अधिकार उपपन्न होत नाहीं, मग दुसऱ्या हद्दीवरील अधिकार मिळणें तर दुरापास्तच

आहे. दुसऱ्या हद्दी ह्या दुसऱ्या राजांच्या खुशीच्या गोष्टी आहेत, आणि त्याबद्दलचे अधिकार पूर्वीच्या राजांनीं संकेश्वर मठाला दिल्याला तीनशेंहून अधिक वर्षे होऊन गेलेलीं आहेत. तेव्हां ती घडी विसकटून टाकण्याच्या भानगडींत न पडतां आपल्या कर्तव्यकर्माकडे सर्व लक्ष सोंपविणें हें तूर्त जास्त अवश्यक आहे. दूरवर हद्दीपेक्षां दूरवर दृष्टीमध्यें जास्त महत्त्व आहे. आज जे कोणी बाटगे, धर्मभ्रष्ट, अदूरदृष्टि, उदरंभरी किंवा नास्तिक सुधारक एका स्वामींची हद्द वाढविण्याकरितां दुसऱ्या स्वामींशीं भांडत आहेत, त्यांच्याबद्दल सर्वांनीं हें लक्षांत ठेवावें कीं, त्याना कोणताही मठ नको आहे. ह्या मठाची बाजू घेऊन त्या मठाला शिव्या द्याव्या आणि त्या मठाची बाजू घेऊन या मठाला शिव्या द्याव्या, आणि अखेरीस दोन्हीही मठांना रसातळाला न्यावें, याच्यापलीकडे या लोकांचा दुसरा उद्देश नाहीं. अशा नास्तिकांच्याही हातीं कित्येक स्वामींनीं सांपडावें, किंवा त्यांच्या हद्दींची पसरणी करणारांनीं आपल्या स्वामींना असल्या बाटग्यांच्या हातीं द्यावें, हें समजदार म्हणविणाऱ्या स्वामींचें मोठें दुर्भाग्यच होय ! व्यवस्थेसाठीं हद्दी पाहिजेत; परंतु हद्दी ठरविण्यासाठीं धर्मोच्छेदकारक रीतीनें भांडण्याची ही वेळ नव्हे. ही धर्मजागृति करण्याची वेळ आहे. हिंदुस्थानांतील सर्व धर्मगुरूंनीं सध्यांची वस्तुस्थिति लक्षांत घेतली पाहिजे, व लोकांच्या उद्धारासाठीं त्यांनीं आपले कंठ आणि खजिने कोरडे पाडले पाहिजेत. त्यांनीं लोकांत धर्मजागृति केली तर सर्व हिंदुस्थान त्यांच्या हद्दींतीलच आहे. परंतु आपल्या हद्दीच्या पसरणीमध्येंच जर ते निमग्न होतील तर द्वारकेच्याही गादीवर खिस्तीधर्माचा आर्चबिशप येऊन बसण्याला फारसा वेळ लागेल असें नाहीं.

सारांश, करवीर व संकेश्वर या मठांची हद्द देणगीच्या आणि वहिवाटीच्या हक्कानें तर कायम आहेच; परंतु सामान्य वस्तुस्थितीच्या दृष्टीनें पाहिलें असतांही ती अबाधित आहे, हें उघड आहे. हा मठ महाराष्ट्राच्या मध्यभागीं असल्यामुळें शंभर दोनशें वर्षांच्या पूर्वीं जेव्हां महाराष्ट्रांतील योद्धे महाराष्ट्राचा अभ्युदय करीत होते, तेव्हां या मठाचा त्यांच्याशीं बरेच वेळ संबंध आलेला आहे, आणि तो इतिहासदृष्ट्या बराच महत्त्वाचाही आहे. पुण्यांत पेशव्यांचें राज्य असतांना करवीर मठाचे गादीवर एक शंकरभारती या नांवाचे स्वामी होते. कोल्हापूरकर आणि पेशवे यांचा तंटा असल्यामुळें

कागवाड घराण्याचे मूळपुरुष कोन्हेरराव त्र्यंबक पटवर्धन यांस पेशव्यांनीं कोल्हापुरावर हल्ला करण्याविषयीं हुकूम केला. त्याप्रमाणें कोल्हापूरच्या वेशीशीं येऊन मोर्चेबंदी करून पटवर्धनांनीं कोल्हापुराला वेढा दिला, व सात दिवसांत बाहेरील सर्व पेठा आपल्या ताब्यांत घेतल्या. तेव्हां शहरांतील सर्व लोक स्वामींच्या मठामध्यें आश्रयाला जाऊन राहिले. कारण मठावर हल्ला होणार नाहीं, अशी त्यांची मागील अनुभवावरून खात्री होती. हे लोक आपल्या स्वाधीन करावे म्हणून कोन्हेररावांनीं विनंती केली, परंतु आपल्या आश्रयाला येऊन राहिलेल्या लोकांना शत्रूच्या ताब्यांत देणें हें धर्माचें काम नव्हे, हें लक्षांत आणून स्वामींनीं ती गोष्ट मान्य केली नाहीं. तेव्हां कोन्हेररावांनीं स्वामींचा मठ लुटून जाळून फस्त करून टाकिला. त्या वेळीं जुनें दप्तर आणि पुस्तकसंग्रह यांचाही नाश झाला. ही गोष्ट झाली तेव्हां स्वामी क्रोधानें लाल होऊन भर दोन प्रहरीं उन्हांतून पायीं कोल्हापुराहून निघाले व त्यांनीं कृष्णातटाकीं शिरगांव मुक्कामीं जीभ हांसडून प्राण दिला! प्रसंग पडल्यास प्राण देतील, परंतु आपल्या आश्रयास आलेल्या पक्षाचा अभिमान सोडावयाचे नाहींत, अशा प्रकारचे निग्रही स्वामी पूर्वी गादीवर असत. त्यामुळेंच त्यांचा लोकांत वचक बसून त्यांच्या तेजानें त्या वेळीं महाराष्ट्र देश उदयास आला.

दुसराही एक मागचा ऐतिहासिक प्रसंग हल्लींच्या काळीं धडा घेण्यासारखा आहे. सुरेश्वराचार्यांपासून आठवे विद्याशंकरभारती हे समुद्रस्नानाकरितां समुद्रकांठीं गेले असता वसईजवळील विमळनिर्मळक्षेत्रीं समाधिस्थ झाले. त्यांची तेथें समाधि बांधलेली आहे. वसईचा प्रांत त्या वेळीं पोर्तुगीज ख्रिस्ती लोकांच्या ताब्यांत असल्यामुळें त्या परधर्मी लोकांपासून तेथील समाधीला व देवळाला बराच त्रास होत असे. तेथील पाद्री समाधीच्याजवळ एक नवीन ख्रिस्ती देऊळ बांधीत होता व दररोज शंभर मनुष्यें लावून कोणतीही हरकत येण्याच्या अगोदर काम पुरें करून टाकावें असा त्याचा इरादा होता. पाद्र्याचें देऊळ म्हटलें म्हणजे तें इतर ख्रिस्ती लोकांचें स्मशानच होय, त्यामुळें आचार्यांच्या समाधीजवळ परधर्मीयांचीं प्रेतें पडण्याचा त्या वेळीं प्रसंग आला होता. त्याप्रमाणें स्वामींच्या पालखीच्या मिरवणुकीच्या वाटेंत त्यानें मुद्दाम केळी लाविल्या होत्या व त्याजवर हिंदु लोकांना चिडविण्याकरितां हाडें टांगून ठेविलीं होतीं. अशा प्रकारचा आपल्याला परधर्मापासून

त्रास होत आहे, ही गोष्ट त्या वेळच्या लोकांनीं करवीरच्या मठांत जाहीर केली व तेथील संमतीनें त्यांनीं सरकारकडेही एक अर्ज केला. त्या अर्जांतील एक वाक्य विशेष महत्त्वाचें आहे. तें वाक्य हल्लीं अर्ज करणारांचा वचक कां बसत नाहीं हा प्रश्न करणारांनीं विचार करण्यासारखें आहे. सदर अर्जांत लिहिलें आहे कीं, "पाद्री यानें बेअदबीचें भाषण करून काम चालविलें. तें बंद करण्यास हिंदू लोक शक्त नाहींत असें नाहीं. परंतु नामदार सरकारचा अम्मल झाला ते समयीं जाहीरनामे प्रगट झाले, त्यांत कोणाचेही धर्मांत खलेली पडणार नाहीं वगैरे लिहिलें आहे." जे अर्जदार आपलें काम स्वतः करण्याला शक्त असतात, परंतु केवळ कायद्याची शिस्त मोडली जाऊं नये एवढ्याचकरितां जे अर्ज करितात, त्यांचे अर्ज कोणतेंही सरकार अमान्य करीत नाहीं, हें तत्त्व लक्षांत बाळगण्यासारखें आहे. वसई प्रांतीं चिमणाजी आप्पांनीं फिरंगी लोकांवर बरीच दहशत बसविली होती व त्यांच्या कृत्यांनीं लोकांमध्यें विशेष जोम उत्पन्न झाला होता, ते लोक पाद्रयाचें काम बंद पाडण्याला शक्त आहेत किंवा नाहींत याची परीक्षा आधींच होऊन चुकलेली होती, यामुळें त्या लोकांच्या मागण्यांना सरकारनें ताबडतोब मान दिला व त्यामुळें आचार्यांचें वजन सर्व ज्ञातींवर विशेष चांगल्या रीतीनें बसलें.

मठ संकेश्वर आणि करवीर या गादीवरील मागील एका आचार्यांची आणखी एक गोष्ट फार प्रशंसनीय आहे. पेशवाई बुडविल्यानंतर त्यांच्या प्रांतांची सर्व व्यवस्था एल्फिन्स्टन साहेबांकडे देण्यांत आली होती. त्यावेळीं त्यांच्या मनांतून श्रींचें हें संस्थान एक लक्षाचें करावें असें होतें. आपण ब्राह्मणांचें राज्य बुडविलें आहे, तेव्हां ब्राह्मणांच्या गुरूला कांहीं तरी लांच देऊन आपल्याकडे ओढून ठेवावें, हा या देणगींतील राजकीय डाव होता, हें कोणाच्याही लक्षांत येईल. परंतु एल्फिन्स्टन साहेबांच्या ह्या सूचनेला स्वामींनीं जें उत्तर दिलें आहे तें केवळ अवर्णनीय आहे. स्वामींनीं सांगितलें कीं, "पुन्हां बाजीराव राज्यावर आल्यावर त्याजपासून आपण गांव घेऊं. म्लेंछांची देणगी आपण घेत नाहीं." हे उदात्त विचार आणि हीं निग्रहाचीं वाक्यें आतां कोठें आहेत! असे संपत्तीवर लाथ मारणारे आणि स्वाभिमानाला डोक्यावर नाचविणारे सत्पुरुष या मठाच्या गादीवर मागें होऊन गेले, तसेच पुढेंही होवोत, अशी सर्वांची परमेश्वरापाशीं प्रार्थना आहे. "आपण बाजीरावा-

पासून गांव घेऊं, म्लेंच्छांची देणगी आपण घेत नाहीं," हीं वाक्यें ज्यांच्या तोंडून निघालीं त्या स्वामींची हद्द किती विस्तृत आहे याची स्थानिक हद्दींची पसरणी करणाऱ्या क्षुद्र बुद्धीच्या माणसांना काय कल्पना असणार !

सदर मठांतील गादीवर बसलेल्या स्वामींच्या अंतःकरणामध्यें त्यांच्या वेळच्या राजकीय गोष्टींबद्दल किती पीळ होता हें वरील हकीकतींवरून लक्षांत येईलच. परंतु या मठाकडे कित्येक महत्त्वाचे सामाजिक प्रश्नही निर्णयाकरितां आले होते; व त्या बाबतींतही मठाकडून यथाशक्ति बरेच प्रयत्न झालेले आहेत. नरसिंहभारती संस्थानचे गादीवर असतां पुनर्विवाहासंबंधानें पुण्यास मोठा वाद झाला. मागें परशुरामभाऊ पटवर्धन यांनीं श्रींच्या समोर बाल-विधवांचा पुनर्विवाह करण्याची मोकळीक असावी अशाबद्दल प्रयत्न चालविला होता. परंतु ती गोष्ट त्या वेळच्या शिष्टजनांना पसंत पडली नाहीं. अशा प्रकारचा निर्णय होऊन सुमारें साठ वर्षें लोटल्यानंतर शके १७९१–९२ सालीं तोच वाद फिरून पुणें मुक्कामीं करण्यांत आला. परंतु साठ वर्षांमध्यें ह्या पुनर्विवाहाच्या प्रश्नासंबंधानें फारसा फरक पडला नाहीं. परशुरामभाऊंच्या वेळीं जें लोकमत होतें, तेंच विष्णुशास्त्री पंडितांचे वेळींही कायम राहिलें, व तेव्हांपासून आतांपर्यंत आणखी तीस वर्षें लोटलीं आहेत तरी बहुतेक लोक जेथल्या तेथेंच आहेत. त्यामुळें लोकमत बदलण्याचे आधीं स्वामींना असल्या बाबतींत फारसें कांहीं करतां येत नाहीं हें उघड आहे. ह्याशिवाय दुसरा एक वाद नरसिंहभारतींचे कारकीर्दीमध्यें झालेला आहे. गणेशशास्त्री गोळवलकर हे होळकर सरकारमार्फत कांहीं कामासाठीं विलायतेला गेले होते. ते तिकडून परत आल्यावर होळकर सरकारांचें विनंतीपत्र घेऊन संस्थानीं आले. त्या वेळीं परदेशगमनाबद्दल शास्त्री लोकांचीं मतें घेऊन निर्णय करण्यांत आला. शास्त्रज्ञ लोकांनीं अशी संमति दिली कीं, 'समुद्रे नावा प्रत्यंतं स्वधर्मपरित्यागपूर्वकं गतागतेन ब्राह्मणेनसह निष्कृत्युत्तरं यथापूर्वं संव्यवहरणं शास्त्रानुकूलमिति." आपल्या धर्माचा त्याग न करितां समुद्रांतून नौकेनें दूरवर जाऊन आलेल्या ब्राह्मणाबरोबर त्यानें प्रायश्चित्त घेतल्यानंतर पूर्वीप्रमाणें व्यवहार करण्याला शास्त्र अनुकूल आहे; अशा अर्थाची वरील संमति मिळून गोळवलकर शास्त्री यांस शके १७९४ मध्यें पुन्हां संस्कार करून ज्ञातीमध्यें घेण्यांत आलें. अशा प्रकारचीं राजकीय, सामाजिक आणि धार्मिक महत्कृत्यें या मठाकडून मागें

झालीं आहेत व अलिकडेही कित्येक होत आहेत.

हल्लीं नवीन गादीवर आलेले स्वामीमहाराज हेही गादीला योग्य असेच पुरुष आहेत. त्यांची मागील परंपरा त्यांच्या डोळयापुढें आहे, आणि यथावकाशानें त्यांच्याही हातून त्या मागील परंपरेला शोभतील अशीं सत्कृत्यें आणि महत्कृत्यें होतील अशी सर्वांना आशा आहे.

# पशूंच्या साम्राज्याचा इतिहास : ६

काळ : स्वतंत्र, ता. १०।६।१९०४

अशी एक कथा सांगतात कीं, मागें एकदां पशूंच्या साम्राज्यामध्यें फार अव्यवस्था माजून गेली होती. एक पक्ष दुसऱ्या पक्षाशीं लढूं लागला आणि कोणीच कोणाचा हुकूम मानीना. ही अंदाधुंदीची स्थिति पाहून एका कुत्र्यानें ती संधि साधली, आणि आपण त्या साम्राज्याच्या गादीवर बसला. कुत्र्याला ही गादी मिळण्याच्या पूर्वीं त्याचा धंदा अगदीं निराळा होता. तो एका खाटकाच्या येथें नोकरीला होता, व मेंढवाड्यांतल्या मेंढ्यांच्या कळपावर देखरेख करावी आणि कापण्याकरितां त्यांना खाटकाकडे घेऊन जावें, हें त्याच्याकडे काम होतें. ही त्याला पूर्वींची संवय असल्यामुळें तो राज्यावर बसल्यानंतरही त्यानें पूर्वींचा क्रम तसाच चालू ठेविला होता. तो कुत्रा आपल्या साम्राज्यामधून अत्यंत क्रूरपणाची मुद्रा धारण करून चोहोंकडे फिरत असे, व नेहमीं तो आपल्या प्रजाजनांच्या अंगावर भुंके, त्यांना चावत असे, आणि त्यांचीं हाडें चघळून खात असे. राजा ज्या वेळेला असें करूं लागला त्या वेळेला त्या पशूंच्या राष्ट्रांतील सर्व प्रजाजन कुरकूर करूं लागले, व त्यांमध्यें जे जास्त धाडसी होते ते एकत्र जमले आणि त्यांनीं आपल्या त्या क्रूर राजाला ठार मारून टाकलें. अशा रीतीनें तो राजराजाधीश्वर कुत्रा मरण पावल्यानंतर त्या राष्ट्रांतील सर्व नगरवासी पशु एकत्र जमले व आतां पुढें कोणती राज्यपद्धति सुरूं करावी याविषयीं विचार करूं लागले. अखेरीस सगळ्यांच्या मतानें असें ठरलें कीं, आपणा पशूंमध्यें लोकसत्तात्मक राज्याची पद्धत आपण सुरूं करावी, व त्याप्रमाणें त्या पशूंच्या साम्राज्यांत लोकसत्तात्मक राज्यपद्धति सुरूं झाली. कोणतीही गोष्ट कर्तव्य झाल्यास आधीं

प्रत्येक पशूचें मत घ्यावयाचें आणि ज्या बाजूला पशूंचें मताधिक्य असेल त्याप्रमाणें व्यवस्था करावयाची, अशा प्रकारचा राज्यकारभार सुरू झाला. परंतु हें जें पशूंचें लोकसत्तात्मक राज्य स्थापन झालें होतें, त्याच्याशीं मनुष्यांनीं थोडेच दिवसांमध्यें कांहींतरी कुरापत काढून लढाई सुरू करण्याचा घाट आणिला. त्या वेळीं हें संकट कसें टाळावें याचा विचार करण्याकरितां सर्व पशू आपल्या सभेच्या दिवाणखान्यांत जमा झाले व वाद-विवाद सुरू झाला. घोडा, अस्वल, गेंडा, वाघ, हत्ती, सिंह, या सर्व मंडळींनीं सभेच्या प्लॅटफॉर्मावर येऊन मोठमोठीं आवेशयुक्त भाषणें केलीं, व आपण हातांत शस्त्रें घेऊन शत्रूचा पराभवच केला पाहिजे असें त्यांनीं आपल्या सर्व देशबांधवांना उत्तेजन दिलें. ह्या आशयाचीं या मंडळींचीं भाषणें झाल्या-नंतर बाकीच्या पशूंचें मत घेण्यांत आलें. त्यावेळीं मेंढरूं, ससा, हरिण, गाढव, बारिकसारिक किडे, पक्षी आणि मासे या सगळयांनीं एकच ओरड करून असें सांगितलें कीं, आपण आपल्या शत्रूशीं लढाई करून उपयोगीं नाहीं, तह करूनच आपण आपला प्राण त्यांच्यापासून बचावून घेतला पाहिजे. अशीं दोन प्रकारचीं दोन मतें पडलीं. परंतु कोठें झालें तरी शूर लोकांपेक्षां भित्र्या लोकांची संख्या नेहमींच जास्त असावयाची, त्याप्रमाणें ती पशूंच्या संस्थानामध्येंही होती. शहाण्यांपेक्षां मूर्खांची आणि शूरांपेक्षां भित्र्यांची संख्या जास्त असल्यामुळें व मताधिक्यानें काम चालविण्याची पद्धत स्वीकारलेली असल्यामुळें मूर्ख आणि भित्र्या पशूंच्या मताप्रमाणें त्या प्रकरणाचा निकाल लागला. सिंह, वाघ, हत्ती, घोडा या शूर पशूंनाही मेंढरें, ससे, आणि गाढव यांच्या बरोबर आपल्या हातांतील शस्त्रें खालीं ठेवून त्या वेळीं सर्वांना मनुष्याला शरण जाणें भाग पडलें. ह्या लोकसत्तात्मक राज्य-पद्धतीचा असा भयंकर परिणाम झाल्याकारणानें ती पद्धत पशूंना पसंत पडेनाशी झाली, व आपल्या संस्थानामध्यें दुसरी कांहींतरी राज्यपद्धति सुरू करण्याच्या विचाराला सर्व पशू लागले. त्यांनीं एक नवीन पद्धत शोधून काढली. कांहीं निवडक मंडळी निवडून काढून ते ज्यांत वाकबगार असतील तीं कामें त्यांच्याकडे सोंपवावीं, म्हणजे संस्थानचीं सर्व कामें चांगल्या रीतीनें पार पडतील, ही कल्पना सर्वांना पसंत पडली, व त्याप्रमाणें योग्य काम-गारांची संस्थानच्या निरनिराळया खात्यांवर योजना करण्यांत आली. राष्ट्रां-

तील एकंदर खजिन्याचें आणि हिशोबाचें काम लांडग्याकडे सोंपविण्यांत आलें, व कोल्हा हा त्याच्या हाताखालीं सेक्रेटरी म्हणून नेमण्यांत आला. सर्व फौजदारी गुन्ह्यांची चौकशी करण्याच्या कामावर खबुतरांची नेमणूक करण्यांत आली. कायद्याच्या कलमाप्रमाणें एखादी गोष्ट न्याय्य म्हणून ठरली तरी नीतिशास्त्राच्या नियमांप्रमाणें तो न्याय्यच आहे कीं नाहीं, हें पाहण्याचें काम वाघाकडे दिलें गेलें. पातिव्रत्याविषयींचे नियम शेळ्यांनीं अमलांत आणलेले पहावे असें ठरलें. देशाचें संरक्षण करण्याचें शिपाईगिरीचें काम सशांकडे सोंपविलें, आणि त्या शिपायांची अन्नसामग्री वगैरे उचलून नेण्याच्या कामावर सिंह आणि हत्ती यांची योजना झाली. परदेशच्या राजांच्या दरबारांतून या पशूंच्या साम्राज्याच्या वतीनें कोणी तरी वकील पाहिजे होते, त्या कामावर गाढवाची रवानगी करण्यांत आली. आणि अशा रीतीनें सुरू केलेली ही राज्यपद्धति बरोबर आहे किंवा नाहीं हें वरच्यावर तपासून पाहणें अत्यंत अवश्यक असल्यामुळें एकंदर राज्यकारभारावरील इन्स्पेक्टरजनरलच्या हुद्द्यावर मुंगीची स्थापना करण्यांत आली. अशा प्रकारच्या या राज्यपद्धतीचीं फळें लवकरच दृष्टोत्पत्तीस येऊं लागलीं. फायनॅन्स मिनिस्टर, लांडगा याच्या जबड्यांतून जर कोणी यदाकदाचित् बचावला, तर त्याचा सेक्रेटरी कोल्हा हा त्याच्यापाशीं काय असेल नसेल तें घेऊन त्याला नागवून सोडूं लागला. आणि त्याच्याहि तडाक्यांतून जर कोणी दैवयोगानें सुटला, तर परदेशचा वकील, गाढव, त्याला दुगाण्या मारून चीत करून टाकीत असे. वाघ हा नीतीच्या नांवाखालीं अनाथ प्राण्यांना चावून टाकी, आणि फौजदारी गुन्ह्याच्या न्यायासनावर गरीब खबुतरें बसलेलीं असल्यामुळें खून करणारे आणि दरवडे घालणारे लोक न्यायाच्या कचाट्यांतून अचानक सुटून जात. आणि अशा प्रकारची चोहोंकडे अव्यवस्था अत्यंत परिपूर्ण रीतीनें चाललेली असतां इन्स्पेक्टर जनरल, मुंगी ही राज्याचा बंदोबस्त फार उत्तम प्रकारचा आहे अशा प्रकारचे रिपोर्ट दिवसांतून चार वेळां प्रसिद्ध करीत होती. त्या रिपोर्टांवरून आपला राज्यकारभार खरोखरच फार उत्तम प्रकारचा चालला आहे, अशी समजूत होऊन सर्व पशु सुखानें झोंपी जात.

ही गोष्ट ज्यानें प्रथम लिहिली त्यानें ती हिंदुस्थानाकरितां लिहिली आहे, असें मुळींच नाहीं. परंतु एकाच वस्तूचे अनेक उपयोग होत नाहींत असें मात्र नाहीं.

# फितुरी : : : ७

काळ : अग्रलेख, ता. १०-६-१९०४

हिंदुस्थानच्या इतिहासांतील कोणताही भाग आपण वाचूं लागलों असतां आपल्या पारतंत्र्याला कोणत्याना कोणत्या तरी रीतीनें आपणच कारणीभूत झालेले पाहून देशभक्तीनें उद्दीपित झालेल्या अंतःकरणाला वाईट वाटल्यावांचून राहत नाहीं. इंग्लिशांनीं आपल्याला जिंकलें याबद्दल खेद नाहीं. कारण, त्यांनीं आज आपल्याला जिंकलें आहे, तर पुढेंमागें असाही एक दिवस येईल कीं, ज्या दिवशीं आपण त्यांना जिंकूं. लढाईच्या गोष्टी या शौर्याच्या, मर्दुमकीच्या आणि ईश्वरी कृपेच्या आहेत. आणि त्यांतील जय किंवा पराजय हे जसे प्राप्त व्हावयाचे असतील तसे ते होतात, त्यांबद्दल खेद मानून काय उपयोग आहे? जर आपल्या अंगांत शौर्य नसेल, तर तें आणण्याविषयीं प्रयत्न केले पाहिजेत; आणि जर आपल्यावर ईश्वरी कृपा नसेल, तर ती संपादन करून घेतली पाहिजे. तेव्हां असल्या सरळ गोष्टींबद्दल वाईट वाटण्याचें कांहीं कारण नाहीं. परंतु या गोष्टींची अनुकूलता असूनही जेथें आपल्यांतील फितुरीमुळें आपले पराभव होतात तेथें मात्र वाईट वाटण्याची परमावधि होऊन जाते. असलीं फितुरीचीं उदाहरणें आपल्या देशाच्या इतिहासामध्यें किती तरी सांपडतात. फितुरी म्हटली म्हणजे तिचीं बारिकसारिक उदाहरणें इतिहासांतून शोधून काढण्याकडे मनाची पहिली प्रवृत्ति होते. परंतु हिंदुस्थानच्या इतिहासांत फितुरीचीं उदाहरणें हुडकून काढण्याकरितां कोनाकोपऱ्यांत जाण्याचें कांहीं कारण नाहीं. जेथें राजरोस फितुऱ्या चालल्या आहेत, तेथें कोनाकोपऱ्यांतील फितुऱ्यांचें काय मोठेंसें महत्त्व आहे! हिंदुस्थानांतील लोक

दिवसाढवळ्या फितुरी करण्याला शिकले आहेत, फितुरी हें आपल्या पोटाची खांच भरण्याचें त्यांना एक उत्तम साधन झालें आहे, व ही गोष्ट त्यांच्या इतकी अंगवळणीं पडली आहे कीं, आपण करतों यांत कांहीं पाप आहे असें त्यांच्या स्वप्नींही येत नाहीं. इंग्लिशांच्या पूर्वी हिंदुस्थानांतील लोकांना पुष्कळांनीं जिंकिलें असेल; पण त्यांनीं आमचा मनुष्यपणा आमच्यापाशीं कायम ठेवून आम्हांला जिंकिलें. इंग्लिशांनीं मात्र आम्हांला आधीं पशु केलें आणि मग जिंकिलें. आपला देश जिंकून दुसऱ्यांच्या हातीं देण्यासाठीं लढणारे लोक पृथ्वीच्या पाठीवर दुसऱ्या कोठेंही आढळावयाचे नाहींत; परंतु इंग्लिशांनीं हिंदुस्थानांत असे लोक निर्माण केले. इंग्लिशांनीं पहिल्यानें हिंदुस्थानांतील लोकांना फितुरी शिकविली. हिंदुस्थानांतील लढवय्ये जातींतील लोकांना आपले पलटणींतील चाकरीवर ठेवून त्यांना आपल्या शौर्याचा दुरुपयोग करण्याचा इंग्लिशांनीं प्रथम धडा घालून दिला. पोट भरण्याचे खोटे मार्ग आणि शौर्य गाजविण्याच्या खोट्या कल्पना हिंदुस्थानांतील लोकांच्यापुढें मांडून इंग्लिशांनीं त्यांना इहलोकीं पारतंत्र्यनरकाच्या आणि परलोकीं रौरवनरकाच्या वाटेला प्रथम लाविलें. जितके हिंदुस्थानचे लोक हिंदुस्थान जिंकून घेणाऱ्या इंग्लिशांच्या नोकरींत आहेत, तितके सगळे फितूर, अशी स्थिति असतांना फितुरीच्या उदाहरणांना काय तोटा! इंग्लिशांच्या पलटणींतील व इतर चाकऱ्यांतील प्रत्येक नोकर म्हणजे फितुरीचें एकेक उदाहरण होय! कोणी आठ रुपयांसाठीं फितुरी करतो, कोणी तीस रुपयांसाठीं फितुरी करतो, कोणी तीनशें रुपयांसाठीं फितुरी करतो व कोणी तीन हजार रुपयांसाठीं फितुरी करतो. रुपयांत काय तो फरक. बाकी स्वदेशहितासंबंधानें पाहिलें तर सगळे सारखेच फितुरी! जेथें असे सगळेच फितुरी लोक पसरलेले आहेत, तेथें त्यांच्यामध्यें चांगली फितुरी आणि वाईट फितुरी अशी निवड काय करावयाची? असले फितुरी लोक हिंदुस्थानामध्यें किती लाख असतील, याची गणना करणें फार कठीण आहे. परंतु लष्करी आणि मुलकी खात्यांतील सर्व नोकर लोकांची कशी तरी गणती केली, तरी त्यांच्या अन्नावर पोसले जाणारे आणि त्यामुळें फितुरीच्या अन्नानें सत्कर्मापासून ज्यांची मति भ्रष्ट झाली आहे असे लोक हिंदुस्थानांत किती कोटी असतील याच्याबद्दल कल्पना करणेंही अशक्य आहे. अशा

रीतीनें हा फितुरीचा संसर्गजन्य रोग इंग्लिशांनीं सर्व हिंदुस्थानामध्यें जिकडे तिकडे पसरून टाकिला आहे. हिंदुस्थानांतील लोकांच्या शारीरिक सुरक्षिततेसाठीं सॅनिटेशनचें खातें काढून त्याच्या योगानें ते लोक देवी, ताप, पटकी, प्लेग वगैरेसारख्या रोगांपासून येथील लोकांना दूर ठेवीत आहेत. परंतु तेच इंग्लिश लोक वर सांगितलेल्या रोगांपेक्षां अतिशय भयंकर असा हा फितुरीचा रोग आपल्या हातानें जिकडे तिकडे फैलाविण्याचा प्रयत्न करीत आहेत. प्लेगानें कधींही मेले नसतील इतके हिंदुस्थानांतील लोक या फितुरीच्या रोगानें मारून ठेविलेले आहेत. असल्या ह्या भयंकर विषारी रोगाचा प्रसार बंद करण्याकरितां सर्वांनीं जिकडे तिकडे या रोगाविरुद्ध क्वारंटाइन्स बसविलीं पाहिजेत, या रोगाचा ज्यांना संसर्ग झालेला आहे त्यांना सेग्रिगेशनमध्यें ठेविलें पाहिजे, व या रोगानें एखाद्याच्या मनावर उघड रीतीनें किंवा गुप्तपणानें हल्ला केला आहे किंवा नाहीं हें बरोबर रीतीनें जाणण्याकरितां त्याच्या मनाची आयुष्याच्या प्रवासांतील प्रत्येक स्टेशनवर फार काळजीपूर्वक रीतीनें तपासणी केली पाहिजे. असल्या कडक उपायांच्या योजनेनें हिंदुस्थानांतील हा फितुरीचा रोग कधीं समूळ नाहींसा होईल तो सुदिन होय. परंतु तूर्त तर जिकडे तिकडे फितुरी पसरलेली आहे. राजरोस फितुरी होत आहे. जास्त महत्त्वाची फितुरी करणाराला समाजामध्यें जास्त मान मिळत आहे. असली फितुरी करून उदरनिर्वाह करणाराला कोणीही नीच, अधम किंवा पतित म्हणून समजत नाहीं. हीं फितुरी म्हणजे एक अत्यंत निंद्य गुन्हा होय, आणि तो करतांना आपण शरमलें पाहिजे, असें कोणालाही वाटत नाहीं. असल्या फितुरीवर मिळविलेल्या पैशानें देवळें बांधिलीं जातात आणि देव त्या देवळांतून खुशाल जाऊन बसतात, व ब्राह्मणभोजनें घातलीं जातात आणि ब्राह्मण तेथें जाऊन खुशाल जेवतात. इतका या फितुरीचा फैलाव आपल्यामध्यें झालेला असल्याकारणानें या राजमान्य फितुरीमध्यें कांहीं दोष आहे असें कोणाच्या कधीं स्वप्नांतसुद्धां येत नाहीं, आणि अशा रीतीनें ही सार्वत्रिक फितुरी सद्गुणाखालीं मोडूं लागल्याकारणानेंच व्यक्तिविषयक फितुरीला महत्त्व आलें आहे. वास्तविक रात्रीच्या काळोखामध्यें काजळाच्या कणाची किंमत कोणालाही वाटली नसती. परंतु रात्रीचा काळोख म्हणजे दिवसाचा सूर्यप्रकाश, अत्यंत अधम कृत्य म्हणजे अतिशय महत्त्वाची कामगिरी, अत्यंत देशद्रोह म्हणजे

उत्कट देशभक्ति, आणि निमकहरामपणाची फितुरी म्हणजे सर्व सद्‌गुणांतील अतिश्रेष्ठ सद्‌गुण, अशी विपरीत स्थिति हिंदुस्थानमध्यें झालेली असल्या-कारणानेंच पुढील गोष्टीसारख्या फितुरीच्या गोष्टी वाचकांपुढें मांडण्याला अवकाश सांपडतो, हें कोणीही विसरतां कामा नये.

व्यक्तिविषयक फितुरीच्या गोष्टीदेखील आपल्या इतिहासामध्यें अनेक आहेत. त्यांपैकीं आम्ही आज जी येथें देत आहों ती नेपाळच्या मोहिमेच्या वेळची आहे. नेपाळच्या विरुद्ध पहिली लढाई इसवी सन १८१४ मध्यें सुरू झाली. त्या वेळीं नेपाळी गुरखे लोक यांनीं आपल्या प्रदेशाच्या पश्चिमेकडील डोंगरांतील कमाऊनपासून सतलज नदीपर्यंत बहुतेक सर्व डोंगराळ प्रांत आपल्या हस्तगत करून घेतला होता. त्या प्रांतांतून त्यांना काढून लावण्याकरितां व कमाऊन प्रांताची राजधानी अलमोरा ही आपल्या स्वाधीन करून घेण्याकरितां कर्नल गार्डनर यांनीं गुरखे लोकांबरोबर लढाई चालविली होती. अलमोरापासून कांहीं अंतरावर बागेसरी या नांवाचें पहाडामध्यें एक ठिकाण आहे, व तेथून थोड्याशा अंतरावर आणि समुद्रापासून ७,००० फूट उंचीवर गणनाथ या नांवाचा एक अतिशय उंच डोंगर आहे, व तेथूनच रामायणांत प्रसिद्ध असलेली शरयू नदी वहात आलेली आहे. हिमालय पर्वत, शंकराचें वसतिस्थान, ऋषिजनांच्या पादस्पर्शानें पवित्र झालेली भूमि, श्रीरामचंद्राच्या पवित्र चरित्रानें पुण्यतम झालेल्या शरयू नदीचें सान्निध्य, आणि या सगळ्यांच्या शिरोभागीं गणनाथाचें मंदीर, इतक्या हिंदुधर्मांतील अत्यंत पवित्र वस्तूंचा समुच्चय झालेला असतां तेथील मानवी मनामध्यें कोणत्याही प्रकारच्या पातकाला वास करण्याला जागा मिळूं नये, असें कोणालाही साहाजिकपणें वाटेल. परंतु आमच्या फितुरीनें आम्हांला तेथेंही सोडलें नाहीं ! हिमालयाचें शुभ्र बर्फ आणि शरयूचें स्वच्छ पाणी हींसुद्धां आम्ही आपल्या फितुरीच्या पातकानें कलुषित करून सोडलीं आहेत ! आपला देश परतंत्र करून सोडण्याच्या कामीं आम्हीं कोणतीही जागा किंवा वेळ वर्ज्य मानिली नाहीं ! फितुरीचें नीच कृत्य करितांना आम्ही गणनाथाला भ्यालों नाहीं, हिमालयाचा तो अद्‌भुत आणि प्रचंड विस्तार पाहून आमचीं मनें कचरलीं नाहींत, किंवा ते हिमालय पर्वताचे तुटलेले भयंकर खोल कडे

आणि त्यामधून वहाणाऱ्या शरयू नदीचे ते विस्तीर्ण ओघ आम्हां पातक्यांचे शतशः तुकडे करून टाकतील ही दहशतही आमच्या मनाला कधीं शिवली नाहीं ! फितुरीच्या पातकाच्या कामांत आमच्यासारखे निर्भय, शूर आणि साहसी लोक जगामध्यें विरळाच सांपडतील !

हस्तिदल या नांवाचा गुरखे लोकांचा एक सेनापति होता. अलमोराच्या आसपास कतरमाल वगैरे ठिकाणीं इंग्लिशांचें सैन्य पसरलें होतें, व त्या सैन्यानें हस्तिदलाची फौज वेष्टिली जाण्याचा संभव होता. म्हणून बागेसरी-कडील उत्तरेच्या बाजूचा रस्ता अन्नसामग्री व कुमक आणण्याकरितां आपल्या स्वाधीन रहावा या हेतूनें हस्तिदल आपल्याबरोबर सैन्याची एक तुकडी घेऊन उत्तरेकडे जाण्याकरितां निघाला. ही बातमी इंग्लिशांना कळल्याबरोबर कर्नल निकल्स यानें आपल्या हाताखालील ९०० लोक हस्तिदलाच्या हालचालींवर नजर ठेवण्याकरितां व प्रसंग पडल्यास लढाई देण्याकरितां निराळया वाटेनें पाठविले. हस्तिदलाचें सैन्य गणनाथाच्या डोंगरावर येऊन दाखल झालें होतें, व तें नुकतेंच आलेलें असल्यामुळें तें लढाईला सिद्ध नव्हतें. इंग्लिशांचें सैन्य दुसऱ्या रस्त्यानें आसपास येऊन ठेपलेंच होतें; व शत्रूची कशी स्थिति आहे, ते लोक कोठें छावणी देऊन उतरले आहेत, आणि ते बेसावध असतां त्यांच्यावर हल्ला करण्याला कोणती वेळ सोईची आहे, याबद्दलची माहिती त्यांना पाहिजेच होती. गुरखे लोकांचें सैन्य आणि इंग्लिशांचें सैन्य यांचे दरम्यान गणनाथाचें देऊळ होतें, व तेथील देवाच्या पूजेसाठीं तेथें कांहीं ब्राह्मण रहात होते. त्यांना दोन्ही सैन्यें येऊन उतरलेलीं माहीत होतीं, व त्यांपैकीं कोणाला कशाची अपेक्षा आहे हें त्यांना कळत होतें. इतिहासामध्यें अशी हकीकत लिहिलेली आढळते कीं, गुरखे लोकांचें लष्कर गणनाथाच्या देवळाच्या दक्षिणेस उतरलें आहे, त्यांची लढाईची तयारी नाहीं व ते शिपाई संध्याकाळचें जेवण करण्याचे कामांत गुंतले असतां ती वेळ त्यांच्यावर हल्ला करण्याकरितां फार सोईची होईल, अशा प्रकारची बातमी गणनाथाच्या देवळांतील ब्राह्मणांनीं इंग्लिशांना दिली ! त्या ब्राह्मणांच्या ह्या असल्या कृत्याबद्दल काय म्हणावयाचें ! इंग्लिशांना ही बातमी पोहोंचल्याबरोबर त्यांनीं संध्याकाळच्या वेळीं गुरख्यांच्या छावणी-वर हल्ला करून तेथील सर्व सैन्याचा फडशा उडवून टाकिला. ह्यांत

गणनाथाच्या पुजाऱ्यांना काय मिळालें? इंग्लिश लोक हे त्यांचे कोण? गुरखे लोक आणि गणनाथाचे पुजारी यांचा किती तरी जास्त निकट संबंध! दोघेही एकाच देशांतील आणि एकाच धर्मांतील; तो देश आणि तो धर्म कायम राखण्याकरितां दोघांनींही एकमेकांच्या खांद्याला खांदा लावून एकजुटीनें काम करावयाला पाहिजे होतें. परंतु हिंदुस्थान देशाची आणि तेथील धर्मांची दैवगति अशी विचित्र कीं, त्यांतील कांहीं लोक त्यांचें संरक्षण करण्याकरितां आपला प्राण देत असतां दुसरे लोक त्यांच्याबद्दलच्या चहाड्या परकीय लोकांपाशीं जाऊन सांगणारे निघतात! गुरखे म्हणजे गोरक्षक, म्हणजे गाईचें रक्षण करणारे; हिंदुधर्मांत अत्यंत पवित्र मानलेली जी गाय तिचें संरक्षण करणाऱ्या लोकांचा पक्ष सोडून त्या गाईचें भक्षण करणारे जे इंग्लिश लोक त्यांच्या पक्षाला गणनाथाच्या ब्राह्मणांनीं मदत करावी, हें ब्राह्मण म्हणविणारांचें केवढें बुद्धिमांद्य होय! बागेसरी हा वागीश्वरी या शब्दाचा अपभ्रंश होय. गणनाथ आणि वागीश्वरी म्हणजे आपल्या नेहमींच्या परिपाठांतील गणपति आणि सरस्वति होत. ह्या दोन्हीही देवता सद्बुद्धिदायक आहेत, अशी आपल्या धर्माची कल्पना आहे. ह्या दोन्ही देवता हिमालयामधील आपापल्या स्थानांवरून त्या ब्राह्मणांचें हें नीच कृत्य पहात असतां त्यांनीं त्यांच्या मनांत सद्बुद्धीची कांहींच प्रेरणा केली नाहीं, हें मोठें आश्चर्य होय! गणनाथाच्या देवळांतील पुजारी ब्राह्मण हे त्या देवतेच्या पूजेकरितां तेथें नेमलेले होते. त्यांनीं गणनाथाची पूजा करून आपल्या धर्माचें, देशाचें आणि देशबांधवांचें अभीष्टचिंतन करावयाचें, हें त्यांचें कर्तव्यकर्म होय. परंतु तें सर्व सोडून देऊन तेच जेव्हां परधर्मीय इंग्लिश लोकांना आपल्या घरांत घेऊं लागले, आणि त्यांच्या तरवारी आपल्या देशबांधवांच्या मानेवर ठेवूं लागले, तेव्हां असल्या ब्राह्मणांना काय म्हणावयाचें! त्या ब्राह्मणांना इंग्लिशांनीं या त्यांच्या कृतघ्नपणाच्या कृत्यांबद्दल कांहीं इनाम करून दिलेलें आहे कीं काय, व अशा रीतीनें संपादन केलेल्या त्या पैशावर त्या ब्राह्मणांचे हल्लींचे वंशज असलींच धर्मकृत्यें करीत आहेत कीं काय, याच्याबद्दल कांहीं माहिती नाहीं. परंतु असलीं धर्मकृत्यें होण्यापेक्षां न झालेलीं जास्त चांगलीं. इंग्रज लोक हिंदुस्थानांत शिरत असतां आपल्यांतील ब्राह्मण म्हणविणारांना देखील आपलें काय कर्तव्यकर्म आहे याची कल्पना नव्हती, ही मोठ्या दुःखाची गोष्ट

आहे. हिंदुस्थान हा आपला देश आहे, इंग्लिश लोक हे परकीय लोक त्यामध्यें शिरत आहेत, त्यांचा येथें शिरकाव होऊं देण्याचें आपल्याला कांहीं एक कारण नाहीं, उलट त्यांना प्रतिबंध करण्यासाठीं हिंदुस्थानांतील सर्व लोकांनीं एकत्र झालें पाहिजे, ह्या कल्पना त्या वेळीं सर्वांच्या मनांत उत्पन्न व्हावयाला पाहिजे होत्या. परंतु त्या जर सर्व वर्णांतील श्रेष्ठ अशा ब्राह्मणांच्याच डोक्यांत नव्हत्या तर त्या इतरांच्या डोक्यांत कोठून येणार? उलट कित्येक प्रसंगीं असेंही होई कीं, क्षात्रकर्म करणाऱ्या लोकांनीं देशासाठीं लढत असावें आणि ब्राह्मणाचें कर्म करणारांनीं घरभेदेपणाचा धंदा करीत असावें! मागें हीं जीं कृत्यें झालीं त्यांचीं परिपक्व फळें हिंदुस्थान देश आतां चाखीतच आहे, तरीही अजून आपले डोळे उघडत नाहींत. मागच्या चुका ह्या पुढील शहाणपणासाठीं होत. आणि म्हणूनच मागच्या गोष्टी सांगावयाच्या. मागच्या ब्राह्मणांनीं अमुक अमुक फितुरी केली, हें सांगण्याचा उद्देश आतांच्या ब्राह्मणांनीं तरी तशी फितुरी करूं नये हा होय. ज्यांना मागच्या अनुभवानेंही शहाणपणा येत नाहीं, ते मनुष्यकोटींत गणले जाण्याला पात्र नाहींत. प्रातःकाळीं शरयूनदीचें स्नान करून गणनाथ आणि वागीश्वरी यांचें वेदोक्त मंत्रांनीं षोडशोपचार पूजन करणें आणि दुपारच्या प्रहरीं गोरक्षक लोकांची छावणी कोठें आहे याबद्दलची बातमी गोमांसाचा उपाहार करीत बसलेल्या इंग्लिशांच्या कर्नलला जाऊन सांगणें ही धर्माची खरी कल्पना नव्हे. या प्रश्नांचा आपण फार व्यापक रीतीनें विचार केला पाहिजे. फितुरीच्या नीच कृत्याला आपण नीच म्हणूनच समजलें पाहिजे. स्वदेशाभिमान आणि स्वधर्माभिमान यांची किंमत प्रातःस्नान आणि देवपूजा यांच्या तोडीची किंबहुना त्यांच्याहून शतपटीनें जास्त आहे, ही गोष्ट आपण सर्वांनीं लक्षांत बाळगिली पाहिजे. धर्माची खरी कल्पना ज्यांच्या मनामध्यें बिंबली त्यांच्या धर्माच्या कल्पनेमध्यें स्वदेशाभिमानाचा समावेश झालाच पाहिजे. असली जी धर्माची कल्पना तीच आपल्या पूर्वजांना कल्याणकारक झाली आणि तीच आपल्या वंशजांना मोक्षदायक होईल. यासाठीं हे धार्मिक फितुरीचे मार्ग सोडून देऊन आपण सर्वांनीं स्वदेशाभिमानमूलक धर्माकडे वळलें पाहिजे. म्हणजे त्यांत आपणां सर्वांना सौख्य आहे.

---

# एक ऐतिहासिक पदार्थसंग्रहालय : ८

काळ : अग्रलेख, ता. १५।७।१९०४

● हिंदुस्थानात ऐतिहासिक पदार्थसंग्रहालयें कर्झन याच्या प्रोत्साहनामुळें स्थापन होऊं लागलीं होतीं.

हें सगळयांना माहीतच असेल कीं, इंग्लिशांचें हिंदुस्थानावर प्राबल्य होण्याचे पूर्वी ठग लोकांचें येथील लोकांवर फार प्राबल्य होतें. इंग्लिश लोक येथील लोकांचे पैसे विलायतेस नेऊं लागण्याच्या पूर्वी ठग लोक हिंदुस्थानांतील लोकांपासून पुष्कळ पैसा काढीत असत. इंग्लिशांनीं आगगाड्या वगैरे बांधून नेटिव प्रवाशापासून पैसे काढण्याला सुरवात करण्याचे पूर्वी पुष्कळ मंडळीचे मोठमोठे तांडे करून तीर्थस्नानासाठीं, व्यापारासाठीं किंवा इतर कांहीं कामासाठीं प्रवासाला निघणाऱ्याला लोकांना वाटेंत गांठून नागविण्याचें काम ठग लोक करीत असत. परंतु हिंदुस्थानांतील लोकांच्या सुदैवानें हिंदुस्थानांत लवकरच इंग्लिशांचा उदय झाला, व मोठा मासा लहान माशाला खातो त्याप्रमाणें इंग्लिशांनीं हिंदुस्थानांत ठग लोकांचें नांव देखील शिल्लक ठेविलें नाहीं. हे इंग्लिशांचे हिंदुस्थानांतील लोकांवर अत्यंत उपकार आहेत. इंग्लिशांनीं हिंदुस्थानांतील ठगींचा बीमोड केल्यामुळें आतां हिंदुस्थानांतील लोकांना ठग या नांवाखालीं मोडणारा कोणी आडवाटेंत गांठील, लुटील, छळील, नागवील किंवा हालहाल करून मारील, ही भीति स्वप्नांत सुद्धां उरली नाहीं. अशा रीतीनें ते त्या वेळचे ठग लोक सूर्यप्रकाशामध्यें नक्षत्राप्रमाणें हल्लींच्या ह्या इंग्रजी राज्यामध्यें पूर्णपणें लोपून गेलेले आहेत. त्यांच्या कांहीं कांहीं गोष्टी मात्र अवशिष्ट राहिल्या आहेत.

हुसेन या नांवाचा एक मुसलमान मनुष्य या ठग लोकांच्या टोळींत

फार प्रख्यातीस आलेला होता. याच्यासारखा शूर, साहसी, धाडसी, कल्पक, बुद्धिमान् आणि चतुर असा ठग मोठमोठ्या कारस्थानी राजांमध्येंही क्वचित्च सांपडेल. याचा जन्म अठराव्या शतकांत युरोपखंडांतील कान्स्टॅन्टिनोपल शहरांत झालेला होता. त्याची लहानपणापासून आपण राजा व्हावें अशी महत्त्वाकांक्षा होती. याकरितां त्याला समजूं लागलें तेव्हांपासून आपली ही महत्त्वाकांक्षा परिपूर्ण करण्याकरितां चोऱ्या, दरवडे, खून वगैरे सर्व राजकीय कलांमध्यें त्यानें प्रावीण्य संपादन केलें. खोटें बोलण्याचा त्यानें अभ्यास केला; परंतु एखादे वेळीं आपल्या मित्रांपाशीं बोलतांना चुकून त्याच्या तोंडून एखादा खरा शब्द निघाला, तर तो ताबडतोब ते मित्र गेल्यावर आपल्या जिभेला खरें बोलल्याबद्दल एक चरचरीत चिमटा घ्यावयाचा, हें काम पहिल्यानें करीत असे. थाप कशी मारावयाची, आश्वासन कसें द्यावयाचें, गोड कसें बोलावयाचें, ममता कशी दाखवावयाची, मनांत आनंद असतां डोळ्यांत अश्रु कसे आणावयाचे, आणि अंतःकरणांत अत्यंत द्वेष असतां चेहऱ्यावर हास्यमुद्रा कशी दाखवावयाची, इत्यादि सर्व विद्यांचा व्यासंग त्यानें फार काळजीपूर्वक रीतीनें केला होता. दुसऱ्याचे खिसे कातरणें, दुसऱ्याच्या डोळ्यांत धूळ टाकणें, त्याची पगडी आपल्या डोक्यावर ठेवून ती आपलीच म्हणणें, लोकांना खदखदां हंसवून एकीकडे त्यांच्या अंगांतील रक्त पिणें, इत्यादि सर्व साधनांचा त्यानें आपल्या बुद्धीमध्यें संग्रह करून ठेविला होता. सारांश, राजा होण्याला ज्या ज्या म्हणून अवश्यक गोष्टी सर्व काळीं सारख्याच उपयोगी पडतात, त्या सगळ्या त्यानें पैदा करून घेतल्या होत्या. फक्त ह्या सगळ्यावर पांघरूण घालून हे दैविक सद्गुण आहेत असें भासवून देणारीं धर्मशास्त्र, नीतिशास्त्र, सुधारणाशास्त्र, वगैरे जीं अनेक शास्त्रें त्यांचें मात्र अध्ययन करावयाचें त्याचें राहिलें होतें. तें करण्यासाठीं तो रोम, पॅरिस, बर्लिन, लंडन किंवा सेंटपीटर्सबर्ग येथें कोठें तरी जाणारच होता. परंतु इतक्यांत त्याचें दुर्दैव ओढवलें. हुसेनचा अशा प्रकारचा विचार आहे व अशी त्याची विलक्षण महत्त्वाकांक्षा आहे, अशी कान्स्टांटिनोपल येथील सुलतानाला बातमी लागल्याबरोबर त्यानें त्याला एकदम पकडून कैद केलें, व गुलामगिरीची वस्त्रें देऊन एका गलबतावर वल्हीं मारण्याची शिक्षा त्याला देण्यांत आली. तें गलबत आफ्रिकेच्या उत्तर किनाऱ्यावरील मूर लोकांशीं

व्यापार करण्याकरितां सफर करीत असतां एका वादळांत सांपडून भर समुद्रांत उपडें झालें. हुसेन हा कानस्टांटिनोपल येथील सुलतानाचा गुलाम खरा; परंतु त्यावेळीं भूमध्यसमुद्राच्या त्या भयंकर लाटांत आणि वादळांत सुलतानाचा हुसेनवर अंमल चालेना. हुसेन स्वतंत्र झाला, व पुढें कांहीं दिवसांनीं समुद्राच्या लाटांनीं त्याला फ्रान्सच्या दक्षिण किनाऱ्यावर आणून टाकिलें. तेथून फ्रेंचांचें एक जहाज हिंदुस्थानांत जाण्याच्या तयारींत होतें, त्या जहाजावर हुसेन हा तांडेल होऊन राहिला. त्या वेळीं सर्व जहाजें केप ऑफ गुड होपवरून हिंदुस्थानांत येत असल्यामुळें त्यांना पुष्कळ दिवस लागत. हुसेनच्या अंगांत कित्येक स्वाभाविक चांगले गुण असल्यामुळें त्या जहाजांतील मुख्य अधिकाऱ्याची हुसेनवर फार प्रीति बसली होती. त्यामुळें संध्याकाळच्या वेळीं सूर्य अस्तास जात असतां व नक्षत्रें उगवत असतां ते दोघेही गलबताच्या नाळीवर जाऊन गोष्टी बोलत असत. तुमचा हिंदुस्थानांत जाण्याचा उद्देश काय, असें हुसेननें विचारल्यावरून आम्ही तेथें राज्य स्थापन करण्याकरितां जात आहों असें त्या फ्रेंच अधिकाऱ्यानें हुसेनला सांगितलें. हुसेनच्याही मनामध्यें तीच महत्त्वाकांक्षा होती, त्यामुळें तुम्ही हिंदुस्थानांत जाऊन ही गोष्ट कशी करणार, असें त्यानें विचारलें. तेव्हां त्या फ्रेंच मनुष्यानें आपल्या सगळ्या युक्त्या हुसेनला सांगितल्या. अनेक सोंगें आणावीं लागतात, व्यापाराचें ढोंग करावें लागतें, धर्मप्रसाराचा बहाणा दाखवावा लागतो, दोघांचे तंटे चालले असतां त्यांत मध्यस्थी करण्याचा आव घालावा लागतो, ह्याची मदत घेऊन त्याला लुबाडावें आणि त्याची मदत घेऊन याला लुबाडावें असलीं अनेक लबाडीचीं कामें करावीं लागतात, आगी लावाव्या लागतात, दरवडे घालावे लागतात, एक माणसाची कत्तल करावी लागते किंवा सबंध सैन्याचे खून करावे लागतात, फसवावें लागतें, गोड बोलावें लागतें, तह करावे लागतात, मोडावे लागतात आणि फिरून करावे लागतात, आपण तह मोडावे लागतात आणि दुसऱ्यांनीं मोडले म्हणून म्हणावें लागतें, दाखवावें लागतें एक आणि करावें लागतें दुसरें, अशीं अनेक नीच कर्में करावीं तेव्हां राज्य मिळतें, अशा अर्थाचें त्या फ्रेंच मनुष्याचें रोज भाषण चालत असे. तें ऐकून हुसेनच्या मनाची उत्तरोत्तर अधिक अधिक खाली होत चालली कीं, ह्याच गुणांनीं जर राज्य प्राप्त होत

असेल, तर मीही हिंदुस्थानामध्यें आपलें एक राज्य स्थापन करीन. परंतु दोन लुच्चे लोक एकाच ठिकाणीं नांदूं शकणार नाहींत, हें तत्त्व हुसेनला माहीत असल्यामुळें तुम्हीं आपलें राज्य हिंदुस्थानांतील कोणत्या भागांत स्थापन करूं इच्छित आहां, हा प्रश्न हुसेननें विचारला. हिंदुस्थानच्या दक्षिण भागांत पांडीचरीच्या आसपास तूर्त आमचा प्रयत्न चालू आहे, असें त्या फ्रेंच मनुष्यानें सांगितल्यानंतर हुसेननें हिंदुस्थानच्या उत्तर भागांत आपलें राज्य स्थापन करण्याचा त्याच वेळीं त्याच गलबतावर निश्चय केला. एक दोन महिन्यांत तें फ्रेंच गलबत हिंदुस्थानच्या किनाऱ्याला येऊन लागलें. हुसेन गलबतावरून खालीं उतरला, आणि तांडेलची नोकरी सोडून देऊन हिंदुस्थानांतील राजा होण्यासाठीं आतां काय काय लुच्चेगिऱ्या कराव्या, या विचाराला लागला. हिंदुस्थानच्या पूर्व किनाऱ्यावरून निघून प्रथम तो विंध्य पर्वताच्या एका उंच शिखरावर येऊन बसला. त्या विंध्य पर्वताच्या दऱ्याखोऱ्यांतून ठग लोक पुष्कळ पसरलेले आहेत, अशी बातमी त्याला लागली. त्या लोकांना आपल्या हाताशीं घ्यावें, आपण त्या ठग लोकांचे नाईक व्हावें, आणि आपल्या कामाला सुरवात करावी, असा त्यानें निश्चय केला. त्याप्रमाणें तो ठग बनला आणि विंध्य पर्वताच्या शिखरावर बसून व तेथून आपल्या स्नेही झालेल्या फ्रेंच लोकांना हांक मारून तो म्हणाला, "हे माझ्या फ्रेंच मित्रांनो, दोन ठग एके ठिकाणीं कधींही नांदावयाचे नाहींत. ज्या दिवशीं दोन ठग एकमेकांच्या जवळ येतील त्या दिवशीं कोणातरी एकाचें वाटोळें झालेंच पाहिजे, हें तुम्ही पक्कें समजा. यासाठीं सर्व ठगांनीं एकमेकांपासून अगदीं दूर राहिलें पाहिजे, हें ठगीच्या कायद्यांतील पहिलें कलम होय. नाहींतर दुसऱ्यांना ठकविण्याच्या ऐवजीं हे ठग एकमेकांनाच ठकवूं लागतील व त्यांच्या ठगीच्या चातुर्याचा बाकीच्या जगाला कांहींच फायदा मिळणार नाहीं. याकरितां मी हिंदुस्थान देशाची तुम्हांला वांटणी करून देतों. हिंदुस्थानच्या दक्षिण भागांत तुम्हीं ठकबाजी करावी आणि उत्तर भागावर ठगीचा अम्मल चालविण्याचा माझा हक्क राहील. विंध्य पर्वत ही तुमच्या आमच्यामधील सरहद्द. आम्ही तुमच्या मुलखांत ठकबाजी करणार नाहीं व तुम्ही आमच्या मुलखांत करूं नये. तर परस्परांनीं आपआपल्या नेमून दिलेल्या हद्दीमध्यें यथान्याय ठकबाजी करून आपआपल्या ताब्यांतील सर्व प्रजाजनांस सदोदित लुबाडीत असावें."

अशा प्रकारची द्वाही फिरवून हुसेन आपल्या कार्याला लागला. फ्रेंचांची पद्धत त्यानें गलबतावर असतांना अगदीं लक्षपूर्वक ऐकिली होती. तिचें त्यानें अक्षरशः अनुकरण आरंभिलें. हिंदुस्थानांतील प्रतिष्ठित समाजानें टाकलेले, बदमाष, निमकहराम, विश्वासघातकी आणि डाकेखोर असले लोक हुसेननें आपल्या पदरीं चाकरीला ठेविले. थोडे लोक होते तोंपर्यंत त्यानें आपल्या अनुयायांना कांहीं विशिष्ट लष्करी नांव दिलें नाहीं. परंतु असले शंभर लोक त्याच्या पदरीं जमा झाल्याबरोबर तो त्यांना आपली पलटण म्हणूं लागला. लोक त्यांना दरोडेखोरांची टोळी असें नांव देत. परंतु त्यांच्याबद्दल बोलण्याचा जेव्हां जेव्हां प्रसंग येई, तेव्हां तेव्हां आपली शूर आणि विश्वासु शिपायांची टोळी असाच हुसेन त्यांच्याबद्दल निर्देश करीत असे. ही पलटण आपल्याबरोबर घेऊन हुसेन आपलें राज्य स्थापन करूं लागला. तो बहुतकरून आपलें राज्य रात्रीचें स्थापन करीत असे. एकटा दुकटा वाटसरू सांपडला कीं, त्याच्यावर आपलें राज्य स्थापन करण्याला हुसेन कधींच मागेंपुढें पहात नसे. विंध्य पर्वताच्या एका गुहेमध्यें हुसेननें एक पीर बसविला होता. जेव्हां जेव्हां दरवडा घालण्यासाठीं हुसेन बाहेर पडे, तेव्हां तेव्हां तो आपल्या पलटणीसहवर्तमान त्या पिराची प्रार्थना करीत असे व दरवडा घालून परत आल्यावर त्या राज्यस्थापनेच्या कामांत आपल्याला यश दिल्याबद्दल मूर्ख लोकांच्या कापून आणलेल्या कानांचें रक्त तो त्या पिरावर अत्यंत भक्तिभावानें शिंपडीत असे. परमेश्वरावर भाव ठेवून नेकीनें वागणाराला या जगांत कोठेंही कमी पडत नाहीं! थोडेच दिवसांत विंध्याचलाच्या दक्षिणेस फ्रेंचांचें आणि उत्तरेस हुसेनचें बरेंच मोठें राज्य स्थापन झालें. दोघेही आपल्या आसमंतांतील भागांतील लोकांकडून आपला कर वसूल करून घेऊं लागले व दोघांनाही आसपासचे नेटिव राजे भिऊन वागूं लागले. फ्रेंच लोक आणि हुसेन या दोघांच्या राज्यांमध्यें दळणवळण रहावें व एकमेकांच्या तुलनेनें कोणाच्यांत काय कमीजास्त आहे आणि कोणाच्यांत काय जास्त सुधारणा व लुच्चेगिऱ्या केल्या पाहिजेत, हें समजण्याकरितां आपल्या पलटणीमध्यें एक फार कावेबाज आणि धूर्त डाकेखोर होता त्याला आपला वकील अशी संज्ञा देऊन हुसेननें दक्षिणेमध्यें पाठविलें. अशा रीतीनें कित्येक दिवसपर्यंत हुसेनच्या राज्याची चांगलीच भरभराट होऊन त्याच्या राज्याचा विस्तार वाढत चालला होता.

हुसेन हा मूळचा युरोपमध्यें वाढलेला होता. त्यामुळें वाटा मारावयाच्या, दुसऱ्यांचे खजिने लुटावयाचे, दुसऱ्यांच्या देशावर दरवडे घालावयाचे आणि दुसऱ्यांच्या देहांचे खून करावयाचे एवढेंच फक्त चांगल्या राजांचें कर्तव्य कर्म नसून त्यांनीं निरनिराळ्या प्रकारच्या शास्त्रांना आणि कलांनाही उत्तेजन दिलें पाहिजे, व अशा प्रकारचें उत्तेजन युरोपांतील राजे देत असतात, ही गोष्ट हुसेनला विदित होती. अठराव्या शतकांत शास्त्रज्ञानाची फारशी प्रगति झालेली नव्हती. सुधारणेच्या कळसाला जाऊन पोहोंचणाऱ्या एकोणिसाव्या आणि विसाव्या शतकांतील प्रगतीकरितां कच्च्या मालाचा पुरवठा करून ठेवणें हेंच मुख्यत्वेंकरून अठराव्या शतकाचें काम होतें. हें काम म्हटलें म्हणजे जुन्या पुस्तकांचे संग्रह, निरनिराळ्या प्रकारच्या दगडांचे, मातीचे धान्यांचे, भाजीपाल्यांचे, माशांचे, पशूंचे, पक्ष्यांचे नमुने गोळा करणें वगैरे प्रकारचें होय. परंतु हुसेनला तागाच्या निरनिराळ्या शंभर प्रकारच्या जाती, माशांचे सांगाडे, पेंढा भरलेले पशु आणि न उडणारे पक्षी, यांच्यापेक्षां इतिहासाची जास्त आवड असे, व त्यामुळें आपण एक ऐतिहासिक पदार्थसंग्रहालय तयार करावें, अशी इच्छा हुसेनच्या मनामध्यें उत्पन्न झाली. त्यानें युरोपांतील कित्येक मोठमोठ्या शहरांतील म्युझियम्स पाहिलेल्या होत्या. तेव्हां तेथल्याप्रमाणें टापटीप, बेतबात, व्यवस्थितपणा, सौंदर्य, सुशोभितपणा, वगैरे सर्व युरोपियन थाट आपल्या ऐतिहासिक पदार्थसंग्रहालयामध्यें आणण्याचा त्यानें प्रयत्न चालविला. प्रत्येक ऐतिहासिक पदार्थाला निराळा कोनाडा किंवा निराळी जागा व प्रत्येक पदार्थाच्या खालीं त्याच्या वर्णनाची चिठी, अशी त्यानें व्यवस्था केली. विंध्य पर्वत हें ठग राजा हुसेन याच्या राजधानीचें त्या वेळीं मुख्य ठिकाण होतें. त्या राजधानीमध्यें सर्व ठग लोकांना लहान मोठ्या गुहांमधून सुरक्षितपणें राहण्याची सोय केलेली होती. परंतु सर्वांत मोठी अशी जी एक पूर्वाभिमुख गुहा होती, तेथील जागा हुसेननें आपल्या पदार्थसंग्रहालयाकरितां पसंत केली, व त्या संग्रहालयामध्यें ठेवण्याच्या योग्यतेची जी वस्तु तो पैदा करी तिच्या बेताचे कोनाडे त्या गुहेच्या भिंतीमध्यें खोदून त्या कोनाड्यांत ती वस्तु तो ठेवीत असे. गुहेच्या तोंडापुढें इतकी दाट झाडी होती कीं, दुरून पाहिलें असतां येथें एखादी गुहा असेल असें कोणाच्या स्वप्नांतही आलें नसतें. तरी पण ती झाडी आणि गुहेचा दरवाजा यांच्यामध्यें बरेंच अंतर होतें. त्यामुळें

सकाळच्या प्रहरीं उगवणाऱ्या सूर्याचे किरण तेथें येऊन ती सर्व गुहा प्रकाशित होत असे. तसेंच ती झाडी आणि गुहा यांच्यामध्यें मोकळया असलेल्या जागेंत डोंगरावरून सदोदित वाहत असणाऱ्या जिवंत पाण्याच्या झऱ्यांनीं एक सुंदर स्वाभाविक पुष्करिणी बनलेली होती. दुपारच्या प्रहरीं या पुष्करिणीच्या स्वच्छ पाण्यानें स्नान करून शेजारच्या झाडांच्या पानांच्या सावलींत बसून त्याच झाडांचीं फळें खावीं आणि सकाळसंध्याकाळ सुंदर गायन करून परमेश्वराचें स्तवन करावें असा तेथील पक्षिगणांचा नेहमींचा परिपाठ असे. अशा त्या आसपासच्या देखाव्यामुळें त्या गुहेला फारच रमणीयता प्राप्त झालेली होती. परंतु त्या गुहेच्या बाहेर जितकी रमणीयता होती तितकी आंत नव्हती. कारण हुसेनची ऐतिहासिक पदार्थसंग्रहालयामध्यें पदार्थ ठेवण्याची तऱ्हा थोडीशी भिन्न होती. हल्लीं पुष्कळ ऐतिहासिक पदार्थसंग्रहालयें आहेत व तेव्हांही होतीं. पण त्यांत, उदाहरणार्थ, एखाद्या राजाच्या अंगांतील चिलखत ठेवावयाचें असलें, तर त्या राजाला मारून त्या चिलखताच्या आंतील राजाचें पोट, छाती, वगैरे काढून टाकून त्या चिलखतावर कोठें त्या राजाच्या रक्ताचे डाग पडलेले असले तर ते साबणानें साफ धुऊन काढून त्याच्यावर तकतकीत रंग देऊन तें चिलखत ज्या राजाच्या गळयांत बांधलेलें असेल त्याच्या नांवाची लहानशी चिठी त्या चिलखताच्या गळयांत बांधून तें चिलखत तेथें ठेवावयाचें असा शिष्टसंप्रदाय आहे. परंतु हुसेन हा चमत्कारिक मनुष्य पडल्यामुळें त्यानें या कामांत अगदीं निराळाच मार्ग स्वीकारिला होता. राजांचें चिलखत ऐतिहासिक पदार्थसंग्रहालयामध्यें ठेवावयाचें म्हणजे तें चिलखत घातलें असता मारल्या गेलेल्या राजाचें प्रेतच त्या गुहेंतील एका कोनाड्यांत आणून ठेवावयाचें व त्याखालीं त्या राजाला कोणत्या विश्वासघातानें मारिलें याबद्दलची साद्यंत हकीगत लिहून ठेवावयाची, असा हुसेनचा क्रम होता. त्यामुळें ती गुहा फारच भीतिप्रद झालेली होती. हुसेननें विंध्य पर्वतावर आपलें राज्य स्थापन करण्याकरितां अनेक राजेरजवाडे, सरदार, जहागिरदार, व्यापारी, धनिक, शास्त्री, पंडित, बायका, मुलें वगैरे निरनिराळया प्रकारच्या आणि निरनिराळया स्थितींतील लोकांना कापून काढिलें होतें, व त्यांची मिळकत तो बळकावून बसला होता. त्या मिळकतीपैकीं ज्या ऐतिहासिक महत्त्वाच्या वस्तु होत्या त्या त्यानें सार्वजनिक उपयोगासाठीं आणि भावी इतिहासाच्या रचने-

साठीं आपल्या पदार्थसंग्रहालयामध्यें नेऊन ठेविल्या होत्या. त्या पदार्थसंग्रहालयामध्यें पदार्थांचें वर्गीकरण फारच शास्त्रोक्त पायावर केलेलें होतें. त्यांतील एकेक भागांतून लक्षपूर्वक रीतीनें फिरण्याला एकेक दिवसही पुरला नसता. यावरून तें सर्व संग्रहालय किती मोठें होतें, याची थोडीबहुत तरी कल्पना करतां येण्यासारखी आहे. मोठ्या जिनसा कोनाड्यांतून ठेवलेल्या होत्या, व बारीकसारीक जिनसा काठ्या बांधून त्यांना टांगून ठेविलेल्या होत्या. हातांच्या बोटांत घालावयाच्या अंगठ्या हिंदुस्थानांतील लोकांत किती प्रकारच्या असतात हें दाखविण्याकरितां मनगटापासून तोडलेले सुमारें दोनचारशें हात काठ्यांना टांगून ठेविलेले होते. बोटांत घालावयाचीं वाघनखें हिंदुस्थानांत किती प्रकारचीं असतात हें दाखविण्याकरितां वाघनखें घातलेलीं बोटें तोडून तीं दोऱ्यांतून ओवून एकशेंआठांची एकेक माळ अशा किती तरी माळा तयार करून तेथें टांगून ठेविलेल्या होत्या. हिंदुस्थानांतील स्त्रियांच्या आणि पुरुषांच्या गळ्यांतून किती निरनिराळ्या प्रकारचे अलंकार असतात हें दाखविण्याकरितां ते अलंकार घातलेलेच हजारों गळे कापून एकेक भाल्यावर एकेक असे रोवून ठेविलेले होते. हिंदुस्थानांतील बायकांच्या केसांतून काय काय भूषणें घालतात हें प्रदर्शित करण्याकरितां त्यांचे जसेच्या तसेच बुचडे आणि खोपे कापून काढून दागिन्यांसाठीं तेथें प्रदर्शनांत ठेविलेले किती असतील याची कल्पनाही करणें कठीण होतें. हिंदुस्थानच्या लोकांच्या हातांतील शस्त्रें कशीं असतात हें दाखविण्यासाठीं बरची, भाला, धनुष्य, बाण, कट्यार, खंजीर, तरवार, बंदूक, ढाल वगैरे आयुधें घेतलेले कोपरापासून तोडलेले निदान दहा पांच हजार तरी हात भिंतीपाशीं सारखे रांगेनें उभे केलेले होते. तोडे घातलेले पाय गुडघ्याच्या खालीं कापून सुमारें चार पांचशें एका कोपऱ्यांत एकापुढें एक लावून ठेविलेले होते. कानांतील भूषणांचे नमुने दाखविण्याकरितां हजारों कान कापून घेऊन रक्तानें लाल झालेले ते एकावर एक शिवून त्यांची गुलाबाच्या सारखीं किंवा कमळाच्या सारखीं फुलें करून तीं जागोजाग खोचून ठेविलेलीं होतीं. नथा घातलेल्या नाकांचा एक मोठा थोरला ढीग करून ठेविलेला होता. हिंदुस्थानांतील राजांची आणि मोठ्या लोकांचीं शिरोभूषणें, मुकुट, पगड्या, टोप्या, पागोटीं, फेटे वगैरे कसे असतात हें दाखविण्यासाठीं मुख्य मुख्य ठिकाणच्या कोनाड्यांतून राजांचीं मुंडकीं

ठेविलेलीं होतीं. हिंदुस्थानच्या राजांच्या अंगावरील वस्त्रें आणि अलंकार कसे असतात हें दाखविण्यासाठीं एक भरपोषाखांत मारलेल्या राजाचें प्रेतच एका उंच कोनाड्यामध्यें उभें केलेलें होतें. हिंदुस्थानांतील राजांचीं रिकामीं झालेलीं सिंहासनें कशीं असतात ह्या विषयींचे देखावे मोठाल्या कोनाड्यांतून दाखविलेले होते. एका सिंहासनावर विषप्रयोगानें मेलेला राजा पडला होता. दुसऱ्या एका सिंहासनावर तरवारीची जखम लागून मेलेला राजा होता. एके ठिकाणीं दोन सिंहासनांवरील दोन राजे एकमेकांची शेंडी धरून एकमेकांना ओढीत असतां दोघेही खालीं पडून मेलेले दिसत होते. असे अनेक प्रकारचे अनेक देखावे त्या गुहेमध्यें मांडलेले होते. हुसेनचा राज्यविस्तार जसजसा जास्त वाढत चालला होता तसतशी रिकामीं झालेलीं सिंहासनें, मारलेले राजे, वगैरे जिनसांची संख्या हुसेनच्या पदार्थसंग्रहालयामध्यें इतकी वाढत चालली होती कीं, त्या जिनसा ठेवण्याकरितां कोनाडे खोदण्याच्या कामावर लाविलेले पाथरवट अगदीं रडकुंडीस आले. अशा रीतीनें कित्येक दिवस लोटल्यानंतर ती गुहा बहुतेक भरून आली. तेव्हां हे आपलें पदार्थसंग्रहालय आपल्या बरोबरीच्या राजे लोकांना दाखवून आपल्या राज्यवैभवाचा एक मोठा समारंभ करावा असें हुसेनच्या मनांत आलें. त्याप्रमाणें एक पवित्र दिवस पाहून तो त्या कार्याकरितां मुक्रर करण्यांत आला. व त्यावेळीं हिंदुस्थानांत फ्रेंच, पोर्तुगीज वगैरे जे लोक हुसेनप्रमाणेंच दक्षिणेमध्यें राज्यस्थापना करीत होते त्यांना आपल्या वकीलाबरोबर आमंत्रणें पाठविण्यांत आलीं. व त्यांनींही समारंभाला येण्याचें कबूल केलें. विंध्यपर्वतावर या समारंभाकरितां जारीनें तयारी सुरू झाली. कांहीं दिवसांनीं सर्व सिद्धता झाली. व तो नेमलेला दिवस प्राप्त झाला. बोलाविलेले सर्व पाहुणे समारंभाकरितां हजर झाले. मेजवान्या, नाच, तमाशे, गाणें, वगैरे सर्व झाल्यानंतर सर्व मंडळी हुसेनचें ऐतिहासिक पदार्थसंग्रहालय पहाण्याकरितां निघाली. तें पाहून झाल्यानंतर मग हुसेनला मसनदीवर बसविण्याचा समारंभ साजरा व्हावयाचा होता. ठरल्याप्रमाणें मंडळी गुहेकडे वळली. गुहेला जाण्याचा रस्ता झाडीमधूनच होता. ती झाडांची घनदाट छाया, तेथील ते सुंदर पक्षी, झाडांच्या छायेंतून पुढें आल्यावर दृश्यमान होणारी स्वच्छ पाण्यानें भरलेली ती नैसर्गिक पुष्करिणी, तेथून समोर उंच गेलेल्या विंध्य पर्वताचा तो आल्हादकारक चेहरा

त्याच्या बाजूवरून खालीं वहात येणारे ते निर्झरप्रवाह, आणि या सगळ्यांच्यावर पडलेले भगवान् सूर्य नारायणाचे ते आल्हादकारक किरण या सगळ्यांच्या पासून उत्पन्न होणाऱ्या स्वाभाविक सौंदर्याच्या संमेलनानें त्या सर्व मंडळीच्या अंतःकरणाला अतिशय आनंद झाला. आणि त्या आनंदाचा आस्वाद घेत घेत ते सर्व लोक त्या गुहेमध्यें शिरले. फ्रेंच, पोर्तुगीज वगैरे युरोपियन लोकांना त्या पदार्थसंग्रहालयांतील पदार्थ पाहण्याकरितां जाण्यायेण्यासाठीं हात हात उंचीचे गुलाबाच्या फुलांच्या पाकळ्यांचे सुंदर रस्ते बनविलेले होते. व तेथील पदार्थांची त्यांच्या नाजुक नाकांना घाण येऊं नये म्हणून जिकडे तिकडे गुलाबपाणी इतकें कांहीं शिंपडलें होतें कीं, त्या गुलाबकळीच्या रस्त्याच्या बाजूनें बांधलेलीं सर्व गुलाबी गटारें गुलाबपाण्यानें तुडुंब भरून राहिलीं होतीं. इतकी तरतूद केलेली होती तरी देखील त्या युरोपियन नाकांना घाण येऊं लागली. व ते कांहीं पावले पुढें जातात तों त्या गुहेंतील ते भयंकर पदार्थ त्यांच्या दृष्टीस पडले, तेव्हां तर त्यांच्या अंगावर शहारेच उभे राहिले ! डोळ्यांतील बाहुल्या वर गेल्या, तोंडे किंचित् वासरल्यासारखीं झालीं, आणि हातपाय जागच्या जागीं तटस्थ राहिले. आपण कोठें आलों आहो. हें त्यांना कांहींच समजेना. एखाद्या जादुगाराच्या रसायनशाळेंत आपण आलों आहों, किंवा एखाद्या स्मशानामध्यें आपल्याला कोणी भुतानें आणून टाकलें आहे, किंवा नुकत्याच एखाद्या संपलेल्या घनघोर युद्धाच्या रणांगणांमध्यें आपण मागें जिवंत राहिलेले मनुष्य आहों, याचा त्यांच्या बुद्धीला कांहींच उलगडा पडेना. इतक्यांत जो फ्रेंच अधिकारी हुसेनच्या पूर्वीच ओळखीचा झालेला होता, तो धैर्य करून म्हणाला, "हुसेन, हुसेन, तूं हें आम्हांला काय दाखवीत आहेस !" "महाराज," हुसेन म्हणाला, "हें माझें एतिहासिक पदार्थसंग्रहालय आहे. हें पाहून आपण घाबरलां कां ?" फ्रेंच अधिकारी आपल्या बुटाचा पाय गुलाबाच्या पाकळ्यांवर आपटून म्हणाला : "अरे राक्षसा, अरे, मनुष्यरूपी सैताना, तूं या माणसांच्या खाटिकखान्यांत आम्हांला कशाला आणिलें आहेस ? हीं ऐतिहासिक पदार्थसंग्रहालयाची भयंकर कल्पना तूं कोठून काढलीस ?" हुसेन शांतपणानें म्हणाला, "सभ्य गृहस्थहो, मी युरोपांत असतांना कित्येक ऐतिहासिक पदार्थ संग्रहालयें पाहिलीं आहेत. पण त्यांत खोडसाळपणाचा

अंश मला दिसला. आणि तो तर मला नको आहे. म्हणून मीं मुद्दाम हें खरें ऐतिहासिक पदार्थसंग्रहालय बनविलें आहे. तुमच्या संग्रहालयांतून जुन्या निरनिराळ्या राजांचीं सिंहासनें प्रदर्शनासाठीं मांडून ठेविलेलीं पाहून माझ्यां मनांत असा प्रश्न येई कीं, हीं दुसऱ्या राजाचीं सिंहासनें तुम्ही त्यांना मारल्यावांचून तुमच्या ताब्यांत आलीं कशीं? दुसऱ्या राजांचे मुकुट तुम्ही आपल्या प्रदर्शनांतून मांडतां, ते मुकुट तुम्ही त्यांचीं मुंडकीं उडविल्यावांचून तुमच्या हातीं लागले कसे? ते नुसते मुकुट तेवढे तुम्ही दाखवितां पण त्या मुकुटांच्या खालचीं डोकीं कोठें आहेत? तुमच्या प्रदर्शनांतून तुम्हीं दुसऱ्यांचीं नुसतीं शस्त्रें दाखवितां; पण तीं शस्त्रें धरणारे हात कोठें आहेत? दुसऱ्यांचीं चिलखतें आणि शिरस्त्राणें तुमच्या संग्रहालयांत दृष्टीस पडतात; परंतु तीं धारण करणाऱ्यांचीं त्यांच्या खालील शरीरें कोठें आहेत? असे अनेक प्रश्न तुमचीं ऐतिहासिक पदार्थसंग्रहालयें पाहून माझ्या मनांत उद्‌भवत असत व तुमची ही ऐतिहासिक संग्रह करण्याची खोटी व लबाडीची पद्धत आहे असें मला वाटून जसें आहे तसें खरें लोकांच्या पुढें मांडण्याची मीं ही सत्य आणि सरळ पद्धत स्वीकारली आहे." यावर त्या फ्रेंच अधिकाऱ्यानें असें प्रत्युत्तर दिलें कीं, "अरे अघोर माणसा, तूं आमच्यापासून पातक करण्याचें मात्र शिकलास, परंतु तें धुवून टाकण्याची आमची विद्या तुला कळली नाहीं! अरे पाप्या, तूं हे किती तरी माणसांचे खून केले आहेस! कदाचित् आम्ही तुझ्यापेक्षां जास्तही खून केलेले असतील, पण आम्ही त्या खुनांचे साक्षीदार असे आपल्या डोळ्यांसमोर लावून ठेवलेले नाहींत. ज्यानें आपल्या पातकांचा मागमूस उरूं दिला नाहीं तोच या जगांत पुण्यवान्! तूं तोडलेले इतके हात हातांत शस्त्रें घेतलेले तुझ्यासमोर उभे असतां तुला भीति कशी वाटत नाहीं! तसेंच तुला ह्या कुजलेल्या प्रेतांची आणि अवयवांची दुर्गंधी कशी येत नाहीं! येथील हिंदी महासागराएवढें मोठें भांडें भरून जरी गुलाबपाणी मनुष्यांनीं केलेल्या खुनांवर ओतलें, तरी त्यांची दुर्गंधी नाहींशी होणार नाहीं!" इतकें तो फ्रेंच मनुष्य बोलतो आहे इतक्यांत त्याच्यावर टांगलेल्या नवीन कापून आणलेल्या एका मुंडक्यांतून रक्ताचे थेंब त्या फ्रेंच मनुष्याच्या बर्फाहून स्वच्छ अशा कपड्यांवर पडले. त्या वेळेला तर त्याला फारच किळस आला आणि तो हुसेनला त्याच्या तोंडावर शिव्या देऊं लागला. तेव्हां

हुसेन आपली मुद्रा गंभीर आणि शांत करून म्हणाला, "ह्या एक दोन प्रेतांचा आपल्याला इतका किळस आला, आणि आपण गरीब लोकांच्या कत्तली करून अशुद्धाचे पूर वाहवितां त्या वेळीं तुम्हांला कांहींच वाटत नाहीं, हें मोठें आश्चर्य आहे! माझ्या ऐतिहासिक पदार्थसंग्रहालयामध्येंच मात्र मेलेल्या राजांचीं प्रेतें, कापलेलीं डोकीं आणि छाटलेले हात दिसतात. परंतु थोड्याशा अंतर्मुख दृष्टीनें पाहिलें असतां जेथें ह्याच प्रकारचा देखावा दिसणार नाहीं असें तुमचें एकही ऐतिहासिक पदार्थसंग्रहालय असूं शकणार नाहीं! तुम्हीं मारलेल्या राजांचीं प्रेतें तुम्ही त्यांच्या सिंहासनाजवळून उचलून टाकिलीं असलीं, तरी इतिहासानें जागृत झालेल्या दृष्टीला तीं तेथें तळमळत आणि प्रतिकाराच्या वेळेची वाट पहात पडलेलीं दिसल्यावांचून कधींही रहावयाचीं नाहींत! आणि माझेंही असेंच म्हणणें आहे कीं, गुलाबपाण्यापेक्षांही जास्त सुगंधी पाण्यानें धुवून टाकल्यानें सुद्धां मनुष्यांच्या खुनांची घाण जावयाची नाहीं! परंतु फुलांच्या सुवासांनीं आणि अत्तरांच्या घमघमाटांनीं ती घाण जाईल आणि विजेच्या दिव्यांच्या लखलखाटांनीं तीं पापकृत्यें झांकलीं जातील, असें तुम्हांला वाटत आहे, कारण पातकें साफ धुवून टाकण्याची तुमची विद्या म्हणजे हीच होय. याच्याशिवाय दुसरें काय आहे?" "हुसेन, हुसेन," तो फ्रेंचमन म्हणाला, "मोठमोठ्या पराक्रमी राजांच्या शूर कृत्यांची तूं ही थट्टा मांडली आहेस! आजपर्यंतचा जगांतील सत्याचा, न्यायाचा, शौर्याचा, आणि सभ्यपणाचा जो मार्ग आहे त्याचें तूं उल्लंघन करीत आहेस! ज्या गोष्टीवर झांकणच घातलें पाहिजे, ती उघडी करून दाखविण्यांत काय अर्थ आहे? राज्याखालीं पाप आणि दिव्यांखालीं अंधेर, या गोष्टी सर्वत्र असावयाच्याच." यावर हुसेन म्हणाला, "तुमचें जर असें मत असेल, तर त्याबद्दल माझें कांहीं म्हणणें नाहीं. आपण अशा रीतीनें या मुद्याबद्दल भांडत बसण्यांत कांहीं तात्पर्य नाहीं. असो, आतां मी मसनदीवर बसत आहे, तर आपण सर्वांनीं त्या समारंभाकडे चलावें." इतकें त्याचें बोलणें होत आहे तोंच तो फ्रेंचमन फिरून संतापून म्हणाला, "काय! तूं राजा होणार! अरे डाकेखोरा, अरे ठगा, तुझा सारा जन्म दरवडे घालण्यांत गेला, आणि तू म्हणतोस मी राजा होणार! आम्ही तुला राजा म्हणून कधींही कबूल करणार नाहीं." हुसेन यत्किंचितही

न रागावतां बोलला, " महाराज, आपण दोघेही अटलांटिक महासागरांतून प्रवास करीत येत असतां तुम्ही हिंदुस्थानांत राज्य कसें मिळवितां असें तुम्हांला मीं विचारिलें होतें. त्या वेळीं तुम्ही जो मार्ग मला सांगितला त्याच मार्गानें मीही हिंदुस्थानांत आल्यावर हें राज्य संपादन केलें आहे. असें असतांना तुम्ही मात्र राजे होतां आणि मला डाकेखोर म्हणतां हें कसें? मी राजा कां नव्हे किंवा तुम्ही डाकेखोर कां नव्हेत? हा न्याय कोठला? आपण दोघेही जर एकाच मार्गानें चालत आहों तर दोघांनाही एकच नांव कां नसावें! जें वाईट नांव आपण मला लावितां तें आपल्यालाही लागूं होण्याला कांहीं हरकत आहे काय? मला तर कांहीं दिसत नाहीं. परंतु हें जग अशा प्रकारच्या लोकांनीं भरलेलें आहे, व एकाच कृत्याबद्दल आपल्याला चांगलें नांव घेऊन दुसऱ्याला वाईट नाव देणारे लोक या जगामध्यें आहेत. असल्या लोकांना खरोखर ताळ्यावर आणलें पाहिजे. परंतु मी तसें करूं लागलों तर माझ्या हातून जास्त पातक मात्र होईल, याकरितां मी त्यांत पडत नाहीं. मला ह्या लबाड लोकांच्या जगाचा अगदीं वीट आला आहे. डाकेखोरांनो आणि ठगांनो, जा; तुमचीं ढोंगी कर्में परमेश्वर तुम्हांला शासन देईपर्यंत तुम्ही अशीच चालवा. मी मात्र तुमच्यापासून शहाणपण घेऊन तुमचा मार्ग आजपासून सोडून दिला आहे!" असें म्हणून त्यानें आपल्या अंगांत असलेला भरगच्चीचा पोषाख फाडून फेंकून दिला! मसनदीवर बसण्याकरितां जो मुहूर्त पाहिला होता त्यावर त्यानें फकिरी पत्करली! आजपर्यंत केलेल्या पातकाबद्दल क्षमा करण्याविषयीं त्यानें परमेश्वरापाशीं प्रार्थना केली. त्यानें आपल्या हाताखालच्या शिपायांना पाहिजे तिकडे जाण्याविषयीं मोकळीक दिली. गुहेंतील प्रेतांचे आणि अवयवांचे ढीग त्यानें जाळून टाकविले व त्यांच्या अंगावरील चीजवस्त व दागदागिने ज्याला वाटतील त्यानें न्यावे म्हणून मुभा दिली. त्याबरोबर त्या समारंभाकरितां आलेल्या फ्रेंच, पोर्तुगीज वगैरे लोकांनीं एकदम नाकेबंदी करून तेथील सर्व मौल्यवान ऐवज आपल्या ताब्यांत घेतला व नंतर त्याची वांटणी करून घेऊन दुसरे दिवशीं प्रातःकाळीं ते निघून गेले! हुसेन ठग हा दुसरे दिवसापासून हुसेन अवलिया बनला. गुहेच्या समोरील पुष्करिणीचें दररोज स्नान करावें, सूर्यानें झाडावर शिजविलेल्या अन्नाचें पक्ष्यांच्या बरोबर सेवन करावें, स्वच्छ झऱ्यांचें निर्मळ

पाणी प्यावें आणि बाकीचा वेळ पैगंबराच्या चिंतनांत घालवावा, अशा रीतीनें त्यानें आपल्या आयुष्याचे बाकी राहिलेले दिवस घालविले व अखेरीस त्याचा देह ज्या पंचमहाभूतांपासून निर्माण झाला होता त्यांमध्यें तो पुनरपि लय पावता झाला. त्याचें थडगें त्या पुष्करिणीच्या जवळ पुष्कळ दिवसपर्यंत कायम होतें. परंतु आतां त्या थडग्याचे दगडही तेथें उरलेले नाहींत ! फक्त ती गुहा, ती पुष्करिणी व ती वनश्री, एवढें मात्र अजून तेथें कायम आहे !

---

# देहूहून परत येतांना : : ९

काळ : स्वतंत्र, ता. २९।७।१९०४

श्री तुकारामबोवांनीं आपल्या वसतीनें पवित्र करून ठेविलेलें देहू हें क्षेत्र पुण्यापासून जवळच आहे. तेथे रेलवेनेंही जाण्याची सोय आहे. परंतु रेलवे स्टेशनपासूनसुद्धां तें गांव बरेंच लांब राहतें, त्यामुळें पुष्कळ लोकांना स्वतंत्र बैलगाडीनेंच तेथें जाणें फायदेशीर वाटतें. या पवित्र स्थानाचें दर्शन घेण्याकरितां पुष्कळ दूरदूरचे यात्रेकरू येतात. कांहीं दिवसांपूर्वीं मोगलाईतील एक भाविक सुशिक्षित यात्रेकरू देहूची यात्रा करून बैलगाडीनें आपल्या मुलांबाळांसह पुण्याकडे परत येत असतां, खडकीच्या पुलाजवळ कांहीं कारणानें एकाएकीं त्याची गाडी उलटली. त्या वेळीं त्याला जो एक विलक्षण अनुभव आला, तो फार उपदेशपर आहे. त्यानें त्या वेळची सांगितलेली हकीकत आणि केलेलें वर्णन हें फार मनोवेधक आहे. परंतु तें आम्हीं सांगत बसण्यापेक्षां त्याचें त्यालाच सांगूं देणें हेंच जास्त चांगलें होणार आहे.

तो गृहस्थ म्हणाला:—आमची गाडी उलटली तेव्हां आमची फारच घांदल झाली. त्या वेळीं जरी बरेंच उजाडलें होतें, तरी रात्रीं गाडींत झोंप न लागल्यामुळें सकाळच्या प्रहरीं आम्ही सर्व माणसें डुकल्या खात होतों, व आमचा गाडीवालाही पेंगत होता. त्याच्या हातांतील चाबूक खालीं पडला होता, व एखाद्या अंदाधुंदीच्या राज्याप्रमाणें बैल जिकडे नेतील तिकडे आमची गाडी चालली होती. अशा रीतीनें आम्ही सर्व झोपेंत असल्यामुळें गाडी उलटण्याला काय कारण झालें, हें मला कांहींच माहीत नाहीं. परंतु पुलाच्या दरडीवरून गाडी गडगडत आली, त्या वेळीं मात्र आम्ही सर्व खडबडून जागे झालों, व आपण कोणत्या संकटांत आहों, याची आम्हांला

पूर्ण कल्पना आली. बैलांच्या गळ्याभोंवतालचे बंद तुटून ते मोकळे झाले, व गाडी घडघडत खालीं चालली. लहान मुलें गाडींतून खालीं पडलीं, आणि सामानाचीं पोतीं त्यांच्या अंगावर पडलीं. मीं गाडींतून आधींच उडी टाकली होती, व गाडीवानही खालीं उतरून गाडी थांबविण्याचा प्रयत्न करीत होता; परंतु त्याचा फारसा उपयोग झाला नाहीं. अखेरीस एका दगडाला लागून गाडी थांबली; तेव्हां सर्वांना धीर आला. बायकांनीं गाडींतून उतरून लहान मुलांना उचलून आपल्या उराशीं घट्ट धरिलें, व त्यांना कोठें काय लागलें आहे याची तपासणी चालविली. गाडीवाला आपल्या बैलांना कांहीं दुखापत झाली कीं काय म्हणून पाहूं लागला. आपली चीज वस्त सर्व कायम आहे किंवा नाहीं हे मीं प्रथमतः तपासून पाहिलें व नंतर पुढच्या व्यवस्थेला लागलों. आमच्यापैकीं एका मुलीला बरीच दुखापत झाली होती, व तिला पुण्यास नेऊन लवकर औषधोपचार करणें जरूरीचें होतें. सामानाचीं पोतीं जिकडे तिकडे अस्ताव्यस्त पडलीं होतीं; बायका त्यांच्याजवळ बसून आपापल्या मुलांना घेऊन रडत होत्या; व गाडीवाला आपल्या बैलांचे पाय चोळण्यांत आणि त्यांना पेंड वगैरे खाऊं घालण्यांत गुंतला होता. अशा स्थितींत गाडी वर कशी काढावयाची याविषयींची योजना करण्याचें काम माझ्यावरच येऊन पडलें. आणखी कांहीं चारपांच माणसांच्या तरी मदती-शिवाय इतक्या खोल खळग्यांतून गाडी वर येणें शक्य नव्हतें. म्हणून मी कोणीतरी माणसें पाहण्याकरितां निघालों.

मी नदीच्या पुलावर आलों. तेथील शोभा फारच अप्रतिम होती. ती पाहून क्षणभर मी माझे संकट विसरूज गेलों. नदीचें पाणी अगदीं शांत होतें. ते थंडीचे दिवस असल्यामुळें त्यांतून हळुहळु एक प्रकारच्या वाफा निघत होत्या व त्या नदीच्या पृष्ठभागावर पसरलेलें धुकें थोडथोडें नाहींसें होत चाललें होतें. तोंड धुण्याकरितां एखादा प्रवासी नदीच्या कांठाजवळचें पाणी काय चाळवीत असेल तेवढेंच. बाकी सर्व पाणी शांत होतें. मधून मधून एखादा मासा मात्र वर उडी मारी, आणि फिरून तो पाण्यांत बुडाल्या-नंतर सर्व पाणी शांत होई. नदीच्या कांठावर असलेल्या वृक्षांमध्येंही अगदीं सामसूम होतें; जणुं काय तेथील रहिवाशी पक्षी अजून जागेच झाले नव्हते. सूर्य उगवून थोडा वेळ झालेला होता, तरी पण त्याचा प्रकाश अजून तीव्र

झाला नव्हता. त्यावेळीं तेथें जिकडे तिकडे शांतता नांदत होती. मात्र मधून मधून कोठल्या तरी एका दूरच्या गिरणीचा गंभीर गर्जनाध्वनि ऐकूं येत होता. परंतु याच्या शिवाय तेथील ती प्रभातकाळची शांतता भग्न करण्याला दुसरें कोणतेंही कारण उपस्थित होत नव्हतें. पण इतक्यांत आपल्याला मनुष्यें पाहिजे आहेत या गोष्टीचें मला स्मरण झालें. परंतु तें स्मरण होतांक्षणींच माझी चिंता निवारण होण्याची मला आशा वाटूं लागली. कारण, त्या पुलावरू शेंकडों लोक चाललेले होते. ते सर्व तरुण व धट्टेकट्टे होते. यांतील कोणीही लोक येऊन आमची गाडी वर काढून देतील अशी मला खात्री वाटून माझ्या मनांतील बहुतेक काळजी त्यांना विचारण्याच्या आधींच दूर झाली व नंतर पुढें होऊन मी त्यांना विचारूं लागलों; पण तेव्हां मात्र माझी पूर्वीची आशा मिथ्या होत चालली. ते सर्वजण अतिशय त्वरेनें धांवत चाललेले होते. त्यामुळें त्यांना आधीं थांबवून धरण्याचीच पंचाईत पडूं लागली. माझ्या तोंडून एक शब्द निघतो आहे तों ते माझ्यापुढें पांच पावलें जात. अशा लोकांशीं बोलावें कसें, त्यांना आपली हकीकत सांगावी कशी, त्यांच्यापाशीं मदत मागावी कशी, हेंच मला मुळीं कळेना. त्यांच्याभोंवतीं त्या वेळचें तें सृष्टिसौंदर्य पसरलेलें होतें, तें माझ्याप्रमाणें पाहण्यासाठीं त्यांतील कोणीतरी क्षणभर थांबेल, आणि मग मी त्याच्यापाशीं आपली विनंती करीन, असें मला क्षणभर वाटलें. परंतु तें अमोलिक सृष्टिसौंदर्य पाहण्यासाठीं थांबतो आहे कोण! ती शांत नदी त्यांच्यासाठीं फुकट वाहत होती! आणि तो सूर्य त्यांच्यासाठीं फुकट उगवत होता! ती सर्व नैसर्गिक संपत्ति त्यांच्याकरिता व्यर्थ होती. मधून मधून एका गिरणीचा गंभीरगर्जनाध्वनि मंद मंद ऐकूं येत होता, त्याच्याकडे त्यांचें लक्ष पूर्णपणें वेधून गेलेलें होतें असें त्यांच्या चर्येवरून स्पष्ट दिसत होतें. नंतर मीं मोठ्या शिकस्तीनें त्यांतील एका मनुष्याला थांबविलें, व "तुम्ही हे सगळेजण जातां आहां तरी कोणीकडे?" असा प्रश्न मीं त्यांना विचारला. "आतां आठ वाजावयाला झाले, येथें बोलत बसण्याला आम्हांला वेळ नाहीं." असें म्हणून तो मनुष्य पुढें निघून गेला. मी त्याला प्रश्न विचारीत असतां, मला उत्तर न देतां तो इसम तसाच पुढें निघून गेला. हें पहात एक म्हातारा मनुष्य जवळ उभा राहिला होता. तो मला हांक मारून म्हणाला, "इकडे या, दादा, मी सांगतों

तुम्हांला, हे इतके लोक इतक्या घाईनें धांवत कोणीकडे चालले आहेत तें. तुम्हांला जे पुलावरूल धांवत जातांना दिसत आहेत तेवढेच हे लोक नाहींत. यांच्या आधीं किती तरी लोक पुढें गेलेले आहेत व नदीच्या दुसऱ्या बाजूला पहा, म्हणजे आणखी किती तरी लोक धांवत येत असलेले तुमच्या दृष्टीस पडतील." पुलाच्या दुसऱ्या बाजूला फार मोठें मैदान आहे, व त्या मैदानावर मधून मधून लहान लहान कितीतरी गांवें पसरलेलीं आहेत. या सर्व गांवांतून शेंकडों लोक घाईघाईनें पळत येत असलेले माझ्या दृष्टीस पडले. जिकडून तिकडून नवे तरणे बांड लोक पळत येत आहेत, हे कोणीकडे जाणार, असा प्रश्न मीं त्या म्हाताऱ्या मनुष्याला विचारला; तेव्हां तो म्हणाला, "येथें खडकीला एक मोठा सरकारी कारखाना आहे. मीही तेथें कामावर जात असे. पण आतां मी म्हातारा झाल्यामुळें माझ्यानें काम होत नाहीं, आतां माझा मुलगा तेथें कामावर जातो. त्याला उशीर होईल म्हणून तो पुढें गेला आहे, व त्याची भाकरी घेऊन मी चाललों आहे. तो दुरून धूर निघत आहे तो पहा. त्याच्या आसपास सगळ्या मैदानभर झाडींतून लोखंडी बंबाच्या तोट्या वर डोकावत असलेल्या तुमच्या दृष्टीस पडतील. तेथें मला जावयाचें आहे. तो सरकारी कारखाना आहे. तेथें दारूगोळा, काडतुसें वगैरे करण्याचें काम चालतें. आमच्या सारख्या कामकरी लोकांना मात्र तेथें जाण्याची परवानगी आहे. तुमच्यासारखा कोणी तेथें गेल्यास त्याला आंत जावयाला परवानगी मिळत नाहीं." मला त्या वेळीं तो कारखाना पहावयाला थोडेंच जावयाचें होतें ! माझी गाडी खालीं गेली होती ती वर ओढून आणण्याकडे माझें सर्व लक्ष लागलें होतें. त्यामुळें मी त्या म्हाताऱ्या मनुष्याला आपली सर्व हकीकत सांगितली आणि यांतले कोणी तुझ्या ओळखीचे चारपांच लोक मला मदत करण्याला येतील काय, म्हणून मीं त्याला विचारलें. यावर तो म्हणाला: "या असल्या लढाईच्या दिवसात या लोकांना बिलकूल फुरसत सांपडावयाची नाहीं. हल्लीं कुठें म्हणे नेपाळच्या पलीकडे लढाई सुरू होत आहेना ! तिकडे पाठवावयाला दारूगोळा आणि काडतुसें फार जरूर पाहिजे आहेत. सगळ्या ठिकाणीं आम्हींच तयार केलेलीं काडतुसें जातात. सोमाली लढाईवर गेलेल्या सैन्यास आम्हींच काडतुसें तयार करून पाठविलीं. काबूलाकडे ज्या पलटणी मागें गेल्या त्याही आमचींच काडतुसें घेऊन गेल्या होत्या. फार काय, मागें

जे हिंदुमुसलमानांचे दंगे झाले, त्यांत हिंदूंच्या आणि मुसलमानांच्या दोघांच्याही अंगांत ज्या गोळ्या शिरल्या त्या आमच्याच काडतुसांतील होत्या.' इतकें बोलून व आपल्याला उशीर होत आहे असें सांगून तो म्हातारा मनुष्यही निघून गेला. परंतु त्याचे ते शब्द मात्र माझ्या अंतःकरणामध्यें खोंचून राहिले. तेथून कांहीं केल्यानें निघून जातना. त्या म्हाताऱ्या मनुष्याच्या ह्या शब्दांच्या योगानें त्या पुलावर उभा राहून मी काय पहात आहें याचें सर्व स्वरूप माझ्या लक्षांत आलें. सकाळच्या प्रहरीं चोहोंबाजूंनीं प्रत्येक खेड्यांतून धट्टेकट्टे नवीन तरणेबांड असे आमचे कुणबी आणि शेतकरी लोक कोणीकडे धांवत चालले आहेत, हें मला समजलें. आपल्याच देशबांधवांचे जीव घेणारीं काडतुसें तयार करण्याकरितां हे इतके सर्व लोक इतक्या त्वरेनें धांवत आहेत, हें पाहून माझ्या मनाला किती वाईट वाटलें असेल, याची कल्पना कोणालाही सहज करितां येईल! थोड्या वेळापूर्वी मला तेथील सृष्टिसौंदर्य जें अत्यंत मनोहर दिसत होतें, त्याचा मनोहरपणा तेथील मनुष्यांच्या ह्या राक्षसी कृतीमुळें समूळ नष्ट झाला! प्रत्यक्ष सूर्य माझ्यापुढें उगवत असतांही सर्वत्र काळोख पसरलेला मला दिसला! आणि दगडी मजबूत पुलावर मी उभा असतांही भयंकर दुःखाच्या अगाध आणि काळ्याभोर पाण्यामध्यें मी पडत आहें, असें मला वाटलें! आमच्या शेतकऱ्यांनीं आपल्या शेतांची नीट मशागत करावी, आपल्या गायी, म्हशी रानांत चारून आणाव्या आणि आपल्या मुलाबाळांचें सुखानें संरक्षण करावें; परंतु तसें कांहीं एक न करितां, हे लोक आपल्याच देशबांधवांना मारण्याकरितां काडतुसें तयार करण्यासाठीं धावत सुटले आहेत! हिंदूंच्या आणि मुसलमानांच्या दोघांच्याही अंगांत त्यांच्याच देशबांधवनीं तयार केलेल्या काडतुसांतील गोळ्या! आपल्या देशांतील तारुण्य आणि धट्टेकट्टेपणा आपल्याच देशांतील लोकांना मारण्यासाठीं आणि गुलाम करण्यासाठीं खर्ची पडतो! आपल्या देशाचे पोषक शेतकरीच आपल्याला मारण्याची तयारी करीत आहेत! आपले लोक फार अज्ञानी आहेत! आपण आपल्याच देशबांधवांच्या वधाची तयारी कशी करीत आहों, आणि आपल्या कृत्याचा परिणाम काय होत आहे, हें ह्या गरीब बिचाऱ्या अज्ञानी लोकांना कांहीं समजत नाहीं! ह्यांचेच पूर्वज शिवाजीनें हातीं धरले, आणि त्यांनीं सर्व हिंदुस्थान देश स्वतंत्र करून

सोडला ! आणि ह्याच त्यांच्या वंशजांना हल्लीं इंग्लिशांनीं हातीं धरिलें आहे आणि ते आपल्याच देशबांधवांना त्यांच्या गुलामगिरीमध्यें कायम ठेवण्यासाठीं व ठार मारण्यासाठीं काडतुसें तयार करीत आहेत ! अज्ञानी लोक ! पोटासाठीं वाटेल तें करण्याला तयार ! परंतु अमुक एक गोष्ट आपण कां करावी, आणि दुसरी एखादी गोष्ट आपण कां करूं नये, याच्याबद्दल कोणीही विचार करीत नाहींत ! हा विचार ह्या लोकांना केव्हां सुचणार ! आणि आपल्या भावांचे प्राण घेणारीं काडतुसें करण्यासाठीं धांवावयाचे हे कधीं थांबणार ! यांना स्वतःला पापपुण्याची, यमलोकाची, मरणाची आणि परमेश्वराची भीतिच नाहीं काय ! आपण हें महान् पातक करीत आहों, हें अजून यांना कोणीं सांगितलेंच नाहीं काय ! यांच्या घरीं यांना दुसरा कांहीं चांगला उद्योगच नाहीं काय ? यांनीं आपल्या शेतांत कष्ट केले तर परमेश्वर याना पोटभर भाकरी देणार नाहीं काय ! हे मनुष्यांचे प्राण घेणारे काडतुसांचे कारखाने निघण्यच्या पूर्वी यांचीं पोटें कधीं भरतच नव्हतीं कीं काय ! मी परोपकाराच्या पुण्यासाठीं यांना विनवीत असतां यत्किंचित्‌ही न थांबतां, स्वदेशबांधवांच्या वधाची सामग्री तयार करण्याच्या पापकर्माकडे हे आपण होऊन धांवत जात आहेत, हा इंग्लिशांनीं या देशातील लोकांच्या मनावर केवढा मोह उत्पन्न केला आहे ! हा मोह यांच्या डोळयांवरून जावयाला नको काय ! यांचीं शेतें यांच्यावांचून वाळून चाललीं आहेत, यांचीं वासरें यांच्याकरितां हंबरडे फोडीत आहेत, आणि यांचीं मुलें यांच्यासाठीं रडत आहेत, त्यांना टाकून यांनीं आपल्या देशबांधवांना मारण्याच्या कामीं मदत करावी, हें अगदीं गैर आहे, व असला वर्तनक्रम इतःपर सर्वांनीं सोडून दिला पाहिजे, ही गोष्ट त्या म्हाताऱ्या मनुष्याच्या तरी निदान मनावर ठसवावी, म्हणून मी त्याच्याकडे वळलों. परंतु हा विचार माझ्या मनांत येत आहे, इतक्यांत तो मजपासून बराच दूर गेलेला मला आढळला. तेव्हां त्या बाबतींत माझी निराशा झाली, व मी आपल्या गाडीकडे वळलों. मीं आपल्या लोकांपैकीं मदतीसाठीं पुष्कळांची विनवणी केली, परंतु कोणालाही दया आली नाहीं. कारण आमचे बहुतेक लोक आम्हांला मारण्यासाठीं काडतुसें तयार करण्याकरितां धांवत सुटले होते ! इतक्यांत दोघे मोजीर नदीच्या कांठानें फिरत फिरत येत होते. मला मदत करण्याविषयीं मीं त्यांना विनंती केली नाहीं. तरी पण माझ्या गाडीची आणि

त्यांतील माणसांची स्थिति पाहून त्यांनीं गाडी वर ओढून देण्याची गोष्ट काढली, व थोडक्याच वेळांत त्या दोघांनीं आमची गाडी रस्त्यावर आणून दिली. साहेब लोकांनीं आमच्यावर परोपकार करण्याचें चांगलें काम आपल्याकडे घेतलें आहे, आणि आपल्या देशबांधवांना ठार मारणारीं काडतुसें तयार करण्याच्या नीच पातकामध्यें आमच्या इकडील लोकांना गुंतवून त्यांना परोपकार करण्याची सवड किंवा इच्छा सुद्धां यत्किंचित् उरूं दिली नाहीं, ही आपली प्रस्तुतची वस्तुस्थिति लक्षांत येऊन मला अतिशय खेद झाला. गाडी रस्त्यावर आल्यानंतर गाडीवाल्यानें बैल जुंपले व सर्व सामान गाडींत आणून ठेविलें. बायकांनीं दुखावलेल्या मुलांना उगी केलें, आणि त्या गाडींत येऊन बसल्या. केलेल्या उपकाराबद्दल मीं त्या सोजिरांचे आभार मानिले, आणि ते आपल्या वाटेनें निघून गेले व आमची गाडीही पुढें चालूं झाली. नंतर मागें कांहीं सामानसुमान राहिलें आहे कीं काय, हें पाहण्यासाठीं मीं फिरून एकदां गाडी पडलेल्या ठिकाणीं गेलों. माझें मन वरील विचारांनीं क्षुब्ध झालेलें होतें, व स्वदेशाची दुःस्थिति अंतःकरणामध्यें घोळत होती. अशा अवस्थेमध्यें मीं त्या जागेकडे पाहिलें; तेव्हां माझ्या मनांत पुढील विचार आले:—माझी गाडी कोसळली होती ती कशी तरी वर निघाली. परंतु माझ्या हिंदुस्थान देशाची गाडी अशाच रीतीनें खोल खळग्यांत घडघडत जाऊन उलटून पडली आहे ! त्या गाडींतील सामान अजून जसेंच्या तसेंच सगळ्या रानोमाळ अस्ताव्यस्त पडलें आहे, व त्या गाडींतील बायका आणि मुलें जिकडे तिकडे अजून आक्रोश करीत बसलेलीं आहेत ! त्यांचें सांत्वन केव्हां होणार ? आणि ती हिंदुस्थानची खळग्यांत गेलेली गाडी रस्त्यावर कोण आणणार ? हिंदुस्थानचे लोक तर आपल्या देशबांधवांना मारणारीं काडतुसें तयार करण्यासाठीं अतिशय त्वरेनें धूम ठोकीत चालले आहेत ! तेव्हां ही गाडी रस्त्यावर कोण आणणार ! असे उद्गार तोंडानें काढीत मीं चोहोंकडे दृष्टि फेंकली, तों आपल्या देशबांधवांना ठार मारणाऱ्या काडतुसांच्या गिरणींत काम करण्याकरितां सगळयाच हिंदुस्थानांतील लोक धांवत असलेले माझ्या दृष्टीस पडले ! त्या वेळेला तर माझी फारच निराशा झाली, व दुःखाचे श्वासोच्छ्वास टाकीत मी आपल्या गाडीच्या पाठीमागून हळू हळू चालूं लागलों.

# शिवाजीचें पुण्याहवाचन : १०

काळ : अग्रलेख, ता. ९-९-१९०४

द्रौपदी :—क एष यज्ञः ।

भीम :—रणयज्ञः । तथाहि ।

चत्वारो वयमृत्विजः स भगवान् कर्मोपदेष्टा हरिः
संग्रामाध्वरदीक्षितो नरपतिः पत्नी गृहीतव्रता ।
कौरव्याः पशवः प्रियापरिभवक्लेशोपशांतिः फलं
राजन्योपनिमंत्रणाय रसति स्फीतंयशोदुंदुभिः ।।

—वेणीसंहार.

शिवाजीचा शिवनेरी किल्ल्यांत आपली आई जिजाबाई हिच्या पोटीं जन्म होऊन आणि गुरु दादोजी कोंडदेव यांच्या हाताखालीं त्याचें थोडेंबहुत शिक्षण होऊन त्याला समजूं लागलें, तेव्हां त्याच्या दृष्टोत्पत्तीस पहिली गोष्ट आली ती ही कीं, आपला देश परतंत्र आहे. परिस्थितीच्या ज्ञानानें त्याचे डोळे उघडले त्यावेळीं त्याला पाहिल्यानें जी गोष्ट दिसली ती ही कीं, आपला हिंदुस्थान देश दुसऱ्यांच्या ताब्यांत आहे. तो जिकडे जिकडे जाई तिकडे तिकडे त्याला हिंदुस्थानच्या गुलामगिरीचीं चिन्हें दृग्गोचर होत. तो ज्या ज्या जमिनीच्या तुकड्यावर पाऊल टाकावयाला जाई, तो तो तुकडा दुसऱ्यानें बळकावून घेतलेला आहे असें त्याला कळे. ज्या पर्वतावर चढावें, त्या पर्वतावरील किल्ल्यावर दुसऱ्याचें निशाण आधींच चढून बसलेलें त्याला आढळून येई. एखाद्या नदीचें पाणी प्यावयाला जावें, तर तें सुद्धां पारतंत्र्याच्या चिखलानें गढूळ होऊन गेलेलें त्याच्या नजरेस पडे. सूर्याचे निष्कलंक किरण हिंदुस्थानच्या वातावरणामध्ये [illegible] येऊं लागले, म्हणजे ते परकीय

अंमलाच्या काळ्याकुट्ट काजळानें अत्यंत मलिन होऊनच खालीं उतरतात कीं काय, असा त्याला भास होई. वाऱ्याची जी जी झुळूक येई, ती ती गुलामगिरीच्या दुर्गंधीनें दूषित झालेली आहे, असें त्याच्या घ्राणेंद्रियाला वाटे. आणि हिंदुस्थानावर जें आकाश होतें, तें सुद्धां परदास्याच्या ओंगळ डागांनीं सर्व बाजूंनीं डागळून गेलेलें आहे, असें आकाशाकडे पाहिलें म्हणजे त्याला उपलब्ध होई. हिंदुस्थानांतील प्रत्येक घर म्हणजे बंदिखाना, प्रत्येक मनुष्य म्हणजे गुलाम, प्रत्येक रोजगारधंदा म्हणजे गुलामगिरीची शृंखला, प्रत्येक द्रव्यसंचय म्हणजे दरवडेखोरांची मालमत्ता, प्रत्येक देऊळ म्हणजे परधर्मीय प्रार्थनामंदिराच्या पायाचे दगड, प्रत्येक गाय म्हणजे परकीयांच्या मेजवानीचें पक्वान्न, आणि प्रत्येक स्त्री म्हणजे परकीयांच्या कामवासनेच्या जुलमाचें पात्र, अशा प्रकारची आपल्या हिंदुस्थान देशाची स्थिति झालेली पाहून शिवाजीच्या मनाला फारच वाईट वाटूं लागले, व या भयंकर पारतंत्र्याचा आपण कांहीं तरी प्रतिकार केला पाहिजे, एरवीं आपला जन्म व्यर्थ आहे, असे विचार त्याच्या मनांत येऊं लागलें. त्याप्रमाणें सुदैवानें त्याला साहित्यही मिळूं लागलें. आपलें गेलेलें राज्य परत कसें मिळवावें हें समजण्यासाठीं त्यानें पूर्वींचे इतिहास आणि कथापुराणें ऐकिलीं. आपल्या देशाच्या शत्रूला चोहोंकडून कसें घेरीत आणावें, आणि त्याला माऱ्याच्या जागेंत गांठून कसें ठोकावें, हें समजण्याकरितां त्यानें परिश्रमानें शिकारीमध्यें कौशल्य संपादन केलें. आपल्या जन्मभूमीच्या शत्रूंच्या अंगची रग जिरविण्याकरितां आणि त्यांचा क्षय करण्याकरितां त्यानें आपल्या शरीरामध्यें अपार शक्तीचा संचय करून ठेविला. बाजी फसलकर, येसाजी कंक आणि तानाजी मालुसरे यांच्यासारखे मित्र, आणि सह्याद्रीच्या खोऱ्यांतील शूर, कंटक आणि प्रामाणिक अशा मावळे लोकांसारखे शिपाई त्यानें हिंदुस्थानावर स्वतंत्रतेचें निशाण उभारण्याकरितां आपल्या सभोंवतीं जमा केले व अशा प्रकारची सर्व तयारी झाल्यानंतर हिंदुस्थानांत हिंदुपदपातशाही स्थापन करण्याच्या प्रयत्नाचा उपक्रम त्यानें सुरू केला.

वर दिलेल्या वेणीसंहारामधील भाषणांत भीमानें वर्णन केल्याप्रमाणें शिवाजीनें आरंभिलेलाही एक रणयज्ञच होता. शिवाजी हा त्या यज्ञांतील यजमान आणि त्याची भवानी तरवार ही यजमानपत्नी होय. सर्व महाराष्ट्र

देश हें त्या यज्ञाचें स्थंडिल व्हावयाचें होतें. श्रीसमर्थ रामदास आणि श्रीसाधुवर्य तुकारामबुवा हे त्या रणयज्ञाचें कर्म निर्दोष रीतीनें कसें चालवावें, ह्याविषयीं उपदेश करणारे व्हावयाचे होते. त्या रणयज्ञाच्या होमकुंडामधून निघणाऱ्या ज्वाळांमध्यें हिंदुस्थानचें दुःख, दारिद्य आणि पारतंत्र्य यांचें हवन करावयाचें होतें, आणि हिंदुस्थान देशाचें स्वातंत्र्य हें फळ यज्ञभोक्ता आणि यज्ञस्वरूपी जो नारायण त्याच्यापासून सर्व हिंदुस्थानाकरितां संपादन करून घ्यावयाचें होतें. अशा प्रकारच्या ह्या अत्यंत पवित्र, अत्यंत धार्मिक आणि अत्यंत लोकोपकारी रणयज्ञाला सुरवात करण्याच्या पूर्वी ह्या धर्मकृत्याच्या अंगभूत असें जें अवश्य आणि आदिकर्तव्य पुण्याहवाचन तें एके दिवशीं फार अद्भुत रीतीनें घडून आलें. त्याचें वर्णन आज येथें देण्याचें आम्हीं योजिलें आहे. शालिवाहन शक १५६८ या वर्षी पुढें शिवाजीनें तोरणा किल्ला हस्तगत करून घेऊन भावी महाराष्ट्रीय स्वातंत्र्यमंदिराचें तोरण उभारलें. परंतु त्याच्या आधीं एके दिवशीं सहजगत्या शिवाजी मोठ्या पहाटेस उठून, स्नानादिक मंगल क्रिया आचरून, सह्याद्रि पर्वताच्या एका शिखरावर चढला. तें शिखर बरेंच उंच होतें. त्या शिखरावर जे दर्भ उगवलेले होते, त्यांनीं बनलेल्या त्या स्वाभाविक दर्भासनावर शिवाजी पूर्वेकडे तोंड करून क्षणभर विश्रांति घेण्याकरितां बसला. अतिशय उंच उंच वाढलेलीं झाडें सुद्धां तेथून अतिशय खोल दिसत होतीं. आणि आपल्याकडून आकाशांत फार उंच भराऱ्या मारणारे पक्षीसुद्धां तळच्या जमिनीवरच चालत आहेत कीं काय, असा त्या उंच शिखरावरून भास होई. तळचीं माणसें तेथून खुजीं दिसत, शेतकऱ्यांनीं लाविलेलीं ओबडधोबड शेतें कारागिरांनीं तयार केलेल्या नीट-नेटक्या व नक्षीदार गालिच्यांप्रमाणें भासत, आणि विस्तीर्ण नद्या अत्यंत सूक्ष्म अशा रजतधारेची बुद्धि उत्पन्न करीत. अशा त्या उंच पर्वतावरून भोंवतालचा सर्व प्रदेश दृग्गोचर होत होता. परंतु प्रातःकाल नुकताच होत चालला असल्यामुळें अगदीं क्षितिजाजवळचे प्रदेश मात्र किंचित् किंचित् अंधुक दिसत होते. आकाशावरचाही रात्रीचा अम्मल हळूहळू नाश पावत चालला होता. नक्षत्रें निस्तेज होऊन बहुतेक दिसेनाशींच झालेलीं होतीं. चंद्र मात्र आकाशाच्या मध्यभागीं एकटाच आपल्या अस्तसमयाची वाट पहात बसलेला होता, व त्याच्याकडे पाहिलें असतां स्वर्गांतील एखाद्या

देवाचा हा सुवर्णमय रथ आहे की काय, किंवा एखादा कांचनदेही राजहंस पक्षी आकाशगंगेच्या स्वच्छ उदकामध्यें प्रातःस्नान करून पोहत बसला आहे की काय, असा भास उत्पन्न होई. त्या अरण्यांत जिकडे तिकडे फुलें फुलून त्यांचा परिमल सर्वत्र पसरला होता. जमिनीवर गाई चरत होत्या आणि हरणें उड्या मारीत होतीं, व आकाशांत पक्षी सुस्वर गाणीं गात होते. प्रभातकाळचा मंद आणि मंजुळ वारा सुटला होता. दिशा प्रसन्न झालेल्या होत्या. आकाश स्वच्छ दिसत होतें. पूर्वी सर्व ब्रह्माण्डगोलावर जिनें आपला काळा पडदा पसरिला होता ती रात्र आतां आपला तो काळा पडदा गुंडाळून घेऊन पार नाहींशी झाली होती, आणि जिकडे तिकडे प्रकाशाचा अंमल बसत चालला होता. असा तो रमणीय देखावा पाहून शिवाजीला अत्यंत आनंद झाला. परंतु त्याच्याच बरोबर त्याला अतिशय वाईटही वाटलें. हा प्रदेश इतका सुंदर दिसत आहे याबद्दल त्याला आनंद झाला, परंतु हा आपला असून दुसऱ्याच्या ताब्यांत आहे, म्हणून त्याला अतिशय वाईट वाटलें. त्या सगळया सृष्टिसौंदर्यावर परतंत्रपणाचें काजळ फांसलेलें पाहून त्याला अतिशय खेद झाला. त्या रमणीय देखाव्यांतील प्रत्येक वस्तूवर 'गुलाम' हीं अक्षरें खोदलेलीं वाचून त्याची छाती फाटून गेली. हीं शेतें दुसऱ्यांच्या करितां पिकत आहेत ! ह्या नद्या दुसऱ्यांच्यासाठीं वहात आहेत ! ह्या गाई परकीयांच्या क्षुधाशमनासाठीं पुष्ट आणि मांसल होत आहेत ! आपल्या देशाच्या शत्रूंच्या अंगांतील तल्लखपणा शिकारीच्या योगानें वृद्धिंगत करण्यासाठीं हीं हरणें चपळपणाची संवय करीत आहेत ! आकाशतलालाही आपलें मस्तक नेऊन भिडवावयाचें अशी उच्चत्वाविषयीं ज्यांची महत्त्वाकांक्षा अशा ह्या मोठमोठ्या विस्तीर्ण वृक्षांच्या पोटामध्यें दुसऱ्यांच्या चैनीचे पलंग, खुर्च्या आणि त्यांच्या वैभवशाली इमारतींचे खांब ! आपल्या देशबांधवांच्या रक्ताच्या दुर्गंधीनें ज्यांना पीडा होत आहे, अशा परकीय लोकांच्या घ्राणेंद्रियांच्या संतर्पणासाठीं हीं सुवासिक पुष्पें ! आणि आमची कत्तल करून त्यांना कंटाळा आला म्हणजे त्यांचें मनोरंजन करण्यासाठीं कोकिळा, साळुंकी, पोपट, चंडोल वगैरे हे सुस्वर गायन करणारे पक्षी ! हिंदुस्थानांतील देवांचीं देवळें पाडण्याच्या कामीं झालेल्या श्रमामुळें उत्पन्न होणाऱ्या घर्मबिंदूंच्या परिहरणासाठीं हे थंडगार वारे ! आणि हिंदुस्थान देशाच्या पायांत दररोज पारतंत्र्याच्या नवीन नवीन शृंखळा अडकविण्याच्या कामीं आमच्या शत्रूंना नवीन उमेद आणून

देण्यासाठीं हे प्रभातकाळ ! अशी परतंत्र देशांतील जी जी वस्तु पहावी, ती ती दुसऱ्याचे हितासाठीं. अशा प्रकारची आपल्या जन्मभूमीची दुर्धर आणि दुःसह अवस्था पाहून शिवाजीच्या अंतःकरणाचें पाणीच होऊन गेलें; व "आपल्या देशाची अशी स्थिति रहातां कामा नये. आपल्या जन्मभूमीला गुलामगिरी म्हणजे आपल्या तोंडाला काळोखीच होय. ही आर्यभूमि स्वतंत्र झालीच पाहिजे ! आपल्या देशबांधवांच्या पायांतील पारतंत्र्याच्या शृंखळा तोडून टाकण्याची इच्छा माझ्या मनामध्यें उत्पन्न होत आहे. ती माझी इच्छा सर्व देवतांनीं परिपूर्ण करावी !" असे उद्‌गार शिवाजीच्या तोंडून निघाले. ती सकाळची प्रसन्न वेळ, ती पृथ्वीच्या पृष्ठापासून तों आकाशाच्या तलापर्यंत सर्वत्र पसरलेली शांतता, तें त्या उच्च पर्वतावरील एकांत स्थान, आसमंतात् पसरलेला तो विस्तीर्ण प्रदेश, हिंदुस्थान देशाची त्या वेळची ती दुःखकारक स्थिति, आणि शिवाजीच्या अंतःकरणासारखें तें प्रेमळ, सात्त्विक आणि धीरोदात्त अंतःकरण, इतकी सामग्री एकत्र झाल्यानंतर त्या अंतःकरणाची एकतान वृत्ति होण्याला काय उशीर लागणार? सर्व बाह्येंद्रियांची कृति स्तब्ध पडून त्यांतून पसरलेला चैतन्याचा अंश मनामध्यें एकवटला. योगबलावांचूनही समाधि लागली, आणि आवाहनाच्या वेदोक्त मंत्रांवांचूनही वैदिक देवता आशीर्वाद देण्यासाठीं शिवाजीच्यापुढें अवतीर्ण झाल्या. शिवाजी आपल्या आर्यभूच्या उद्धारार्थ जो रणयज्ञ आरंभिणार त्या रणयज्ञाच्या पुण्याहवाचनाचा हा प्रसंग प्राप्त झाला आहे असें पाहून सर्व देवता त्याच्या अभीष्टचिंतनासाठीं आणि आशीर्वचनासाठीं तेथें आविर्भूत झाल्या. हरि, हर आणि हिरण्यगर्भ हे अवतीर्ण झाले. षडंगसहित ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद आणि अथर्ववेद हे आपआपल्या सामर्थ्यासह प्राप्त झाले. ऋद्धिबुद्धिसहित सांग, सपरिवार, सायुध आणि सशक्तिक, गणांमध्यें श्रेष्ठ, कवींमध्यें कवि, आणि ज्याच्या कृपादृष्टीवांचून कोणतेंही कार्य करतां येणार नाहीं, असा महागणपति तेथें अवतरला. वरुणदेवता मूर्तिमंत पुढें येऊन उभी राहिली. अग्नीला पुढें करून विश्वेदेव आले. इंद्राला पुढें करून मरुद्‌गण प्राप्त झाले. माहेश्वरीला पुढें करून सर्व मातृगण हजर झाले. वसिष्ठाला पुढें करून सर्व ऋषिगण तेथें येते झाले आणि अरुंधतीला पुढें करून सर्व ऋषिपत्न्या प्रकट झाल्या. यम, निर्ऋति, कुबेर आदिकरून अष्ट दिक्पाल अष्टदिशांचा प्रतिपाल

करीत उभे राहिले. शुक्र, अंगार, बुध, गुरु इत्यादि नवग्रह आकाशमंडलामध्यें शुभस्थानीं येऊन बसले. यक्ष, गंधर्व, किन्नर हे आविर्भूत झाले. गायत्री, सावित्री, शांति, पुष्टिकरी, तुष्टिकरी, दुर्गा, पांचाली, सरस्वती, श्री, श्रद्धा, मेधा, देवमाता, देवपत्न्या, महासेन, ग्रामदेवता, कुलदेवता, इत्यादि सर्व देवता स्वस्वस्थानापन्न झाल्या. त्यांच्यापाठीमागून अग्नि, आहुति, ओषधि, वनस्पति, अहोरात्र, पर्जन्य, यज्ञ, ऋतु, इत्यादिकांवर अधिष्ठान करणाऱ्या देवता प्राप्त झाल्या. तसेंच समुद्र, गंगा, यमुना, सरस्वती, शुतुद्री, परुष्णी, वितस्ता, इत्यादि नद्या, तीर्थें, जलद, नद, वगैरे सर्व समुदाय त्या ठिकाणीं एकत्र गोळा झाला. ह्याप्रमाणें स्वर्ग, मृत्यु आणि पाताळ, ह्या तिन्ही लोकांमध्यें श्रेष्ठ, सत्त्वगुणविशिष्ट, आणि महत्कार्यामध्यें संकटाच्या ओझ्याखालीं खचणाऱ्या अंतःकरणाला सामर्थ्य देणारे देव, देवता आणि इतर जें जें वस्तुजात होतें, तें तें सर्व त्या महात्म्याला आशीर्वचन देण्याकरितां त्या ठिकाणीं संनिहित झालें. परंतु ह्यांच्याशिवाय शिवाजीला प्रोत्साहन देण्याकरितां आणखीही एका वर्गांतील लोक त्या ठिकाणीं जमा झाले होते. शिवाजीच्यापूर्वीं हिंदुस्थानदेश परकीय लोकांनीं सुमारें पांचसहाशें वर्षेंपर्यंत व्यापून टाकिला होता. इतक्या मुदतींत आपला देश त्यांच्यापासून परत मिळवावा आणि तो स्वतंत्र करावा अशी इच्छा कोणाच्याच मनांत उत्पन्न झाली नव्हती असें नाहीं. परंतु अकराव्या शतकापासून सतराव्या शतकापर्यंत ह्या सर्व इच्छा अतृप्त राहिल्या होत्या. स्वदेशाच्या स्वतंत्रतेबद्दलच्या किती तरी इच्छा पांचशें वर्षेंपर्यंत परिपूर्ण होण्याची वाट पहात थांबून राहिल्या होत्या. त्या पांचशें वर्षांतील सगळ्या अपरिपूर्ण इच्छा या वेळीं सजीव होऊन शिवाजीला पाठबळ देण्याकरितां तयार झाल्या. तसेंच परकीय लोकांनीं अतिशय छळल्यामुळें कितीतरी आत्मे तळमळत पडलेले होते, ते या परकीय राजांच्या पातकांचे घडे भरण्याची वाट पहात होते. त्या आत्म्यांपैकीं कित्येक महापुण्यवान् होते, व त्यांनीं पृथ्वीवरील आपल्या कृत्यांनीं स्वर्ग लोकांतील सलोकता, सरूपता इत्यादि चारी मुक्ति प्राप्त करून घेण्याची योग्यता संपादन केली होती. तरी पण आपला हिंदुस्थान देश स्वतंत्र झालेला पहावा आणि मग आपण स्वकर्मजित अशा उत्तम गतीला जावें, अशी त्यांची इच्छा होती. अशा रीतीनें ह्या आर्यभूच्या स्वातंत्र्यामध्यें त्यांचा हेतु गुंतलेला असल्यामुळें ते मुक्त झालेले असूनही अमुक्त स्थिती-

मध्यें हिंदुस्थानच्या भाग्योदयाची वाट पहात राहिले होते. तो सुदिन आतां जवळ आला असें जाणून ते सर्व आत्मे शिवाजीला साहाय्य करण्याकरितां आणि आशीर्वाद देण्याकरितां पुढें सरसावले. ह्या पांचसहाशें वर्षांच्या अवधीमध्यें सूड देखील कितीतरी शिल्लक राहिलेले होते! हे सूड हजारों, लक्षावधि, नव्हे कोट्यवधि होते असें म्हटलें, तरी त्यांची संख्या कमीच केल्यासारखी होईल; इतके सूड त्यावेळीं योग्य संधीची मार्गप्रतीक्षा करीत बसलेले होते. इतके सूड त्या परकीय लोकांच्या असह्य जुलमाविरुद्ध रात्रंदिवस विव्हळत होते, कण्हत होते, कुंथत होते, ओरडत होते आणि त्वेषाच्या किंकाळ्या फोडीत होते. त्यांतून कित्येक जखमी झाले होते, कित्येक रक्तबंबाळ झाले होते, कित्येक लंगडे होऊन पडले होते, कित्येक डोळे काढलेले होते, कित्येक माना मोडलेले होते आणि कित्येक प्रेतवत् पडलेले होते; तरी पण ते सगळे आपल्या देशाच्या परकीय शत्रूंची खोड मोडण्याला अतिशय उतावीळ झालेले होते. आपल्या देशाच्या शत्रूंचा नाश करण्यासाठीं तोडलेले पायही धांवून जाऊं पहात होते, कापलेले हातही तरवारी उपसून जखमा करण्याला इच्छित होते, फोडलेले डोळेही अतिशय त्वेषानें पहात होते, आणि मारलेलीं अंतःकरणेंही प्रेतवत् पडलेल्या अवयवांमधून चैतन्याचा आणि सामर्थ्याचा संचार करविण्याचा प्रयत्न करीत होतीं. अशा प्रकारचे सगळे सूड एकत्र होऊन त्या वेळीं शिवाजीजवळ आले, व " तूं लढाई कर, आमची तुला मदत आहे, आम्ही तुझ्या बाजूनें लढूं, आम्ही आपल्या देशाच्या शत्रूंच्या अंतःकरणांत भीति उत्पन्न करूं आणि त्यांचे हातपाय मोडून टाकूं. त्यांच्या दुष्कृत्यांमुळें त्यांचा पराजय ठरलेलाच आहे. तेव्हां तूं लढ! " असे शब्द उच्चारून त्याला उत्तेजन देऊं लागले. ह्या परकीय जुलमाच्या पांचसहाशें वर्षांमध्यें किती तरी देवळें मोडून पडलीं होतीं, आणि किती तरी देवतांच्या मूर्ति छिन्नविच्छिन्न झाल्या होत्या. तीं सगळीं देवळें आणि त्यांतील देवता शिवाजीच्या ह्या स्वधर्मसंस्थापनेच्या आणि स्वराज्यसंपादनाच्या सत्कृत्याला आपापल्या पुण्यांशांनीं साहाय्य करण्याकरितां पुढें आल्या. मोडलेलीं देवळें आणि भंगलेल्या देवता मिळून तीं एकंदर किती आलीं होतीं याची गणना करणें अशक्यच होतें. तीं सूक्ष्म रूपानें आलीं होतीं तरी त्यांची इतकी गर्दी झाली होती, मग तीं आपल्या स्थूल रूपानें तेथें आलीं असतीं, तर त्यांच्यांतील दगड,

विटा, चुना, माती, खांब, लगी, तुळया, लोखंड, तांबें, पितळ, चांदी, सोनें, हिरे, माणकें वगैरे सामानाचे मिळून त्या सह्याद्री पर्वतासारखे तेथें दहापांच पर्वतच झाले असते. हे पर्वत म्हणजे परकीय राजांच्या पातकांचे, जुलमांचे आणि धर्मविध्वंसनांचेच मूर्तिमंत पर्वत झाले असते! असो. सूक्ष्मरूपानें जीं अनेक देवळें आणि देवता प्राप्त झाल्या होत्या, त्यांच्यामध्यें नगरकोट, ठाणेश्वर, सोमनाथ, मथुरा, अयोध्या, काशी, भिलसा वगैरे ठिकाणचीं देवळें आणि देवता ह्या प्रमुख होत्या, व "आमचा सूड तूं घे, आमचा तुला आशीर्वाद आहे, तुझ्या बाजूनें आम्हीं लढूं," अशा प्रकारचीं आश्वासनें त्यांच्या तोंडून निघत होतीं. गिजनीच्या महंमदानें आपल्या अंगावर केलेल्या जखमा सोमनाथानें शिवाजीपुढें उघड्या करून दाखविल्या. अल्ला-उद्दिनानें आपले केलेले हाल भिलसा येथील बुद्धाच्या स्तूपानें शिवाजीपुढें वर्णन केले व बुद्धासाठीं तूं लढ, म्हणून त्याला विनंति केली. मथुरा, अयोध्या, काशी, येथील मोडलेल्या देवळांतील भंगलेल्या मूर्तींनीं आपले अपमान शिवाजीपुढें निवेदन केले, व आपल्या जखमा त्याच्यापुढें उघडून दाखविल्या, आणि "ह्या मनाच्या व शरीराच्या जखमांसाठीं तूं लढ," असें त्यांनीं शिवाजीला सांगितलें. शिवाजीचा स्वराज्यस्थापनेचा हा महत् प्रयत्न पाहून ज्यांचे प्रयत्न पूर्वी सफळ झाले नव्हते, अशा राजांचे आत्मेही आपल्या इच्छा-बलांच्या अक्षौहिणी बरोबर घेऊन शिवाजीच्या मदतीला धांवले. लाहोरचे जयपाळ आणि अनंगपाळ यांच्या मनांतून गिजनीच्या महंमदाविरुद्ध सूड घ्यावयाचा होता, परंतु ती त्यांची इच्छा अजूनपर्यंत तृप्त झाली नव्हती. यासाठीं ते शिवाजीला पाठबळ देण्याकरितां हजर झाले. शत्रूंनीं डोळे काढिले असतांही चांदभाटाच्या इषारतीनें शब्दवेधित्वाच्या बळावर अचूक नेम मारून शत्रूचा प्राण घेतला, तरी पृथ्वीराज चव्हाणाची फिरून स्वराज्यस्थापना करण्याची इच्छा तृप्त झाली नव्हती; ती आतां तृप्त होणार असें पाहून अतिशय आनंदानें पृथ्वीराज तेथें आला. अल्लाउद्दिनाच्या प्रचंड सैन्यापुढें देवगिरीचें संरक्षण करण्याला असमर्थ झालेला रामराजा हिंदुराज्याच्या स्थापनेचा हा शुभमुहूर्त पाहून शिवाजीसंनिध प्राप्त झाला. नडीयाच्या राज-वाड्यांतून बखत्यारखानानें पळवून लाविल्यानंतर जगन्नाथपुरीस जाऊन आपलें राज्य आपल्याला परत मिळूं दे, अशी नारायणाजवळ प्रार्थना करीत

बसलेला राजा लक्ष्मण देव हा आपल्याला खरोखरच भगवान् श्रीकृष्ण प्रसन्न झाला आहे व त्यानेंच हा सुप्रसंग जुळवून आणिला आहे, असें समजून हा भगवंताचा प्रसाद निवेदन करण्यासाठीं व शिवाजीला विजयाशीर्वाद देण्यासाठीं तेथें प्रकट झाला. त्याचप्रमाणें दिल्ली, अजमीर, कनोज, कालिंजर, उदेपूर, जोधपूर, जयपूर, चितोर, गुजराथ, वरंगळ, विजयानगर वगैरे अनेक ठिकाणचे राजे स्वराज्यसंस्थापनेचे आणि स्वतंत्रेचे आपले अर्धवट राहिलेले प्रयत्न पुरे होण्याची ही वेळ आली आहे, असें जाणून त्या ठिकाणीं अवतीर्ण झाले. फत्तेपूरशिक्री या ठिकाणीं सर्व रजपूत लोक एकत्र होऊन परकीयांपासून आपला देश आपण स्वतंत्र करून घ्यावयाचा अशा इच्छेनें फार निकरानें लढले; परंतु त्या वेळीं त्या त्यांच्या शौर्याचा उपयोग झाला नाहीं. त्या फत्तेपूरशिक्रीच्या रणमैदानावर जे असंख्य योद्धे मरून पडले, त्यांच्या इच्छा हिंदुस्थानच्या स्वतंत्रतेसाठीं गुंतून राहिल्या होत्या; तेही सर्व योद्धे शिवाजीच्या ह्या प्रयत्नाला मदत करण्यासाठीं त्याच्या भोंवतीं गोळा झाले. परंतु ह्यांच्या पाठीमागून पूर्वीं वर्णन केलेल्या सर्वांहून अतिशय जास्त हृदयद्रावक आणि खेदकारक असा देखावा दिसूं लागला. चितूरच्या वेढ्यामध्यें ज्या महासाध्वी राणीनें आणि तिच्याबरोबरच्या तेरा हजार रजपूत स्त्रियांनीं आपल्याला अग्नीमध्यें दग्ध करून घेतलें होतें, त्या स्त्रिया तेथें आल्या, व आपलीं भाजलेलीं अंगें पुढें करून म्हणाल्या: "आम्हीं स्वदेशासाठीं आपल्याला जाळून घेतलें. आम्हीं ज्या निखाऱ्यांत उड्या टाकल्या, ते निखारे केव्हांच विझून गेले आहेत. त्यांची उष्णता तीनशें वर्षेंपर्यंत कोठून टिकणार! तरीपण आमच्या अंगाची आग अद्यापि शांत होत नाहीं. आम्ही स्वदेशाच्या स्वतंत्रतेसाठीं आपल्या अंगाला ही आग लावून घेतली, ती स्वातंत्र्याच्या अमृतसिंचनावांचून शांत होणार नाहीं. शिवाजी, त्या अमृताचें सिंचन करून तूं आमचे आत्मे थंड कर! शिवाजी, तूं आमच्यासाठीं लढ! हे जे आमचे केस होरपळले आहेत, आणि आमच्या अंगावर फोड आले आहेत, ह्यांच्यासाठीं तूं लढ!" असे उद्गार काढून डोळ्यांत पाणी आणून त्यांनीं शिवाजीची विनवणी केली. शिवाजीचा हा स्वतंत्रतेचा विचार ऐकून तत्कालीन हिंदुस्थानही प्रमुदित झालें, व आतां आपल्याला बरे दिवस येतील, अशी त्याला आशा वाटूं लागली. गर्भावस्थेंत

असलेल्या आत्म्यांना आणि गर्भाशयाच्यापर्यंत ज्यांची मजल आली नसून अजून जे त्याच्याही पुष्कळ मागें होते, अशा आत्म्यांनासुद्धां, आपण जन्मास केव्हां येऊं, आणि ह्या स्वतंत्रतेच्या इमारतीमध्यें हातभार लावण्याला आपल्याला केव्हां संधि सांपडेल, अशाविषयीं उत्कंठा उत्पन्न झालेली होती. देवळांचे मोडलेले कळस, ब्राह्मणांचीं तोडलेलीं जानवीं, हिंदूंच्या उपटलेल्या शिखा, गाईंच्या सुरे ठेवलेल्या माना, भ्रष्ट केलेलीं तीर्थें, उध्वस्त पाडलेलीं पवित्र क्षेत्रें, लुटीनें कंगाल केलेले लोक, सारावसुलीसाठीं तापलेल्या तव्यानें पोळलेले पाय, तोबऱ्यांतील राखेनें मळलेलीं मुखें, भुकेनें खोल गेलेलीं पोटें, आश्रूंनीं आर्द्र झालेले चेहरे, डोळयांत आलेले प्राण आणि दुष्काळांनीं मृतप्राय झालेलीं शरीरें, हे सर्व " आतां आम्हांला या संकटांतून तूं सोडीव, याच्या पलीकडे जिवंत राहून दुःख सहन करणें शक्य नाहीं, तेव्हां तूं आमच्यासाठीं लढ ! " असें म्हणून शिवाजीला शरण आले.

एका क्षणामध्यें अशा प्रकारचा हा विलक्षण समाज आपल्याभोंवतीं गोळा झालेला पाहून शिवाजीला मोठें आश्चर्य वाटलें. सर्व हिंदुस्थान देश भाराक्रांत झालेला, गाई हंबरडे फोडीत असलेल्या, ब्राह्मण ब्रह्मकर्मं चालविण्याला असमर्थ होऊन बसलेले, मोडलेलीं देवळें आणि फोडलेल्या मूर्ति प्रतिकाराची मार्गप्रतीक्षा करीत असलेल्या, जुने राजे प्रोत्साहन देत असलेले, रजपुतांच्या स्त्रिया आक्रोश करीत असलेल्या, आणि त्यांतच आकाशांतील आणि पृथ्वीवरील सर्व देवता प्रसन्न मुद्रा धारण करून विजयाशीर्वाद देण्याला उत्सुक झालेल्या, असा तो त्यावेळचा एकंदर देखावा पाहून शिवाजीच्या अंतःकरणांतील स्वतंत्रतेविषयींचा निश्चय जास्तच दृढ झाला, व असल्या ह्या पुण्यकारक आणि सामर्थ्यवंत दैविक आणि ऐहिक समाजापासून आपण वरप्रदान मागून घ्यावें व असल्या परमपावन विभूतींचें ज्या दिवशीं आपल्याला दर्शन झालें आहे तोच आपण योजिलेल्या कृत्याला पुण्याह आहे, याकरितां आजच येथें आपल्या भावी रणयज्ञाचें पुण्याहवाचन करावें, असा संकल्प शिवाजीच्या मनामध्यें उत्पन्न झाला, व त्याप्रमाणें त्यानें अवनीवर जानुमंडल ठेवून आणि आपल्या कमलमुकुलसदृश हातांची अंजलि मस्तकाशीं धरून त्या सर्व समाजाची येणेंप्रमाणें प्रार्थना केली:—"आपण सर्वांनीं मला दीर्घ आयुष्य द्यावें. हें मला स्वतःकरितां नको आहे, परंतु आपल्या देशाकरितां पाहिजे

आहे. त्या देशाच्या स्वतंत्रतेचें तुमच्या सर्वांच्या आशीर्वादानें मी आरंभिलेलें कृत्य यथास्थितपणें शेवटास जावें, एवढ्याचसाठीं आपण मला दीर्घ आयुष्य द्यावें. तसेंच ह्या हिंदुस्थान देशाच्या स्वतंत्रतेसाठीं, माझ्या स्वतःसाठीं नव्हे, मला दीर्घ आयुष्य, श्रेय, शांति, पुष्टि आणि तुष्टि असो, असा तुम्हीं आशीर्वाद द्यावा. तसेंच श्री, यश, विद्या, विनय, हींही तुम्ही मला या कृत्यासाठीं द्या. व्रत, नियम, तप, स्वाध्याय, क्रतु, दम, दान, ह्यांनीं विशिष्ट असे जे ब्राह्मण त्यांचें मन समाधान पावो व ते प्रसन्न होवोत. तसेंच ह्या स्वदेशाच्या स्वतंत्रतेच्या कृत्यांत कोणतेंही विघ्न न येवो. सर्वांना आरोग्य असो. हें कर्म शुभकारक होवो. हें कर्म शिवकारक होवो. कर्मसमृद्धि होवो. धर्मसमृद्धि होवो. वेदसमृद्धि होवो. शास्त्रसमृद्धि होवो. पुत्रसमृद्धि होवो. धनधान्यसमृद्धि होवो. इच्छिलेली संपत्ति आम्हांला मिळो. सर्व अरिष्टांचें निरसन होवो. जें पापकारक आहे त्याचा घात होवो. जें श्रेय आहे, तें आम्हाला मिळो. याच्या पुढें जें कर्म ह्या आर्यभूमीसाठीं केलें जाणार आहे, त्यामध्यें कोणत्याही प्रकारचें विघ्न न येवो. त्याची उत्तरोत्तर प्रत्येक दिवशीं अभिवृद्धिच होवो. उत्तरोत्तर आमच्या क्रिया शुभ आणि शोभन अशाच होवोत. आमचे देशाविषयीं इच्छिलेले काम शेवटास जावोत. हें स्वतंत्रतेचें काम निर्विघ्न होण्यासाठीं तिथि, करण, मुहूर्त आणि नक्षत्रें यांचें आनुकूल्य असो. ह्या स्वदेशोद्धाराच्या हातीं घेतलेल्या कृत्यामध्यें तिथि, करण, मुहूर्त, नक्षत्र, ग्रह आणि लग्न यांच्यावर अधिष्ठान करणाऱ्या देवतांनीं आमच्यावर संतुष्ट असावें. दुर्गा, पांचाली, यांनीं संतुष्ट असावें. अग्निपुरोग विश्वेदेव यांनीं आमच्यावर कृपा करावी. इंद्रपुरस्सर मरुद्गणांनीं आमच्यावर कृपा करावी. ब्रह्मपुरस्सर सर्व वेदांनीं आमच्यावर कृपा करावी. विष्णुपुरस्सर सर्व देवांनीं आमच्यावर कृपा करावी. माहेश्वरी-पुरस्सर सर्व उमामातरांनीं आमच्यावर कृपा करावी. वसिष्ठपुरस्सर महर्षि-गणांनीं आमच्यावर कृपा करावी. अरुंधतीपुरस्सर एकपत्न्यांनीं आमच्यावर कृपा करावी. ऋषि, छंद, आचार्य, वेद, देव, आणि यज्ञ ह्या सर्वांनीं सुप्रसन्न व्हावें. ब्रह्म आणि ब्राह्मण ह्यांनीं संतुष्ट व्हावें. श्री आणि सरस्वती यांनीं संतुष्ट व्हावें. श्रद्धा आणि मेधा यांनीं संतुष्ट व्हावें. भगवती, कात्यायनी, माहेश्वरी, पुष्टिकरी, तुष्टिकरी, ऋद्धिकरी व वृद्धिकरी, यांनीं आमच्यावर सुप्रसन्न व्हावें. विनायक, महासेन, हरि, हर, हिरण्यगर्भ यांनीं आमच्यावर

सुप्रीत असावें. ग्रामदेवता आणि कुलदेवता यांनीं संतुष्ट व्हावें. ब्राह्मणांचा द्वेष करणारे नष्ट व्हावे. या स्वराज्यस्थापनेच्या कृत्यांत आड येणारे नाहींसे व्हावे. या कर्मामध्यें विघ्न करणारे लयाला जावे. शत्रूंचा पराभव व्हावा. घोर वस्तु शांत व्हाव्या. पापकारक वस्तु नाहींशा व्हाव्या. नानाप्रकारचीं संकटें विनाश पावावीं. शुभकारक गोष्टी वाढाव्यां. आम्हांला जल कल्याणकारक व्हावें. ऋतु कल्याणकारक होवोत. अग्नि कल्याणकारक होवोत. आहुति कल्याणकारक होवोत. ओषधि कल्याणकारक होवोत. वनस्पति कल्याणकारक होवोत. अतिथि कल्याणकारक होवोत. दिवस आणि रात्र हीं कल्याणकारक होवोत. जेव्हां जेव्हां पाहिजे तेव्हां तेव्हां आमच्याकरितां पर्जन्य पडो. आमच्याकरितां फल-युक्त ओषधि परिपक्व होवोत. आमचा योगक्षेम यथास्थित रीतीनें चालो. नवग्रह आमच्यावर शुभ दृष्टि राखोत. आणि भगवान् नारायण आमच्यावर सुप्रसन्न होवो. हे महाजनहो, मी तुम्हां सर्वांना नमस्कार करून तुमच्या आशीर्वचनाची अपेक्षा करीत आहें. तर हिंदुस्थान देशाला स्वतंत्रता देण्याच्या ज्या कर्माला मी प्रारंभ करीत आहें, त्या कर्मासाठीं हा दिवस पुण्यकारक आहे, असा आपण सर्वजण मला आशीर्वाद द्या. ह्या कर्मामध्यें ऋद्धि प्राप्त होईल, असा आशीर्वाद तुम्ही मला द्या. या कर्मामध्यें श्री प्राप्त होईल, असा आशीर्वाद तुम्ही मला द्या." अशी त्याची प्रार्थना ऐकून सर्वांनीं त्याला अपेक्षित वरप्रदान दिलें. नंतर हिंदुस्थानच्या उत्कर्षासाठीं आणि स्वतंत्रतेसाठीं केलेले प्रयत्न निष्फळ झाले, यांबद्दल जे आत्मे इतके दिवसपर्यंत तळमळत होते, त्यांनीं त्याला आशीर्वाद आणि प्रोत्साहन देऊन आणखी असें सांगितलें कीं, 'ब्रह्मा, विष्णु आणि महेश्वर हे ह्या भरतभूमीच्या स्वतंत्र सिंहासनावर तुला अभिषेक करोत. वासुदेव, संकर्षण, प्रद्युम्न आणि अनिरुद्ध हे तुला प्रत्यहीं विजय देवोत. ब्रह्मदेवासहवर्तमान इंद्र, अग्नि, यम, निर्ऋति, वरुण, पवन, धनाध्यक्ष व शिव हे सर्व दिक्पाल तुझें सर्वदा संरक्षण करोत. तसेंच देव-पत्न्या, आदित्यादि नवग्रह, देव, दानव, गंधर्व, यक्ष, राक्षस, पन्नग, ऋषि, मुनि, गाई, देवमाता, द्रुम, नाग, अप्सरा, अस्त्र, शस्त्र, राजे, वाहनें, ओषधि, रत्नें, वर्ष, अयनें, ऋतु, नद्या, समुद्र, पर्वत, तीर्थें, जलद आणि नद, हे सर्व तुझ्यावर अभिषेक करोत, आणि तुझ्या सर्व इच्छा परिपूर्ण करोत." असा त्या सर्वांनीं आशीर्वाद दिल्यानंतर सर्वांनीं मिळून त्याच्या मस्तकावर

अभिषेक करण्याला सुरुवात केली. गंगादिक पुण्य नद्या व तीर्थें प्रविष्ट होऊन ज्याला सर्व तीर्थांचा राजा करून ठेविलें आहे अशा समुद्रांतून प्रत्यक्ष भगवान् सूर्यनारायणाच्या करांनीं ज्यामध्यें अत्यंत पवित्र, परमपावन आणि अमृतप्राय उदक भरून ठेविलें होतें, अशा प्रकारचा एक मेघ खालीं ओढून घेऊन, आणि त्यांतील जल मंत्रांनीं पुनीत करून ब्राह्मण ज्याप्रमाणें एखाद्या ताम्हनांतून दर्भकूर्चांनीं यजमानावर जलसिंचन करितात, त्याप्रमाणें तेथें जमलेल्या त्या सर्व दिव्य समुदायांनीं शिवाजीच्या मस्तकावर अभिषेक केला, व त्या वेळीं त्या सर्वांनीं पुढील मंत्र म्हटला : "ॐ इमा आपः शिवतमा इमाः सर्वस्य भेषजी : ।। इमा राष्ट्रस्य वर्धनीरिमा राष्ट्रभृतोऽमृताः ।। याभिरिंद्रमभ्यषिंचत्प्रजापति : सोमं राजानं वरुणं यमं मनुं ।। ताभिरद्भिरभिषिंचामि त्वामहं राज्ञां त्वमधिराजो भवेह ।। शिवाजीनें राष्ट्रवर्धनाचें जें पूज्य काम हातीं घेतलें होतें, त्याला अनुसरून अशाच मंत्रानें तेथील प्रत्येक-जणांनीं त्याच्या मस्तकावर त्या शुद्ध अमृतमय जलाचा अभिषेक करून त्याला तूं राजा होशील असा आशीर्वाद दिला. त्या सर्व देवता म्हणाल्या, "हे महानुभावा, आम्ही ज्या ह्या मंत्रपूतजलानें तुझ्यावर अभिषेक करीत आहों, तें जल अत्यंत कल्याणकारक आहे. हें जल सर्वांवर औषध आहे. ह्या जला-पासून राष्ट्राचें वर्धन होतें. हेंच जल राष्ट्राचें पोषणकर्तें प्रत्यक्ष अमृत आहे. ब्रह्मदेवानें सोमराजा, वरुण, यम आणि मनु यांना ज्या जलानें अभि-षेक केला त्याच जलानें आम्ही तुला अभिषेक करीत आहों. सर्व राजांमध्यें तूं श्रेष्ठ राजा होशील !" असा सर्वांनीं त्याला आशीर्वाद दिला; आणि त्याजवर त्या स्वर्गीय शुद्ध जलाचें त्यांनीं सिंचन केलें. ते शीतल आणि रम्य जलबिंदु शिवाजीच्या अंगावर पडून ते त्याला गार लागतांक्षणींच तो त्या समाधींतून जागा झाला, व हें काय आहे म्हणून इकडे तिकडे पाहूं लागला. परंतु तो देवतांचा समाज आतां त्याला मुळींच कोठें दिसेना. तेव्हां तो म्हणूं लागला कीं, "त्या अनेक देवता आणि ते हिंदुस्थानच्या स्वतंत्रतेसाठीं तळमळणारे पूर्वींचे आर्यपुरुष कोठें आहेत? मला ते येथें दिसत होते हा भ्रमच होता कीं काय? मीं त्यांच्यापाशीं आशीर्वाद मागितला आणि त्यांनीं तो मला दिला, हा सर्व आभासच कीं काय? त्या सर्वांनीं वेदोक्त मंत्र म्हणून राष्ट्रसंस्थापना करण्याविषयीं मला अनुज्ञा दिली, आणि मन्वादिक

राजांना ज्या जलानें ब्रह्मदेवानें अभिषेक केला, त्याच जलानें माझ्यावर अभिषेक करून ' तूं सर्व राजांमध्यें श्रेष्ठ राजा होशील ' असा त्यांनीं मला आशीर्वाद दिला हें सर्व मिथ्याच कीं काय ? " अशा अनेक शंका त्याच्या मनामध्यें एक क्षणभर उद्भवल्या. परंतु आपलें सर्व मस्तक आणि अंग हें जलबिंदूंनीं आर्द्र झालेलें पाहून व देवतांनीं केलेल्या अभिषेकाचें हें अवशिष्ट चिन्ह आहे, असें जाणून त्याच्या मनाचा सर्व संदेह नाहींसा झाला. अशी त्याच्या मनाची खात्री झाल्यानंतर आपल्या भावी रणयज्ञाचें जें हें आज स्वाभाविक पुण्याहवाचन झालें त्या पुण्याहवाचनाची ' फलसमृद्धिरस्तु ' असा आशीर्वाद त्यानें मागितला. त्याबरोबर आसपासच्या पर्वतांमधून ' अस्तु ' असा मंद आणि गंभीर प्रतिध्वनि उत्पन्न झाला. आपल्या प्रार्थनेला हें सर्व विश्वानें जें आशीर्वादपूर्वक प्रत्युत्तर दिलें, तीच शुभ शकुन आहे, असें समजून शिवाजीनें त्या वेळीं प्रथम तेथून जवळचाच जो तोरणा किल्ला दृष्टीस पडला, तो हस्तगत करून घेण्याचा निश्चय केला. तेव्हांपासून त्यानें मराठी राज्याची स्थापना कशी केली, आणि देवतांनीं या प्रसंगीं केलेल्या अभिषेकाची रायगडावर राज्याभिषेकाचे वेळीं गागाभट्टांनीं पुनरुक्ति कशी केली, याच्याबद्दलची हकीकत महाराष्ट्र वाचकांना सांगावयाला पाहिजे असें नाहीं.

---

# हिंदुस्थानच्या रंगभूमीवर हॅम्लेटचें नाटक : : ११

काळ : अग्रलेख, ता. १२-८-१९०४

● याच अंकांत स्फुट विचारांत काळकर्ते म्हणतात, हिंदुस्थानांतील लोक हॅम्लेटइतके खुनशी नाहींत; आणि अपमानास्पद दुःखामध्यें राहण्यापेक्षां मरणें बरें, असें कोणालाही वाटत नाहीं.

हल्लीं आपल्या देशाकडे पाहिलें तर एक प्रकारची विलक्षण स्थिति झालेली दृष्टोत्पत्तीस येते. प्रयत्न करावेत; परंतु प्रयत्नांना फळ येत नाहीं. सर्व लोक उदासीन झालेले दिसतात. निराशेशिवाय दुसरें बोलणें नाहीं. आपली काय स्थिति झाली आहे, हें प्रत्येकाला समजतें. परंतु त्यांतून वर निघण्याचा मार्ग मात्र कोणालाच कळत नाहीं. देश सरकारी कागदोपत्रीं श्रीमंत दिसतो. परंतु गरीबांच्या झोंपड्यांतील मडक्यांत दारिद्र्याशिवाय दुसरें कांहींएक दिसत नाहीं. युरोपियन लोकांशिवाय दुसऱ्या कोणालाही खरें सुख लाभत नाहीं. इंग्लिश लोक आपल्या ज्युबिल्यांचे आणि राज्यारोहणाचे महोत्सव हिंदुस्थानांत करवितात. परंतु या महोत्सवांच्या आनंदाचा खरा स्पर्श हिंदुस्थानांतील लोकांच्या अंतःकरणाला क्वचितच होत असेल. इंग्लिशांच्या सैन्याला प्रिटोरियामध्यें जय मिळाला म्हणजे हिंदुस्थानांतील लोक जयघोष करूं लागतात. परंतु जय कोणाचा, आणि त्याबद्दल आनंद कशास्तव, असे विचार मनांत येऊन लोकांना आनंदापेक्षां खेदच जास्त होतो. हिंदुस्थान सुखी आहे, असें म्हटलें जातें; परंतु हिंदुस्थानांतील लोकांना वास्तविक सुख नाहीं. तेथील व्यापारधंदे वाढविले जात आहेत, असें सांगण्यांत येतें; परंतु येथील कारागीर उपाशी मरण्याच्या पंथाला लागले आहेत. अशी प्रत्येक बाबतीमध्यें स्थिति झालेली आहे. बाहेरून दिसत असतें एक, आणि आंतून खरी

स्थिति असते दुसरीच. असें कां होत आहे, हा एक विचार करण्यासारखा प्रश्न आहे.

सूक्ष्म रीतीनें विचार केला असतां इंग्लिशांचें या देशांतील अस्वाभाविक अस्तित्व हें या स्थितीचें मुख्य कारण होय, असें दिसून येईल. एखादा देश म्हणजे एक मोठें थोरलें शरीरच होय. त्या शरीराची प्रकृति नीट राहण्याला त्याच्या पोटामध्यें जे पथ्यकारक पदार्थ आहेत, तेच शिरणें अवश्य आहे. एखादा अपथ्यकारक पदार्थ पोटांत शिरला असतां तो सर्व शरीराची स्वस्थता बिघडवून टाकितो. त्याप्रमाणें इंग्लिशांनीं हळूहळू हिंदुस्थानच्या पोटांत शिरून त्याच्या शरीराची व्यवस्था बिघडवून टाकिली आहे. इंग्लिश लोक म्हणतात कीं, आम्ही येथें गैरव्यवस्था होती, ती मोडून व्यवस्था करीत आहों, व ते आपल्या मताप्रमाणें कदाचित् तसें करीतही असतील. परंतु एकंदर देशावर आणि देशांतील लोकांच्या मनावर त्यांच्या कृतीचा चांगला परिणाम होत नाहीं. या देशांतीलच एखादा राजा इंग्लिशांसारखा बुद्धिमान् आणि कलाकौशल्यनिपुण असता, व इंग्लिश लोक आज ज्या गोष्टी हिंदुस्थानाकरितां करीत आहेत, त्या जर त्यानें केल्या असत्या, तर त्यांचा खात्रीनें अधिक चांगला परिणाम झाला असता. ह्या विसाव्या शतकाच्या प्रारंभीं जर एखादे शिवाजीराजे, किंवा एखादे पेशवे, शिंदे, होळकर, जयपूरचे महाराज, किंवा उदेपूरचे महाराणे, ह्यापैकीं कोणी हिंदुस्थानावर राज्य करीत असते, तर त्यांचें लोकाशीं वर्तन आणि लोकांचें त्यांच्याशीं वर्तन हीं हल्लींच्या वर्तनक्रमापेक्षां फार निराळीं झालीं असतीं. इंग्लिशांची हल्लींची सर्व कृति चांगलीच आहे असें नाहीं. परंतु ती चांगली आहे असें गृहीत धरलें, तरी इंग्लिशांच्यामध्यें मोठा दोष हा आहे कीं, ते परकीय आहेत. ते कितीही गोरे असले तरी हिंदुस्थानासंबंधानें हा त्यांचा परकेपणाचा डाग कधींही धुऊन जाणार नाहीं. त्यांनीं कितीही लपंडाव केले, तरी आपण परकीय आहों, ही गोष्ट त्यांना कधींही लपवितां येणार नाहीं. हा त्यांच्या अंगचा परकीयपणाचा अवगुण त्यांना दुसऱ्या देशाचें राज्य न्यायानें आणि निःपक्षपातानें चालविण्याच्या कामीं पदोपदीं अपात्र ठरवीत आहे. हिंदुस्थानांतील लोक कमकुवत आहेत, तोंपर्यंत इंग्लिशांच्या अंगच्या ह्या अपात्रतेचा फारसा बोभाटा होणार नाहीं. परंतु ही स्थिति फार दिवस टिकणार आहे, असें मात्र नाहीं.

शरीरामध्यें त्या शरीराला परिचित आणि नैसर्गिक असें अन्न जोंपर्यंत जात आहे, तोंपर्यंत तें शरीर आणि त्या शरीराच्या स्वास्थ्यावर अवलंबून राहणारें मन हीं सुयंत्रितपणानें चालूं राहतात. परंतु त्या शरीरांत जर एखादें विसदृश गुणधर्माचें विष शिरलें, तर तें त्या शरीराला कधींही चैन पडूं देणार नाहीं; व तें त्या शरीराला कधींही चांगलें मानवणार नाहीं. हॅम्लेटच्या आईचा आणि हॅम्लेटच्या चुलत्याचा जसा अस्वाभाविक संबंध जुळला होता, तसा हिंदुस्थान व इंग्लिश लोक यांचा जमलेला आहे. हॅम्लेटच्या चुलत्याच्या मनांतून आपल्या पुतण्याचें फारसें अकल्याण करावयाचें होतें असें नाहीं. त्याची आई आपल्याला वापरावयाला मिळावी आणि त्यानें जाडीभरडी मीठभाकरी व वस्त्रप्रावरण घेऊन आनंदानें कालक्रमणा करावी, अशी त्याची सदिच्छा होती! परंतु तें कांहीं जुळलें नाहीं! डेन्मार्कच्या राजधानीमध्यें अन्याय फार दिवस टिकला नाहीं! परमेश्वराच्या सृष्टीचाच हा एक चांगला नियम आहे कीं, त्या सृष्टीमध्यें अन्याय फार दिवस टिकत नाहीं. दुबळ्या लोकांना परमेश्वराची ही एक प्रकारची अप्रत्यक्ष मदतच आहे असें म्हटलें पाहिजे. हॅम्लेट याचा चुलता आपल्या पुतण्याला बाह्यात्कारी मोठ्या ममतेनें वागवीत असे व हॅम्लेटही बाह्यात्कारी मोठा आज्ञाधारकपणा दाखवीत असे. चुलता आणि पुतण्या हीं हॅम्लेटच्या नाटकांतील पात्रें काढून त्यांच्या जागीं हल्लीं चालू असलेल्या हिंदुस्थानच्या नाटकांतील इंग्रज सरकार आणि इंडियन लोक हीं पात्रें घातलीं तर ह्या उभयतांच्या दरम्यान हल्लीं जो कपटप्रेमाचा खेळ चालला आहे, त्याचें हुबेहूब प्रतिबिंब शेक्सपियरच्या प्रख्यात कृतीमध्यें प्रत्येकाला पाहावयाला सांपडेल. हल्लीं हिंदुस्थानांत अशा प्रकारचे खोटे संबंध उत्पन्न झालेले आहेत. ज्यांच्या अंतःकरणांमध्यें हिंदुस्थानांतील लोकांसंबंधानें प्रजावात्सल्य उत्पन्न होणें अशक्य आहे, ते लोक आपलीं अंतःकरणें प्रजावात्सल्यानें अगदीं गहिंवरून गेलीं आहेत, असें दाखवीत आहेत. आणि जशास तसें परत करण्यासाठीं हिंदुस्थानांतील लोकही इंग्लिशांसंबंधानें खोट्या राजनिष्ठेचा आव घालीत आहेत. दोन्ही पक्ष एकमेकांना ओळखतात. काय विचार चालले आहेत, याबद्दल दोन्ही पक्षांनाही पूर्ण संशय आहे. तरी पण हे दोन्ही पक्ष एकत्र भेटले म्हणजे एकमेकांच्या गळ्यांत गळे घालतात, मिठ्या मारतात, शेक हँड करतात आणि बाह्यात्कारी हंसतात. असें जरी आहे तरी दोघांचीही अंतःकरणें एकमेकांबद्दल

साशंक असतात. सरकार लोकांच्या कल्याणासाठीं म्हणून जीं कृत्यें करीत आहे, तीं खरोखर आपल्या कल्याणाचीं आहेत अशाबद्दल त्यांवर कोणाचाही विश्वास नाहीं. सरकारनें हल्लीं देशामध्यें जे अनेक प्रकारचे प्रघात सुरू करून दिलेले आहेत, त्या सगळ्यांबद्दल लोकांचा येथून तेथून गैरभरंवसा होऊन गेलेला आहे. सरकारच्या कायदेकौन्सिलमध्यें भाषणें होतात त्यांचें उदाहरण घ्या. एखादा लोकनियुक्त सभासद लोकांच्या वतीनें म्हणून कायदेकौन्सिलमध्यें भाषण करीत असतो. परंतु त्याबद्दल लोकांना काय वाटत असतें, त्याची कल्पना कोणाला तरी आहे काय? सगळे लोक त्या भाषणाची थट्टा करीत असतात. हीं भाषणें कुचकामाचीं आहेत म्हणून सर्व लोक त्यांची हेटाळणी करीत असतात. त्या भाषणांत व्याकरणाची चूक नसते. अलंकार बरोबर साधलेले असतात. त्यांतील आंकड्यांचीं कोष्टकें चार चार वेळां तपासून दुरुस्त केलेलीं असतात, व नेटिव मनुष्यांनीं इंग्रजींत इतकें अस्खालित भाषण केल्याबद्दल कित्येक परीक्षक वर्तमानपत्रकर्ते त्यांना शंभरांतील नव्याण्णव मार्क देतात. परंतु याच्या पलीकडे काय ? यापासून कांहीं एक व्हावयाचें नाहीं हा लोकांचा ग्रह आधींपासूनच झालेला असतो, व तोच अखेरीस खरा ठरतो. जे भाषण करणारे असतात त्यांचा स्वतःचाही आपल्या भाषणाच्या उपयुक्ततेबद्दल तसाच अविश्वास असतो. ते एकीकडे मोठ्या आवेशानें बोलत असतात; परंतु एकीकडे आंतून आपल्या तोंडांतील वाफेच्या अपव्ययाबद्दल त्यांना खेद वाटत असतो. कायदेकौन्सिलच्या खालची पायरी म्युनिसिपॅलिटीची. त्यामध्यें जाण्यासाठीं कित्येक लोक धडपडत असतात. परंतु तेथें आपल्या जाण्याच्या उपयुक्ततेबद्दल सर्वांचा सारखाच गैरभरंवसा असतो. जे या संस्थांतून असतात तेच तिला नाकें मुरडीत असतात. ह्यापासून कांहीं एक फायदा नाहीं, असें त्यांची मनोदवता त्यांना सांगत असते. प्रघाताच्या ओघामध्यें इंग्लिशांनीं त्यांना सोडून दिलेलें असल्यामुळें त्यांतील भोंवऱ्यांतून बिचारे गरगर फिरत असतात. परंतु मनामध्यें ह्या ब्रिटिश संस्थांसंबंधानें पूर्ण अविश्वास उत्पन्न झालेला असतो. एखादा साहेब जाऊं लागला कीं त्यास मानपत्र द्यावयाचें किंवा तो मरूं लागला, तर त्याचें स्मारक करावयाचें, दरबारला जावयाचें, लेव्हीचें आमंत्रण चुकूं द्यावयाचें नाहीं, राजाच्या जन्मदिवशीं किताब मिळविण्याची हांव धरावयाची, वगैरे प्रघात बऱ्या लोकांमध्यें फार प्रबळ झालेले

आहेत. परंतु त्यांवर कोणाचा विश्वास आहे, असें मात्र नाहीं. इंग्लिश लोकांपासून नेटिव लोक हे मानमरातब एका हातानें घेत असतात, आणि दुसऱ्या पायानें त्यांना तुच्छ मानीत असतात. एखादा अधिकारी साहेब हिंदुस्थानांतील लोकांच्या कल्याणासंबंधानें बोलत असला तर विद्वान् नेटिव्ह श्रोते हळूच एकमेकांच्या कानाशीं लागून त्या साहेबाच्या खोट्या भाषणाची कशी निर्भर्त्सना करीत असतात, त्याच्या विधानांची कशी थट्टा करीत असतात, आणि कळकळीच्या मोठमोठ्या शब्दप्रयोगांना ते कसे तुच्छ मानीत असतात, हें ज्यांनीं बारकाईनें पाहिलें असेल, त्यांना इंग्रजी संस्था आणि इंग्रजी पद्धति यांवरून लोकांचा किती भरंवसा उडाला आहे, याची थोडीशी तरी कल्पना येईल. सर्व लोकांच्या मनामध्यें हा एक ग्रह कायम होऊन गेला आहे कीं, ज्या हेतूंसाठीं जे उपाय सांगण्यांत येतात, त्या उपायांमध्यें ते हेतु सफळ करण्याचें सामर्थ्य नाहीं. अशा रीतीनें जिकडे तिकडे खोडसाळपणा, अविश्वास आणि गैरभरंवसा माजून राहिला आहे, आणि त्यामुळेंच हिंदुस्थानांतील लोकांच्या हातून कधीं कांहीं एक कार्य घडून येत नाहीं. कोणतेंही कार्य हातून घडून येण्याला मन दृढ पाहिजे व ती दृढता मनामध्यें विश्वासानें उत्पन्न होते. तो विश्वास, ती श्रद्धा, तो भरंवसा—जो सर्व महत्कार्यांच्या मुळाशीं असतो तो—आमच्यामध्यें नाहीं. अशा रीतीनें भरंवसा उडणें हें खोटेपणाच्या अंतकाळचें लक्षण होय. हें सगळें खोटें आहे, ही लबाडी आहे, लुच्चेगिरी आहे, झूट आहे, माया आहे, भामटेगिरी आहे, फसवेगिरी आहे अशी एकदां मनाची समजूत होत चालली म्हणजे मग त्या मनाला हीं फसवणुकीचीं बंधनें तोडून टाकण्याला उशीर लागत नाहीं. तीं तुटलीं म्हणजे सत्याचा प्रादुर्भाव होऊं लागतो, मनांत विश्वास उत्पन्न होतो, आणि मनुष्याला महत्कृत्यें करण्याची ताकद येते. परंतु या पुढच्या पायऱ्या आहेत. आपण हिंदुस्थानांतील लोक अजून फसवणुकीच्या पायरीवर आहों. अजून हिंदुस्थानांत हॅम्लेटचें नाटक चालू आहे. मुळांत खोटेपणा पसरलेला आहे. इंग्लिशांचे हेतु वास्तविक इंग्लंड सधन करावयाचे असून आम्ही हिंदुस्थानचें कल्याण करीत आहों असें ते म्हणतात. हें मुळांतच पाप आहे, आणि तेथून तें सर्व देशभर पसरलेलें आहे. या विहिरींतच ही लबाडी असल्यामुळें त्या विहिरींतून जो कोणी आपला पोहरा बुडवून पाहणार, त्याच्या पोहऱ्यांत लबाडीशिवाय दुसरें काय यावयाचें

आहे! सगळी फसवणूक आणि नागवणूक! जेथें उगमाजवळचेंच पाणी खोट्या हेतूंच्या मिषानें कलुषित झालेलें, त्या नदीचें पुढील पाणी पिऊन सत्य कसें जिवंत राहूं शकेल? आतां लोकांत अविश्वास आणि अश्रद्धा उत्पन्न झाली असली तर त्याचा दोष लोकांवर काय आहे? पूर्वी याच लोकांवर रामराजांसारखे स्वकीय राजे राज्य करीत होते, तेव्हां त्या राजांच्या कृतीबद्दल आणि राज्यपद्धतीबद्दल या लोकांच्या मनात अविश्वास नव्हता. सत्यानें सत्य वाढतें आणि लबाडीनें लबाडी वाढते. समुद्राचे कालवे काढून तेथील पाणी सगळीकडे नेलें तर तें पाणी खारटघोटच असणार. समुद्राच्या कालव्याचें पाणी मधुर कोठून असणार? सारांश, ही जी नैसर्गिक क्रमाविरुद्ध येथें पद्धति सुरू झालेली आहे, तिचे हे सर्व परिणाम आहेत. खोट्या प्रजावात्सल्यापासून दिखाऊ राजनिष्ठा उत्पन्न होते. अंतःकरणाला न शिवणारें प्रजावात्सल्य आणि अंतःकरणाच्या बाहेर वास करणारी राजनिष्ठा हीं दोन्हीही पातकेंच आहेत, यांत शंका नाहीं. परंतु प्रश्न एवढाच कीं, यांतील पहिलें पातक कोणीं केलें? इंग्लिश लोक येथील लोकांवर आपला अंमल दडपूं लागल्यानंतर यांजबद्दल कशी तरी खोटीखरी राजनिष्ठा दाखविणें लोकांना जरूरच होतें. परंतु खोटें प्रजावात्सल्य दाखविण्याची तशी इंग्लिशांच्या दंडावर कोणीं गोणी ठेविली होती असें नाहीं. ते येथें आलेच नसते, किंवा ज्या निमित्तानें आले त्याप्रमाणें ते सरळ व्यापार करीतच राहिले असते, तर ही परकीय राज्य बळकाविण्याची व मग खोटें प्रजावात्सल्य दाखवीत बसण्याची उठाठेव करण्याचें कारण पडलें नसतें. परंतु तसें करून इंग्लिशांनीं प्रथम खोटेपणाला सुरवात केली आहे; व त्या खोटेपणाचें रान हल्लीं सर्व हिंदुस्थानभर माजलें आहे. हल्लीं आपल्या देशांतील कोणत्याही संस्था घ्या; सरकारच्या लोककल्याणकारक संस्था घ्या, किंवा लोकांच्या राजनिष्ठामूलक संस्था घ्या, सर्व ठिकाणीं खोडसाळपणा भरलेला आहे. ह्या खोडसाळपणामुळें शुद्ध अंतःकरण हा पदार्थ दुर्मिळ झाला आहे. अंतःकरणाची शुद्धि नसल्यामुळें सत्त्वगुण वृद्धिंगत होत नाहीं. सत्त्वगुणाच्या अभावामुळें नैतिक उन्नतीची कोणालाही ओळख उरली नाहीं. नीतीच्या बाबतींत सर्वत्र अधःपात दृष्टोत्पत्तीस येतो. अशा रीतीनें येथील सर्व शुद्धतेचा झरा इंग्लिशांनीं गढूळ करून टाकला आहे, आणि हें अंतःकरणाचें पाणी विघडवून टाकल्यामुळें हिंदुस्थानांतील लोकांना अनेक

मानसिक रोग जडलेले आहेत. सगळ्या हिंदुस्थानांत हल्लीं जिकडे तिकडे हॅम्लेट नाटक चाललें आहे. ह्या नाटकाचें पर्यवसान शोकामध्यें होणार, याच्याबद्दल शंका नाहीं. कारण, या हिंदुस्थानच्या रंगभूमीवरील नाटकाच्या पांचव्या अंकांतील शोकपर्यवसानाची केव्हांपासूनच तयारी चाललेली आहे. सगळ्या गोष्टींच्या, संस्थांच्या, भाषणांच्या आणि व्यवहारांच्या मुळाशीं जी लबाडी आणि लुच्चेगिरी आहे, तिचें पर्यवसान दुसरें काय व्हावयाचें आहे ? राजापासून रंकापर्यंत हल्लीं सगळ्यांचा या राजकीय बाबतींत काय क्रम चालला आहे ? अगदीं हुबेहूब हॅम्लेटचें नाटक ! हॅम्लेट आपल्या एका भाषणांत म्हणतोः—I set it down, that one may smile and smile and be a villain; at least, I am sure, it may be so in Denmark. तसा प्रकार हल्लीं सर्वत्र चालला आहे. बाहेरून हंसावें आणि आंतून गळे कापावे, मिथ्यावर्तन करावें, मनांत एक आणि बाहेर एक दाखवावें, अशी स्थिति आहे. हॅम्लेटच्या वेळीं अशी स्थिति डेन्मार्कमध्यें होती; हल्लीं ती हिंदुस्थानामध्यें आहे. हॅम्लेटची अशी विलक्षण स्थिति झालेली होती कीं, त्याला त्याचा सर्व देश हा एक तुरुंगच झाला होता; आणि तशीच आजकाल हिंदुस्थानची स्थिति आहे. हॅम्लेटचे शाळेंतील जुने मित्र हेच त्याचे गुप्त हेर बनले होते आणि हिंदुस्थानांतही हल्लीं तशी स्थिति नाहीं असें नाहीं. बाहेरून जिवलग मित्र व परमस्नेही आणि आंतून गुप्त पगार घेऊन चहाड्या सांगणारे कट्टे दुस्मान, असे थोडेथोडके लोक सांपडतील असें नाहीं. व्यवहारांत खरेपणा नाहीं, कुटुंबांत भ्रष्टाकार, जिवलग स्नेह्यांवरही विश्वास ठेवण्याची सोय नाहीं व तोंडपुजेपणावर चरितार्थ, अशा प्रकारची परिस्थिति हॅम्लेटला आणि हिंदुस्थानांतील लोकांना दोघांनाही सारखीच प्राप्त झालेली आहे. अशा स्थितीमध्यें हॅम्लेटला त्याच्या बापाचें भूत येऊन भेटलें, तशा प्रकारचें हिंदुस्थानच्या पूर्ववैभवाचें भूत हिंदुस्थानांतील लोकांनाही येऊन भेटत आहे. हॅम्लेटला त्याच्या बापाचें भूत फक्त एका एल्सीनोरच्या किल्ल्यासमोरच दिसलें, परंतु हिंदुस्थानच्या पूर्ववैभवाचें भूत हिंदुस्थानांतील लोकांना हिंदुस्थानांतील प्रत्येक किल्ल्याच्यापुढें दिसत आहे. हॅम्लेटच्या भुतानें आपला सगळा पूर्वइतिहास हॅम्लेटला निवेदन केला व अखेरीस अंतर्धान पावण्याच्या

वेळीं अत्यंत दीनमुद्रेनें हॅम्लेटला सांगितलें कीं, Remember me ( माझी आठवण असूं दे ), तेच शब्द आपल्या पूर्ववैभवाचें भूत आपल्याला सांगत आहे. परंतु ' माझी आठवण असूं दे, ' अशी भुतानें विनंति केल्यानंतर हॅम्लेटनें जो निश्चय केला, तसा निश्चय आपणही केला पाहिजे. हॅम्लेटचा निश्चय पुढीलप्रमाणें होताः—Remember thee ! Ay, thou poor ghost, while memory holds a seat in this distracted globe. Remember thee ! yea, from the table of my memory I'll wipe away all trivial fond records, all saws of books, all forms, all pressures past, that youth and observation copied there; and thy commandment all alone shall live within the books and volume of my brain, unmixed with baser matter.

---

# पोलंडची अधोगति : : १२

काळ : अग्रलेख, ता. १६।१२।१९०४

यूरोप खंडामध्यें पोलंड या नांवाचा एक देश आहे; अथवा आहे म्हणण्या-पेक्षां होता, असें म्हणणें जास्त सयुक्तिक होईल. कारण, त्या देशाला हल्लीं स्वतंत्र अस्तित्व नाहीं. त्याचा एक तुकडा रशियाच्या पोटांत गेला आहे, कांहीं भाग ऑस्ट्रियानें पचविला आहे आणि कांहीं प्रशियानें खाल्ला आहे. मिळून पोलंडपैकीं जाग्यावर असें कांहींच राहिलेलें नाहीं. अशा अभावाच्या अवस्थेमध्यें आज पोलंड देश आहे. परंतु तो अशा नष्टप्राय स्थितीप्रत गेलेला आहे, तरी त्याच्यांतील बोध करण्याचें सामर्थ्य मात्र त्याच्याबरोबर नष्ट झालेलें नाहीं. आणि उन्नतीच्या शिडीवर हळूहळू एक एक पायरी चढूं इच्छिणाऱ्या राष्ट्रानें तर प्रत्येक ऐतिहासिक गोष्टीपासून आपल्या भावी उपयोगाकरितां बोध घेतला पाहिजे. जीं राष्ट्रें स्वतंत्र होऊन विद्या, व्यापार, कलाकौशल्य, कारखाने, नवीन शोध वगैरे कामांत परमावधीला जाऊन पोंहोचलीं आहेत, त्यांच्यापासून तर अवनत राष्ट्रांना सर्वच शिकण्यासारखें असतें. परंतु पोलंडमध्येंही अवनत राष्ट्रांकरितां पुष्कळ धडे आहेत. आपल्या राष्ट्राचें गलबत ह्या विश्वस्वरूपी समुद्रांतून हांकारून नेत असतां, त्याच्या वाटेमध्यें कोणकोणते खडक येतात, आणि कोणत्या भोंवऱ्यांत सांपडून तें गलबत बुडण्याचा संभव असतो, याबद्दलची माहिती ज्यांना पाहिजे असेल त्यांनीं पोलंडच्या इतिहासाचें अवश्य मनन केलें पाहिजे.

पोलंडला आजूबाजूच्या लोकांनीं खाऊन टाकावें इतका कांहीं मूळचा तो कमकुवत देश नव्हता. रोमन साम्राज्यावर हल्ले करून तें मोडकळीस

आणण्याच्या कामीं या देशांतील रहिवाशांनीं किती शौर्य दाखविलें होतें, याबद्दलच्या जुन्या कथा आपण क्षणभर बाजूला ठेविल्या, तरी अगदीं अलीकडच्या काळापर्यंतसुद्धां त्यांचें धैर्य आणि शौर्य अव्याहतपणें विजय पावत होतें. रोमन साम्राज्याच्या ऱ्हासाच्या नंतर कॉन्स्टन्स बादशहाचें कान्स्टँटि-नोपल हें शहर तुर्क लोकांनीं घेऊन तेथून त्यांनीं आपले मोर्चे खुद्द व्हायना शहरापर्यंत आणून भिडविलेले होते. तेथून त्यांना घालवून लावण्याकरितां ख्रिस्ती लोकांचें जें एक प्रचंड सैन्य जमलें होतें, त्यामध्यें पोलंडच्या सैन्याचेंच विशेष प्राधान्य होतें. सोबिस्की हा त्या वेळीं पोलंडचा मुख्य होता व त्यानें अतिशय पराक्रम करून मुसलमान लोकांना व्हाएनाच्या तटापासून परत फिरविलें. पोलंडमधील लोक बाहेर असें शौर्य गाजवीत होते; परंतु स्वदेशांतील त्यांची स्थिति आंतून हळूहळू बिघडत चालली होती. पोलंड-मधील लोक हे मूळपासून स्वतंत्र खरे; परंतु रानटी स्थितीमध्यें जें स्वातंत्र्य असतें, तेंच सुधारलेल्या स्थितीमध्येंही कायम ठेवण्याचा त्यांचा दुराग्रह असल्यामुळें त्यांना हळूहळू अवनति येत चालली. सगळ्यांना सारखा हक्क असल्यामुळें सर्वांनीं एकत्र जमून एकमतानें राजा निवडावयाचा व त्यांत एखाद्याचेंही मत विरुद्ध पडलें तर पूर्वीची सर्व व्यवस्था नामंजूर ठरावयाची, अशी त्या लोकांमध्यें विलक्षण वहिवाट होती. ह्या वहिवाटीचा दुरुपयोग होऊन अखेरीस तिजपासून फार वाईट परिणाम घडून येऊं लागले. सैन्याची स्थिति एकंदरींत फार वाईट झालेली होती. शिपाई लोकांना वेळच्या वेळीं पगार मिळत नसत. त्यांच्यांत कोणत्याही प्रकारची शिस्त उरली नव्हती. सारख्या तऱ्हेचे कपडेलत्ते वगैरे पोषाखाची व्यवस्था बिलकूल नव्हती. किल्ले, तटबंदीचीं शहरें, वगैरे बंदोबस्ताच्या जागांची दुरुस्ती न राहिल्यामुळें एकं-दर देशाच्या संरक्षणामध्यें फार कमतरता उत्पन्न झालेली होती. अशा स्थितीं-तच लोकांच्या दुराग्रहांची आणखी भर पडली होती. आपलें जुनें तें कधीं सोडावयाचें नाहीं, असा तेथील सरदारवर्गांत मोडणाऱ्या जुन्या घराण्यांतील लोकांचा हट्ट असे. प्रत्यक्ष आकाश कोसळूं लागलें, तरी तें आपण आपल्या भाल्यांवर उचलून धरूं, अशी त्यांना आपल्या शौर्याची वृथा घमेंड होती. आपल्याला हल्लीं कोणती स्थिति प्राप्त होत चालली आहे, याकडे बिलकुल लक्ष न देतां ते आपलें पूर्वीचें वैभव आपोआप कायम टिकेल अशा भरंवशावर

स्वस्थ बसत असत. परंतु त्यांच्या सभोंवतालचे सर्व देश जागृत झालेले होते. तेथील व्यापारधंदे वाढत चालले होते, आणि त्या मानानें सभोंवतालचे सर्व लोक धाडशी, उद्योगशील आणि महत्त्वाकांक्षी बनत चालले होते. परंतु पोलंडमध्यें मात्र याच्या अगदीं उलट स्थिति चालू होती. पोलंडमधील सरदारांना आपण व्यापारधंद्यासारख्या कामात पडणें हा कमीपणा आहे असें वाटत असे; आणि पोलंडमधील ह्या सरदारांखेरीज शेतकरी, कामकरी वगैरे लोकांचा जो दुसरा वर्ग, त्या वर्गाला ह्या सरदारांनीं अनेक वर्षें इतक्या अज्ञानाच्या व गुलामगिरीच्या स्थितीमध्यें ठेविलें होतें कीं, त्यांच्या अंगामध्यें गुलामगिरीशिवाय दुसऱ्या कोणत्याही कामाविषयीं लायकपणा उरलेला नव्हता. त्यामुळें व्यापारादिकाचीं मध्यम प्रतीचीं कामें करण्याला पोलंडमध्यें ज्यू लोकांचा एक मोठा थोरला परकीय वर्ग घुसला. पोलंड हा देश अगदीं सपाटीवर वसलेला आहे; आणि भूगोलाच्या दृष्टीनें पाहिलें असतां तो स्वतंत्र आणि उद्योगधंद्यांत श्रेष्ठ अशा स्थितींत राहण्यासारखा देश मुळींच नाहीं, हें कोणाच्याही लक्षांत येईल. समुद्रकिनारा जवळ असल्यावांचून कोणत्याही ठिकाणचे लोक धाडशी आणि साहसी निपजत नाहींत. हा फायदा पोलंडला मुळींच नव्हता. शिवाय दुर्गम पर्वत व त्यांवरील दुर्भेद्य किल्ले, अशा प्रकारच्या संरक्षणाच्या स्वाभाविक सोयी येथून तेथून सगळ्या पोलंडमध्यें कोठेंही नाहींत. अशा अनेक कारणांनीं पोलंडचें राज्य मरणोन्मुख अवस्थेला येऊन पोंहोंचलेलें होतें. परंतु या सर्व कारणांत तेथील लोकांचे आपसांतील परस्पर द्वेष आणि त्यामुळें तिऱ्हाइतांची भर करण्याची इच्छा, हीं पोलंडच्या नाशाचीं अतिशय प्रबळ कारणें होतीं. ह्या कारणांनीं आपला देश लवकरच लयाला जाईल, अशीं चिन्हें सोबिस्की हा राजा होता तेव्हांपासूनच स्पष्ट दिसूं लागलीं होतीं. ह्या स्थितीसंबंधानें सोबिस्की यानें आपल्या देशबांधवांना उद्देशून केलेलें भाषण अत्यंत हृदयद्रावक आहे. सोबिस्कीचे शब्द येणेंप्रमाणें आहेतः—" आपलें आणि आपल्या राष्ट्राचें पुढें काय होणार याबद्दलचे विचार मनांत आले असतां सर्व जग आश्चर्यानें थक्क होऊन जाईल. कसें तरी करून आपलें संरक्षण केलें पाहिजे ही बुद्धि परमेश्वरानें प्रत्येक प्राण्याला दिलेली आहे, आणि तो प्राणी कितीही क्षुद्र असला तरी स्वसंरक्षणाचें कांहीं तरी साधन परमेश्वरानें त्याच्या हातामध्यें देऊन ठेविलेलें आहे. परंतु परमेश्वरानें आम्हांला

जीं संरक्षणाचीं साधनें दिलीं आहेत, तीं आम्ही मात्र आपल्या स्वतःच्याच विरुद्ध चालवीत आहों. कसें तरी करून स्वसंरक्षण केलें पाहिजे, ही जी सर्व-सामान्य अशी स्वाभाविक बुद्धि ती आमच्यामधून मात्र नष्ट झालेली आहे. ती बुद्धि कांहीं दैविक कोपानें नष्ट झालेली आहे असें नाहीं, तर आपला वेडेपणा, आपले मनोविकार आणि एकमेकांचें नुकसान करावें ही प्रबळ इच्छा, ह्यांच्या योगानें ती नष्ट झाली आहे. वैभवाच्या आणि पराक्रमाच्या शिखराला जाऊन पोंहोचलेला आपला देश निरंतरचा नाश पावला असें पाहून आपल्या भावी पिढ्यांना कितीतरी दुःख होईल! तुमचा देश तुमच्या शत्रूपासून बचावणें फार सोपें, परंतु तो तुमचा तुमच्यापासून कसा बचावावा हें समजणेंच फार कठीण झालें आहे!" सोबिस्कीनें हे शब्द उच्चारून शंभर वर्षें लोटलीं नाहींत तोंच, पोलंडच्या विनाशस्थितीचें उग्र स्वरूप दिसूं लागलें. सोबिस्कीबरोबर पोलंडचें शौर्य आणि शहाणपण लयाला गेलें. राज्यांत निरनिराळे पक्ष उत्पन्न झाले, व एका पक्षांत दुसऱ्या पक्षाचा स्वतः पाडाव करण्याचें सामर्थ्य उरलेलें नसल्यामुळें त्यांनीं आसपासच्या कोणातरी परकीय लोकांचें सैन्य आपल्या मदतीला बोलवावें आणि त्या योगानें परकीयां-कडून आपल्या जातभाईवर सूड उगवून घ्यावा, असा विलक्षण क्रम सुरू झाला. परकीय लोकांना पोलंडमध्यें हात घालण्याला जी संधि पाहिजे होती, ती त्यांनाही अशा रीतीनें अनायासानेंच मिळाली. तेव्हां त्यांनीं पोलंडमध्यें येऊन तेथील लोकांत जास्तच गृहकलह माजवून दिले, व अशा युक्त्यांनीं आसपासचे राजे पोलंडमध्यें कर्तुमकर्तुमन्यथाकर्तुम् समर्थ झाले. पोलंडमधील दोन पक्षांच्या लोकांत नेहमीं लढाया होऊं लागल्याः परंतु त्या लढायांत नेहमीं सैन्यें मात्र परकीय राजांचीं! त्यामुळें त्या लढायांचा कांहीं निकाल झाला, तरी अखेरीस पोलंडचें नुकसान आणि परकीय लोकांना राज्यप्राप्ति हे परिणाम ठरलेलेच होते. एका सरदारानें सॅक्सन लोकांची मदत घेतली, तर दुसरे सरदार स्वीडनमधून सैन्य आणीत. कोणी रशियन लोकांना मदतीला बोला-वलें, तर त्यांची खोड मोडण्याकरितां दुसरा पक्ष उठे आणि ऑस्ट्रियाच्या बादशहाकडे मदत मागण्याकरितां जाई. अशा रीतीनें आजूबाजूचे सर्व परकीय लोक पोलंडमध्यें भरले. ह्या लोकांच्या मदतीनें सुरू झालेल्या लढाया कांहीं दिवसपर्यंत चालू होत्या. परंतु पुढें पोलंडच्या लोकांमध्यें तेंही त्राण उरलें

नाहीं. पुढें पुढें लढायांना तरवारींची मुळींच गरज लागेनाशी झाली. लढाईतील जयापजयाचे सौदे पैशावर ठरूं लागले; इतके पोलंडमधील लोक स्वहितविघातक, विश्वासघातकी आणि हतवीर्य बनून गेले ! राज्यांतील खजिना संपून गेला. सैन्याची शिस्त बिघडली. मुलकी अधिकार कोणाच्याच हातात उरला नाहीं. आपसांतील द्वेषांचा कळस झाला. परकीय लोकांचें बिऱ्हाड घरामध्यें कायमचें बसलें. पोलंड हें अठराव्या शतकाच्या अखेरीस शुद्ध दुसरें हिंदुस्थान बनलें ! शेवटीं १७९२ मध्यें राशिया आणि ऑस्ट्रिया यांनीं पोलंडची पहिली वांटणी केली. एवढें मोठें राज्य या दोन राष्ट्रांनीं वांटून घेतलें, परंतु त्याच्यासाठीं त्यांना पोलंडमधील लोकांपाशीं एकसुद्धां लढाई करावी लागली नाहीं; इतका घरभेदेपणाचा अलौकिक आणि अप्रतिम महिमा आहे ! ह्यानंतर आणखी कांहीं दिवसांनीं पोलंडची दुसरी वांटणी झाली. त्यामध्यें रशिया आणि प्रशिया हे हक्कदार होते ! पोलंड आधींच निःसत्त्व झालेला देश होता. त्या देशांत या दोन राष्ट्रांनीं आपलीं सैन्यें नेऊन उभीं केलीं आणि बाकी उरलेला भाग आपआपल्या ताब्यांत घेतला. याच्यापेक्षां जास्त न्यायीपणा किंवा परिश्रम यांची त्यांना मुळींच जरूर पडली नाहीं !

पोलंड देश जरी खालावत चालला होता, जरी तेथें आपसांतील द्वेष आणि कलह अत्यंत माजले होते, आणि जरी परकीय लोकांनीं त्या देशाची वाट लावून टाकिली होती, तरी नष्ट झालेल्या स्वातंत्र्याबद्दल ज्यांना हळहळ वाटत आहे अशीं अंतःकरणें पोलंडमध्यें बिलकुल नव्हतीं असें नाहीं. कोणताही देश कितीही खालावला, तरी जेथें पाऊस पडत आहे आणि सूर्य प्रकाशत आहे, तेथें स्वातंत्र्याच्या तळमळीचें बीं उगवल्यावांचून कधींही राहावयाचें नाहीं. पोलंडमधील लोकांना आपल्या देशाच्या स्वातंत्र्याबद्दल हळहळ वाटणें अगदीं स्वाभाविक होतें, आणि याच संधीला फ्रान्स देशामध्यें राज्यक्रांतीची चळवळ उडाली होती. त्यामुळें या देशांतील लोकांना आपलें स्वातंत्र्य परत मिळविण्याची खटपट करण्याला विशेषच स्फूर्ति आली. फ्रान्समधील राज्यक्रांति म्हणजे सर्व ठिकाणच्या जुलमी राजांना 'तुम्ही आपले जुलूम थांबवा' अशी एक जाहीर नोटीसच होती, व त्यांच्या जुलमाखालीं पिरडणाऱ्या लोकांना 'तुम्ही स्वतंत्र व्हा' अशी ती एक दवंडीच होती. ही दवंडी कानावर पडल्याबरोबर ताजे गुलाम बनलेले पोलंडमधील लोक आपल्या

देशाच्या उन्नतीच्या उद्योगाला लागले. आपल्या देशाच्या स्वतंत्रतेप्रीत्यर्थ ते वाटेल तें करण्याला आणि वाटतील ते आपले जुने हक्क सोडून देण्याला तयार झाले. त्यांनीं कायमच्या राजाचा परिपाठ सुरू केला. सरदार लोकांनीं आपलें वर्चस्व टाकून दिलें, आणि इतके दिवसपर्यंत खालच्या दर्जाचे म्हणून जे लोक वागविले जात असत त्यांच्याशीं ते बरोबरीनें वागण्याला तयार झाले. देशाच्या अंतर्व्यवस्थेंत सुधारणा करण्याकरितां आणि भावी स्वतंत्रता मिळविण्याकरितां जेवढें कांहीं अवश्य पाहिजे होतें तेवढें सर्व त्यांनीं केलें, व अखेरीस वॉरसा येथील देशभक्त मंडळींनीं पोलंड स्वतंत्र करण्याचा प्रयत्न करण्याविषयीं निश्चय केला. त्यानीं कोशिअस्को याला आपला पुढारी नेमलें. हा पोलंडमधील एक अतिशय शूर देशभक्त होता. याचें शिक्षण बहुतेक फ्रान्स देशामध्येंच झालेलें होतें. स्वदेशाच्या स्वतंत्रतेबद्दलची याची कळकळ फार विलक्षण होती. याला एकंदरींतच स्वतंत्रतेच्या लढायांची फार हौस असे. अमेरिका स्वतंत्र होऊं लागली त्या वेळीं, फ्रान्समधून जे कित्येक धाडशी लोक तिकडे गेले त्यांमध्यें कोशिअस्को हा होता. अमेरिकेमध्यें जॉर्ज वॉशिंग्टन याला याच्यापासून फार मदत झाली. १७९४ मध्यें त्याच्या देशबांधवांनीं त्याला पोलंडच्या सैन्याचें आधिपत्य स्वीकारण्याला बोलाविलें, त्या वेळीं त्यानें तें काम मोठ्या आनंदानें पत्करलें. परंतु त्याला जयाची खात्री नव्हती. लोकांचीं मनें क्षुब्ध होऊन गेलेलीं होतीं खरीं; व एकंदर राष्ट्रामध्यें स्वतंत्रतेबद्दल अतिशय उत्सुकता उत्पन्न झालेली होती हेंही खरें. परंतु रशिया, प्रशिया वगैरे शत्रु फार बलाढ्य असून त्याला प्रतिबंध करण्याला जरूर लागणारें सामर्थ्य पोलंडमध्यें त्या वेळीं नव्हतें. तरी पण तेथील लोक स्वतंत्रतेसाठीं इतके उत्कंठित होऊन गेलेले होते कीं, त्यांना थांबा म्हणून म्हणण्याची बिलकुल सोय नव्हती. कित्येक पलटणी आधींच बंड करून उठल्या होत्या, व सर्व लोक फक्त कोशिअस्कोची वाट पाहण्याकरितां थांबले होते. अशा वेळीं आता मागें पुढें पाहून उपयोगी नाहीं असें जाणून कोशिअस्को क्रॅको या शहरीं येऊन दाखल झाला, व तेथील तटाचे दरवाजे बंद करून त्यानें १७९४ च्या मार्च महिन्याच्या ३ ऱ्या तारखेला पोलंडच्या स्वतंत्रतेचें निशाण उभारलें. त्या वेळीं त्या निशाणाच्या भोंवतीं जें सैन्य जमा झालें त्यांत पलटणींतून बंड करून निघालेले पुष्कळ शिपाई होते, व बाकीचे सर्व

पोलंडमधील शेतकरी होते. या शेतकऱ्यांच्या पाशीं त्यांच्या शेतकीच्या कामाला उपयोगीं पडणाऱ्या हत्यारांशिवाय दुसरीं कांहींएक हत्यारें नव्हतीं. त्यांच्या अंतःकरणामध्यें मात्र स्वदेशभक्तीचें अत्यंत तीक्ष्ण आणि प्रखर असें हत्यार होतें. अशा प्रकारचें कोशिअस्कोभोंवतीं पांच हजार सैन्य गोळा झालें. ह्या सैन्याच्या मदतीनें त्यानें एका बऱ्याच मोठ्या रशियन सैन्याचा पराभव केला. या वेळीं रशियाचे पुष्कळ लोक रणांगणावर कापले गेले व कोशिअस्कोच्या शेतकऱ्यांनीं आपल्या हातांतील विळे व कोयते टाकून देऊन त्या रशियन शिपायांच्या हातांतलि तरवारी घेतल्या. प्रथमतःच हा विजय मिळाल्यानें पोलंडमधील क्रांतिकारक लोकांना विशेष उमेद आली, व ही स्वतंत्रतेची आग सगळ्या प्रांतांतून पसरली, तेव्हां पोलंडमधील जे कोणी लोक अजून मागें राहिले होते ते सर्व या क्रांतीमध्यें येऊन सामील झाले. यानंतर पहिला अतिशय मोठा दंगा वॉरसा येथें सुरू झाला. एप्रिलच्या १७, व्या तारखेला ह्या सर्व क्रांतिकारक लोकांनीं वॉरसा येथील गव्हर्नराच्या घरावर आणि दारूगोळ्याच्या खजिन्यावर हल्ला केला. रशियन आणि प्रशियन लोकांचें सैन्य एकंदर सात हजार होतें, व उभयपक्षांमध्यें छत्तीस तास लढाई चालली होती. परंतु अखेरीस पोलिश लोकांचा जय होऊन वॉरसाच्या तटावर स्वतंत्रतेचें निशाण रोंवण्यांत आलें. ह्या वेळीं रशियाच्या सैन्यामध्यें पोलंडमधील सुमारें सोळा हजार लोक नोकरीला होते. या लोकांची रशियाला फार भीति होती. यांचे स्वदेशबांधव स्वदेशाच्या स्वतंत्रतेसाठीं लढण्याला उद्युक्त झाले आहेत, अशा वेळीं हे आपल्या बाजूनें न लढतां आपल्या देशबांधवांना जाऊन मिळतील आणि रशियाचीं हत्यारें घेऊन पोलंडची स्वतंत्रता मिळविण्याकरितां त्यांना मदत करतील, अशी रशियाला त्या वेळीं मोठी दहशत पडलेली होती. ज्या कोशिअस्कोच्या हाताखालील शेतकऱ्यांनीं रशियन शिपायांना मारून त्यांच्या हातांतील हत्यारें घेतलीं त्यांच्या लक्षांत हे आपले बारा हजार हत्यारबंद स्वदेबांधव आधींच कसे आले नाहींत हा पुष्कळ इतिहासकारांना एक मोठा प्रश्न आहे. या लोकांना वश करून घेण्याची कोशिअस्कोनें आधींच तजवीज करून ठेविली असती तर पोलंडच्या इतिहासाचें भावी स्वरूप कितीतरी बदलून गेलें असतें! परंतु दुर्दैवानें तसें झालें नाहीं. ही रशियाची भीति कोशिअस्कोच्या ध्यानांत येण्याच्या आधीं हा

कोशिअस्कोचा फायदा रशियाच्या ध्यानात आला. आणि त्यामुळें राज्यक्रांतीचें पारडें एकदम फिरून गेलें. ह्या बारा हजार पोलिश लोकांच्या सर्व पलटणींच्या हातून एकदम शस्त्रें घेण्याचा हुकूम रशियानें सोडला, व त्याबरोबर एकापाठीमागून एक अशा त्या सर्व पलटणींनीं आपलीं हत्यारें खालीं ठेविलीं. हें नुकसान झालें तरी पोलंडमधील राज्यक्रांतिकारक मंडळीचें धैर्य खचलें नाहीं. त्यांनीं तात्पुरती राज्याची व्यवस्था लावणारी एक मंडळी नेमली, आणि चाळीस हजार सैन्य तयार केलें. ह्या सैन्यांतील प्रत्येक इसमाच्या मनामध्यें स्वदेशभक्ति परिपूर्णपणें बाणलेली होती, व आपला देश स्वतंत्र व्हावा ही प्रत्येकाची दृढ इच्छा होती. तरी पण शत्रूच्या शिकलेल्या सैन्यापुढें या लोकांना टिकाव धरण्याला फार अडचण पडूं लागली. ज्या लोकांनीं आजपर्यंत कोणतींच कामें केलेलीं नव्हतीं त्यांच्या मनांत जरी उत्कट इच्छा होती तरी त्यांचा प्रसंगीं फारसा उपयोग होईना. देशांत व्यापार नव्हता, कारखाने नव्हते किंवा जेथें देवघेवीच्या मोठमोठ्या घडामोडी होत आहेत अशा प्रकारचीं बंदरेंही नव्हतीं. देशामध्यें पैशाची तूट पडली, व परदेशांशीं व्यापार वगैरे कांहीं एक नसल्यामुळें त्या देशांतूनही पोलंडला पैसा मिळणें शक्य नव्हतें. एवढ्या चाळीस हजार शिपायांच्या सैन्याचा बंदोबस्त ठेवण्याला पुष्कळ ऑफिसर लोक जरूर होते. परंतु ते सुद्धां पोलंडमध्यें मिळणें शक्य नव्हतें; इतकी तेथील लोकांची पूर्वीची शिस्त बिघडून गेलेली होती. त्या लोकांत नुसतें शौर्य होतें. परंतु रशिया, ऑस्ट्रिया आणि प्रशिया यांच्या नवीन तऱ्हेच्या तोफांपुढें त्यांच्या नुसत्या हाताच्या शौर्याचा कांहीं एक उपयोग नव्हता. अशा प्रसंगीं लष्करी खात्यामध्यें वाढलेले आणि नवीन तऱ्हेच्या सर्व शास्त्रांची माहिती असलेलेच लोक पाहिजे असतात. परंतु तसल्या जातीचा व्यासंग पोलंडमधील लोकांनीं आजन्मांत कधीं केलेला नसल्यामुळें ते गुण त्यांच्या अंगीं आयत्या वेळीं कोठून उत्पन्न व्हावे ! अशा रीतीनें योग्य माणसांची वाण त्या वेळीं फार दिसून आली. पैशाची वाण तर नेहमींचीच होती. त्या वेळेपुरत्या स्थापना केलेल्या मंडळींनीं कागदाच्या नोटा काढून त्यांवर पैसे मिळविण्याचा यत्न केला होता. परंतु त्या नोटांची किंमत उत्तरोत्तर कमी होत जाऊन अखेरीस त्या कोणी घेईनाशे झाले. अशा स्थितीमध्येंही पोलंडमधील क्रांतिकारक मंडळीला एक जय मिळाला, व

त्यामध्यें शत्रूकडील बरेंच सामानसुमान त्यांच्या हातीं लागलें. ह्या जयामुळें जास्त आशा उत्पन्न होऊन त्या राज्यक्रांतिकारक मंडळीजवळ एकंदर ऐंशी हजार सैन्य जमा झालें. परंतु तेथून पुढें या सैन्याचे एका पाठीमागून एक पराभवच होऊं लागले. तेव्हां पोलिश लोकांचें सैन्य वॉरसा येथें परत आलें व शत्रूच्या सैन्यानें त्या शहराला वेढा घातला. वॉरसा ही फार बंदोबस्ताची जागा होती. तरी पण रशियन सैन्यानें अतिशय शिकस्त केली. तटाभोंवतीं खंदक होते ते भरून काढले आणि तटाच्या भिंती कोसळून खालीं पाडल्या. तसेंच तोफांच्या माऱ्यानें शहरांतील लांकडी घरांनीं पेट घेतला. अशी स्थिति झाल्यामुळें पोलिश सैन्य पळ काढूं लागलें. तेव्हां रशियन सेनापतीनें शहरांत शिरून लोकांची फार भयंकर कत्तल केली. दहा हजार शिपाई लढाईंत मरण पावले आणि नऊ हजार कैदी करण्यांत आले. परंतु ह्याशिवाय बायका, पुरुष, लहान मोठीं मुलें वगैरे मिळून सुमारें बारा हजार माणसें शत्रूच्या तरवारींनीं कापलीं गेलीं. तेथील नदीचें पाणी माणसांच्या रक्तानें लाल होऊन वाहूं लागलें. असा भयंकर प्रकार त्या वेळीं वॉरसा शहरामध्यें झाला व अखेरीस तें शहर शत्रूंच्या स्वाधीन झालें. पोलंड देश स्वतंत्र करण्यासाठीं हा वेळपर्यंत ज्यांचे प्रयत्न चालले होते, त्यांपैकीं जे लढाईंत मारले गेले नाहींत, असे सर्व देशभक्त लोक पोलंड सोडून बाहेर चालते झाले, आणि रशियन सैन्यानें नवंबर महिन्याच्या ६ व्या तारखेला वॉरसा शहरामध्यें प्रवेश केला. कोशिअस्कोला ह्या मोहिमेमध्यें बऱ्याच जखमा लागून तो शत्रूच्या हातीं सांपडला. त्यानंतर तो दोन वर्षेंपर्यंत सेंटपिटर्सबर्ग येथें कैदेमध्यें होता. परंतु पॉल ह्या बादशहानें त्याला बंधमुक्त केलें. बंधमुक्त करतेवेळीं बादशहानें त्याची तरवार त्याला देण्याकरितां त्याचे पुढें केली. त्या वेळचे कोशिअस्कोचे उद्गार फार हृदयद्रावक आहेत. कोशिअस्को ज्या वेळीं लढत होता त्या वेळची स्थिति आणि त्यानंतर दोन वर्षांनीं प्राप्त झालेली स्थिति यांत पुष्कळ अंतर पडलें होतें. त्या वेळीं पोलंड स्वतंत्र होईल, अशी थोडीबहुत तरी आशा होती. परंतु या वेळीं पोलंड देशच जाग्यावर नव्हता. तो नामशेष होऊन गेलेला होता. ही स्थिति लक्षांत आणून कोशिअस्को बादशहाला म्हणालाः " आतां ही तरवार मला काय करावयाची आहे ? ज्या देशाच्या स्वतंत्रतेसाठीं मीं ही तरवार हातांत घेतली होती, तो देशच जर

आतां नाहीं, तर मग आतां मी ही तरवार घेऊन काय करूं ? " हा पोलंड-मधील प्रसिद्ध देशभक्त १८१७ मध्यें मरण पावला. त्याच्या स्मरणार्थ त्याच्या उपकारबद्ध देशबांधवांनीं क्रॅको येथें एक दीडशें फूट उंचीचा बुरूज उभारला आहे. या बुरुजामध्यें विशेष हा आहे कीं, पोलंडच्या स्वतंत्रतेसाठीं ज्या ज्या रणांगणांवर लढाया झाल्या त्या त्या सर्व रणांगणांवरची माती आणून लोकांनीं कोशिअस्कोच्या स्मरणार्थ आणि सन्मानार्थ हा बुरूज उभारला आहे. वॉरसा शत्रूच्या स्वाधीन झाल्यानंतर कोशिअस्कोचे जे अनुयायी होते त्यांना आपला देश रशियाच्या अमलाखालीं गेला असतां त्या देशांत राहणें बिलकुल रुचलें नाहीं. ते पोलंडमधून निघून फ्रान्स, स्पेन, इटली वगैरे देशांतील पलटणींतून चाकरीला राहिले, व तेथें त्यांनीं मोठमोठीं पराक्रमाचीं कामें करून शौर्याबद्दल चांगला लौकिक संपादन केला. परंतु दुर्दैवाची गोष्ट ही कीं, ज्यांचें शौर्य दुसऱ्या देशांत कामीं यावें त्यांचें तें शौर्य स्वतःच्या देशाला स्वतंत्रता देण्याला उपयोगीं पडूं नये असें त्यांच्या कपाळीं लिहिलेलें होतें !

एका सुपारीचीं तीन खांडें व्हावीं आणि तीं तीन तिघांच्या पोटांत जावीं तशा प्रकारची हल्लीं पोलंडची स्थिति झालेली आहे. ऑस्ट्रिया, प्रशिया आणि रशिया या तिघांनीं तीन तुकडे करून सर्व पोलंड गिळून टाकलें आहे. तिघांच्या पोटांत गेलेलीं सुपारीचीं तीन खांडें बाहेर पडून तीं एकत्र होऊन त्यांची सबंध सुपारी बनावी हें जितकें अशक्य आहे, तितकाच पोलंडचा पुनरुद्धार अशक्य आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. तरीही पण पोलंडमधील लोक आपल्या देशाच्या स्वतंत्रतेची आशा करीतच आहेत. इतका ज्यांचा देश नष्टप्राय झालेला आहे तेही त्या देशाच्या स्वातंत्र्याची वाट पहात आहेत, यावरून स्वातंत्र्य ही एक अजब चीज आहे, व ती मनुष्यांच्या मनांमध्यें अनेक भावी आशा उत्पन्न करून त्यांच्या हातून ती अनेक अलौकिक चमत्कार घडवून आणिते, असें म्हणण्यास हरकत नाहीं. जर्मनी, प्रशिया आणि रशिया यांचे एकसारखे अनेक जुलूम चालूं असतांही त्यांतूनसुद्धां आपण डोकें वर काढूं आणि आपला देश स्वतंत्र करूं अशी ज्या पोलिश लोकांना आज मितीला आशा वाटत आहे, ते खरोखर धन्य होत. आणि त्यांचा दृढनिश्चय व दूरदृष्टि हीं देखील वर्णनीय होत. हल्लीं ते लोक गुलामगिरींत आहेत. परंतु ही स्थिति म्हणजे एका दृष्टीनें जरी अत्यंत वाईट होय, तरी दुसऱ्या दृष्टीनें पाहतां

ही स्थिति म्हणजे स्वतंत्रतेकरितां एक प्रकारची उमेदवारीच आहे. आपलें मागील वैभव कां गेलें, आणि आपल्याला पुढें स्वतंत्रता मिळण्याकरितां काय केलें पाहिजे, हें शिकण्याची ही एक शाळा आहे. स्वतंत्रतेच्या प्राप्त्यर्थ करावी लागणारी ही एक खडतर तपश्चर्याच होय. ही तपश्चर्या करतांना कित्येक उपासही काढावे लागतात व कित्येक वेळां थंडींत कुडकुडावें लागतें किंवा उन्हांत करपावें लागतें. अशा प्रकारच्या खडतर तपश्चर्येच्या गुलामगिरींतूनच स्वतंत्रतेची वाट निघते. गुलामगिरीच्या सरहद्दीला लागूनच स्वतंत्रतेचा प्रदेश आहे. जो प्रवासी या गुलामगिरीच्या निर्जल, निर्जन आणि तप्तवालुकामय अरण्यांतून काळजीपूर्वक रीतीनें वाट चालून जातो, त्याला त्याच्या प्रवासामध्यें पुढें स्वतंत्रतेचा रमणीय आणि आल्हादकारक प्रदेश लागल्यावांचून कधींही रहावयाचा नाहीं, हा सृष्टीचा एक नियमच आहे. आणि ह्याच नियमावर भिस्त ठेवून पोलंडमधील लोक स्वराज्याच्या प्रत्यागमनाची मार्गप्रतीक्षा करीत आहेत. पोलंडमध्यें हल्लीं राजकीय चळवळ करणाऱ्या लोकांचे मुख्य तीन पक्ष आहेत. त्यांपैकीं एक जो कान्झर्व्हेटिव्ह पक्ष आहे त्याचें असें म्हणणें आहे कीं, आम्हांला कांहीं थोड्या जास्त सवलती आणि थोडेसे जास्त हक्क मिळावे, म्हणजे मग आमच्यावर परकीय लोकांचें राज्य असलें तरी हरकत नाहीं, त्यांच्याशीं सुद्धां आम्ही राजनिष्ठेनें वागूं. दुसरा पक्ष नॅशनल डिमोक्रॅट्स या लोकांचा आहे. तेही थोडीबहुत सवलत मागत आहेत. परंतु त्यांचें मुख्य म्हणणें असें आहे कीं, आम्ही पोलंड देश केव्हां तरी स्वतंत्र करूं, ही आशा आम्ही कधींही सोडून देणार नाहीं व हा हेतु शेवटास नेण्याला बाध येणार नाहीं इतक्या बेतानें आम्ही परकीय अमलाखालीं राजनिष्ठेनें वागूं. ह्या दोहों-शिवाय पोलंडमध्यें तिसरा एक पक्ष आहे. हा राजकीय पक्ष आहे असें म्हणण्या-पेक्षां तो एक धार्मिक पंथ आहे असें म्हटल्यास जास्त सयुक्तिक होईल. तरी पण कसें तरी करून पोलंड स्वतंत्र झालेंच पाहिजे हा त्या पंथाचा अंतिम हेतु असल्यामुळें त्या धार्मिक पंथालाही राजकीय स्वरूप आलेलें आहे. हा पंथ धार्मिक आणि नैतिक वळणावर आहे, व धर्मानें आणि नीतीनें आपण सर्वांहून श्रेष्ठ झालों म्हणजे आपली स्वतंत्रता आपल्याजवळच आहे, असें या पंथाचें एक मत आहे. डा० ल्युटोलॉस्की या गृहस्थांनीं हा पंथ स्थापन केलेला आहे. हे एक मोठे तत्ववेत्ते आहेत. यांनीं पोलंडच्या स्वतंत्रतेसाठीं

ही जी उघड रीतीनें एक गुप्त मंडळी स्थापन केली आहे, त्यांतील पुरुष आणि स्त्रिया 'ब्रदर्स अँड सिस्टर्स' या नांवाखालीं मोडल्या जातात. ह्या गुप्त मंडळींत नवीन सभासद घ्यावयाचा झाला असतां त्यानें त्या वेळेपर्यंत केलेल्या सर्व पातकांचा उच्चार करून पश्चात्तापानें आपलें मन प्रक्षालित करून घेतलें पाहिजे असा पहिला नियम आहे. तसेंच मी जुगार खेळणार नाहीं, मी दारू पिणार नाहीं, मी विडी ओढणार नाहीं किंवा दुसरें कोणतेंही अनीतीचें कृत्य करणार नाहीं अशी त्याला शपथ घ्यावी लागते. अशा रीतीनें आपल्या लोकांची नैतिक सुधारणा झाली असतां जे आज आपले शत्रु आहेत, ते आपल्या लोकांच्या पायां पडूं लागतील आणि एकहि शस्त्रप्रहार न करतां पोलडची स्वतंत्रता पोलंडला परत मिळेल, अशी डा० ल्युटोलॉस्की यांची कल्पना आहे. या पंथामध्यें पोलंडमधील बहुतेक तरुण विद्यार्थी सामील झालेले आहेत. परंतु ते सर्व निमूटपणें आपापलीं कामें करीत असल्यामुळें त्यांची संख्या किती आहे, याचा अंदाज करणें कठीण झालेलें आहे. या गुप्त मंडळीच्या शाखा पोलंडमधील सर्व भागांतून पसरलेल्या आहेत. या कामीं आपल्याला परमेश्वरापासून स्फूर्ति होत असते, असें डा. ल्यूटोलॉस्की हे सांगत असतात; आणि त्यामुळें त्यांच्यावर पुष्कळांची स्वाभाविकपणें श्रद्धा बसते. ह्या कारणामुळें ह्या पंथाचा तिकडे फार फैलाव झालेला आहे. डा० ल्युटोस्लॉस्की यांचें मत नीतिशास्त्रामध्यें फार चांगलें शोभेल. परंतु दंडनीतीच्या अर्वाचीन शास्त्रामध्यें याला फारशी किंमत मिळेल असें दिसत नाहीं. जो नीतीच्या मार्गानें चालेल आणि पुण्याचरणानें साधुत्वाच्या पदवीला जाऊन पोहोंचेल त्याला परलोकीं पाहिजे तर स्वराज्य प्राप्त होईल, परंतु इहलोकीं स्वराज्य प्राप्त करून घेण्याला हा मार्ग फारसा उपयोगीं पडेल असें प्रस्तुत काळीं डोळ्यापुढें असलेल्या उदाहरणांवरून तरी कोणाला म्हणतां यावयाचें नाहीं. सतीच्या घरीं नाहीं बत्ती आणि शिंदळीच्या घरीं झुलतात हत्ती, अशासारखे हल्लींचे हे कलियुगांतील उरफाटे दिवस आहेत. ह्या दिवसांत निवळ साधुपणाचे विचार कांहीं कामाचे नाहींत. तरीपण दुसरे लोक अन्यायानें, कपटानें, लुच्चेगिरीनें आणि लबाडीनें राज्यप्राप्ति करून घेत असले, म्हणून त्यांच्याप्रमाणें आपण तींच पातकें करण्याला प्रवृत्त व्हावें, हें अगदीं अनुचित आहे. आणि स्वपदभ्रष्ट झालेल्या लोकांनीं जर कांहीं

महत्त्वाकांक्षा बाळगण्यासारखी असेल, तर आपण आपलें स्वराज्य न्यायानें आणि नीतीनें परत मिळवूं हीच बाळगिली पाहिजे व अशा दृष्टीनें पाहिलें असतां पोलंडमधील तिसरा पक्ष हाच सर्वांत पहिला पक्ष होय यांत शंका नाहीं.

---

# आमच्या जुन्या मशीनगन्स : १३

## अथवा प्राचीन अभ्युन्नति आणि अर्वाचीन शोध यांच्यामधील साम्य व भेद

काळ : अग्रलेख, ता. ६-१-१९०५

प्रस्तुत लेखामध्यें मशीनगन्स हें एक विशिष्ट उदाहरण घेऊन या उदाहरणावरून आपल्या प्राचीन लोकांची अभ्युन्नति आणि या अर्वाचीन पाश्चिमात्य लोकांचे शोध यांच्यामध्यें साम्य कोठवर आहे, आणि भेद कोठपासून सुरू होतो, याचें किंचित् विवेचन करण्याचें योजिलें आहे. ज्यांच्याबद्दल रामायण, महाभारत, आदिकरून ग्रंथांतून अलौकिक वर्णनें आढळतात, ते लोक अलौकिक साधनांवांचून इतक्या अभ्युन्नतीला पोंचले असतील असें संभवत नाहीं. बरें, हल्लींचे पाश्चिमात्य लोक ज्या यांत्रिक साधनांनीं अभ्युन्नतीला पोहोंचलेले आहेत, तीं साधनें त्या जुन्या लोकांपाशीं होतीं असेंही दिसत नाहीं. अशा स्थितीमध्यें एकच परिणाम उत्पन्न करणारीं दोन भिन्न भिन्न प्रकारचीं साधनें या दोन लोकांच्या हातांत असलीं पाहिजेत, असें अनुमान ओघानें प्राप्त होतें. ह्या

अनुमानाला आपल्या जुन्या ग्रंथांतील उल्लेखांवरून कितपत बळकटी मिळूं शकते याच्याबद्दल आपण पुढील चार ओळींत थोडेंसें परीक्षण करूं.

अर्वाचीन काळीं असे कांहीं नवीन शोध लागत आहेत, आणि विलक्षण युक्त्या निघत आहेत कीं, त्यांच्या योगानें मनुष्याचें मन अगदीं थक्क होऊन जातें. हल्लींचे शोध आणि हल्लींच्या युक्त्या ह्या अजब आहेत खऱ्या; व त्या ज्यांनीं प्रचारांत आणिल्या ते सर्वथैव स्तुतीला पात्र आहेत. परंतु हल्लींच्या शोधांनीं ज्या गोष्टी सिद्ध झाल्या आहेत किंवा होण्याचा संभव आहे, त्या गोष्टी पूर्वींचे लोक घडवून आणीत नसत असें नाहीं. हल्लींचे पाश्चिमात्य लोक जशीं आपलीं इष्ट कार्यें घडवून आणीत आहेत, त्याचप्रमाणें आपले पूर्वींचे लोकही आपापले इष्ट हेतु सफल करून घेत होते, यांत शंका नाहीं. मात्र दोघांचे मार्ग निरनिराळे. हल्लींचे लोक एका तासांत दहा किंवा वीस कोस जातात, म्हणून आपण मोठें आश्चर्य करितों. परंतु पूर्वींच्या लोकांना थोड्या वेळांत दूरवर स्थलांतर करतां येत नव्हतें असें नाहीं. तारायंत्र किंवा तारेवांचून तारायंत्र, हे अलीकडील शोध वर्णनीय आहेत, यांत शंका नाहीं. परंतु पूर्वींच्या लोकांना हीं यंत्रें माहीत नव्हतीं, म्हणून एका ठिकाणच्या मनुष्याला दुसऱ्या ठिकाणच्या मनुष्याचा वृत्तांत अतिशय थोड्या वेळामध्यें कळत नव्हता असें नाहीं. परंतु त्यांचा मार्ग मात्र निराळा असे. आतां असल्या गोष्टींबद्दलचे हल्लींचे मार्ग आणि पूर्वींचे मार्ग यांचें पृथक्करण करून पाहिलें, तर आपल्याला असें आढळून येईल कीं, हल्लींचे मार्ग हे भौतिक आहेत आणि पूर्वींचे मार्ग हे मानसिक होते. पाणी, वारा, वाफ, वीज, वगैरे जीं या सृष्टींतील जड भूतें त्यांच्या गुणधर्मांचें फार सूक्ष्म रीतीनें परिशीलन करून हल्लींच्या पाश्चिमात्य लोकांनीं त्यांच्यावर पूर्ण विजय मिळविला आहे, त्यांना आपले बंदे गुलाम करून ठेविलें आहे, आणि त्यांच्यापासून आपल्याला वाटतील तीं कामें ते करून घेत आहेत. पुराणांतरीं रावणादिक दैत्यांच्या आणि राक्षसांच्या वैभवाच्या वर्णनांत असें आढळतें कीं, त्यांच्या घरीं वायु केर काढीत होता, आणि सूर्य मशालजीचें काम करीत असे. हें रावणादिकांच्या वेळचें जें वर्णन आपण काल्पनिक म्हणून मानतों तें हल्लींच्या स्थितींत अगदीं अक्षरशः खरें झालें आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं. परंतु हें सर्व या पंचमहाभूतांवरील सत्तेचें फळ होय. अर्वाचीन

लोकांनीं या महाभूतांचे गुणधर्म शोधून काढण्यांतच आपलें सामर्थ्य खर्च केलेलें आहे. परंतु आपल्या पूर्वींच्या लोकांनीं आपलें सर्व लक्ष मनाचें गुण-धर्म शोधून काढण्याकडे लाविलें होतें. आणि त्या शास्त्राच्या अभ्यासानें मनाचें सामर्थ्य त्यांना कळून चुकलेलें असल्यामुळें त्या सामर्थ्याच्या जोरावर हल्लींच्यापेक्षां शतपटीनें अधिक आश्चर्यकारक अशीं कृत्यें पूर्वींचे लोक करूं शकत असत. हल्लीं पदार्थविज्ञानशास्त्राचें प्राबल्य माजलेलें आहे. परंतु पूर्वींच्या लोकांचें योग हें पदार्थविज्ञानशास्त्र होतें. पदार्थविज्ञानशास्त्र आणि अशाच प्रकारचीं आधिभौतिक सृष्टीशीं व्यवहार ठेवणारीं इतर अर्वाचीन शास्त्रें हीं खालच्या प्रतीचीं होत; पण योगशास्त्र हें त्यांच्या वरच्या पायरीचें आहे. पदार्थविज्ञानादिक हीं ईश्वरापासून अतिशय दूरचीं शास्त्रें होत; पण योगशास्त्र हें परमेश्वराच्या अगदीं जवळचें शास्त्र होय. परमेश्वराला एखादी गोष्ट करावयाची असली तर तो लोखंडाच्या रुळावर पोलादाचीं चाकें गरगर फिरवीत बसत नाहीं. त्यानें नुसतें मनांत आणिलें म्हणजे त्याचीं कामें सफळ होतात; आणि हेंच तत्त्व योगशास्त्रामध्यें अनुस्यूत आहे; आणि म्हणूनच तें शास्त्र ईश्वराच्या अधिक जवळचें होय. आपल्या पूर्वींच्या लोकांनीं या शास्त्राचा दीर्घ व्यासंग केलेला होता. हें शास्त्र फार व्यापक आहे. हें एक शास्त्र शिकलें म्हणजे त्यामध्यें सर्व शास्त्रांचें फळ आलें. ज्याला आगगाडी करतां येईल त्यालाच निराळा अभ्यास केल्याशिवाय मार्कोनीनें नवीन काढलेल्या तारायंत्राचें काम येईल असें नाहीं. परंतु योगाच्या द्वारानें ज्याच्या मनामध्यें सामर्थ्य उत्पन्न झालें, तो त्वरित स्थलांतरही करूं शकेल आणि दूरची बातमीही थोड्या वेळांत जाणूं शकेल. अशा दृष्टीनें पाहिलें असतां योगशास्त्र हें किती व्यापक आहे याची कोणालाही कल्पना येईल. अशा दिव्य शास्त्राचें साधन आपल्या हातांमध्यें असतां आपण दीनवाण्यासारखे होतों, आणि अमक्यानें अमुक युक्ति काढली म्हणून आश्चर्यानें चकित होऊन जाऊन स्वतःबद्दल विलाप करीत बसतों, ही मोठ्या आश्चर्याची गोष्ट आहे. पूर्वींचे लोक ह्या योगशास्त्राच्या जोरावर मोठे झाले. हें योगशास्त्र एक असामान्य शास्त्र असल्यामुळें यामध्यें सर्व कांहीं गोष्टींचा समावेश होतो. पूर्वीं वेदांत आगगाडी आहे किंवा नाहीं असा एक थट्टेचा प्रश्न विचारण्याचा परिपाठ आहे. परंतु वेदांत फक्त आगगाडीच आहे असें नसून त्यांत सर्व

कांहीं आहे. आगगाडी म्हणजे हल्लीं आपण एखाद्या रेल्वेस्टेशनवर जी पाहतों तीच नसून आगगाडी म्हणजे त्वरित स्थलांतर करण्याचें कांहीं तरी एक विशिष्ट साधन असा सरळ अर्थ घेतल्यास वेदकालींसुद्धां जे लोक योगसाधन करीत असत त्यांच्यापाशीं आगगाडी होती, असें म्हणण्यास कांहीं एक हरकत नाहीं. अशाच दृष्टीनें पाहिलें असता आपल्यामध्यें पूर्वीं आगगाड्यांप्रमाणें मशीनगन्स सुद्धां होत्या. हल्लींच्या मशीनगन्सना जसें एखादें चाक असतें आणि त्या योगानें अनेक तोट्यांमधून एकदम ज्याप्रमाणें भराभर काडतुसें शिरतात, तशीच पूर्वींच्या मशीनगन्सची यांत्रिक रचना नव्हती; तरी पण अनेक लोकांचा एकदम संहार करावयाचा, हें जें कार्य हल्लींच्या मशीनगन्स करीत आहेत, तें कार्य पूर्वींच्या मशीनगन्सही घडवून आणीत असत. दुष्ट जनांच्या संहारासाठीं त्या जुन्या मशीनगन्सची योजना केलेली होती व पवित्र, तेजस्वी आणि तपस्वी असे ब्राह्मण त्या तोफांचे गोलंदाज होते. अशा अद्भुत प्रकारच्या ज्या ह्या आपल्या मशीनगन्स त्यांच्यावर हल्लीं धूळ पडून त्या अगदीं गंजून गेल्या आहेत. वेदांमध्यें—आणि विशेषत: अथर्ववेदामध्यें—अनेक प्रकारचे मंत्र सांगितलेले आहेत. त्या मंत्रांचीं पुरश्चरणें करून ते मंत्र सिद्ध केल्यास त्यांच्यापासून इष्ट हेतु सफळ होतात. परंतु ते मंत्र अनेक असल्यामुळें तूर्त फक्त रुद्रांतील कित्येक मंत्रांच्या पुरश्चरणांचींच फळें येथें देण्यांत येत आहेत. म्हणजे त्यांवरून त्या मंत्रांना ' आमच्या जुन्या मशीन-गन्स ' हें नांव किती सयुक्तिकपणें लागू पडतें, हें कोणाच्याही लक्षांत येईल.

रुद्राच्या पहिल्या अनुवाकांतील १०, ११ आणि १२ या तीन ऋचांचें पुरश्चरण केलें असतां ' युद्धोपनीताः शत्रवो हीयन्ते ' म्हणजे युद्धाला पुढें उभे राहिलेले शत्रु नाश पावतात, असें फळ सांगितलेलें आहे. त्याचप्रमाणें त्याच अनुवाकांतील १३, १४ व १५ या ऋचांमध्येंही मशीनगन्सप्रमाणें अद्भुत सामर्थ्य आहे, हें पुढील उताऱ्यावरून दिसून येईल.

एताभिरपि सङ्ग्रामकाले तैलमेकादशप्रदीपसहस्रार्हं द्रोण्यां प्राक्षिप्य तत्र देवमावाह्य लोकपालैः सहाराध्य स्पृष्ट्वा तैलं सप्त दिनानि प्रतिदिनमष्टसहस्रं जपेत् । तेन सिद्धतैलेन प्रदीपानेकादशसहस्रमारोप्य शत्रुराज्ये प्रत्यासन्ने राजानं विना सेनानीः पुरो गच्छेत् । दृष्ट्वा दीपज्वालां शत्रुसेना नावतिष्ठते । एतत्प्रभावादेव शत्रवो विनश्यन्ति । अन्यदापि एताभिरेवारातिनगरे सिद्धवेषधारिणो ब्राह्मणाः

शक्ता मन्त्रसिद्धाः शत्रोरभिचारं कुर्युः। राजा यदुपयुङ्क्ते वस्तु तदेताभिः स्पृष्ट्वा दृष्ट्वा च स्पर्शनदर्शनायोग्यं तन्मुखाच्छ्रुत्वा अभिचारोऽस्त्विति जपेयुः। मन्त्रान्तेऽन्यदपि शंकुं निधाय नगरचतुष्पथे देवालये देवारामे सालखातयोरन्यतरस्मिन्नपि नगराङ्गभूते सहस्राभिमंत्रितं खनेयुः। तन्नगरं शंभुकोपात्संवत्सरत्रयान्नश्यति व्याधिना।

या मंत्रांच्या पुरश्चरणाचें सामर्थ्य वरील उताऱ्यामध्यें असें सांगितलें आहे कीं, या मंत्रांनीं अभिमंत्रित अशा तेलानें प्रदीप्त केलेला उजेड शत्रुसेनेनें पाहिला म्हणजे ती सेना टिकाव धरून आपल्यापुढें उभीच राहूं शकणार नाहीं. तसेंच हे मंत्र ज्यांना सिद्ध झाले आहेत असे सिद्धवेषधारी ब्राह्मण शत्रूच्या राज्यामध्यें अभिचार करण्याकरितां पाठवावे. तेथें त्यांनीं मंत्राचा जप करून शत्रूच्या नगरामध्यें एकादा शंकू कोठें तरी पुरला तर तें नगर तीन वर्षांच्या आंत कांहीं तरी रोगराईनें उध्वस्त होऊन जातें.

रुद्राच्या दुसऱ्या समग्र अनुवाकाच्या पुरश्चरणाचें फळ येणेंप्रमाणें सांगितलें आहेः—शत्रूणां मारणकामो रक्तसर्षपांस्तैलाक्तानयुतं जुहुयाद्दतावृतौ तेन कर्मणा शत्रवो नश्यन्ति। युद्धे प्रत्यासन्ने देवस्योपरि मांजिष्ठं पटमारोप्य स्वयं शुद्धो भूत्वा दक्षिणहस्तांगुष्ठेन एतद्रुच्छत्यनुवाकान्ते वदन्नष्टसहस्रं पंचदिनानि जपेत्। शत्रूणां राजा स्थानाद्गच्छाति। यांतील भावार्थ असा आहे कीं, हें पुरश्चरण करून तांबड्या मोहऱ्या तेलांत भिजवून हवन केलें असतां शत्रु नाश पावतात. तसेंच मोहऱ्यांचें पीठ घेऊन तें महादेवाला लिंपून शत्रूचें नाव घेऊन आठ हजार जप करावा, म्हणजे शत्रूंना भयंकर ताप येऊन ते नाश पावतात. तसेंच शत्रूंचा राजा ह्याच मंत्राच्या आणखी कांहीं जपानें स्वस्थानापासून भ्रष्ट होतो.

ह्या दुसऱ्या अनुवाकाप्रमाणेंच तिसऱ्या अनुवाकाच्या पुरश्चरणाचेंही फळ आहे. राजा चान्यतरस्य राष्ट्रस्य रोगबाहुल्यमिच्छन्नाम्नैव वाराहादिभिर्मांसैर्लक्षं होमः कार्यः। रिपुराष्ट्रं समुद्दिश्याभिचारं करोमि फट्स्वाहेति। एवं मांसहोमेन रिपुराष्ट्रं प्रजाश्च शुष्यन्ति। अथ वैकङ्कतसमिद्भी रक्तसूत्रवेष्टिताभिः शतसहस्रं होमः। अनेन शत्रोः महाज्वरो भवति। परराष्ट्रजनैरुपभोग्यं जलादिकं वस्तु स्पृष्ट्वा वीक्ष्य वा शतसहस्रं जपं कुर्यात्। यस्तद्वस्तूपयुङ्क्ते स संवत्सरान्नश्यति। श्मशानाग्नावर्कसमिद्भिः शतसंवत्सरं जुहुयात्। तेन शत्रुनगरं व्याधिना नश्यति। अर्कारण्यं भवति। अनेनैव चामुण्डालये दक्षिणाभिमुखो

भूत्वा माषतिलैस्तैलाक्तैरेकादशसहस्रं जुहुयात् । परराष्ट्रप्रजा च मसूरिकाभिर्बाध्यते । अनेनैवापरमुच्यते । पश्चिमद्वारे शंभोरालये देवस्य पादपीठे अग्निमपस्मारिणं स्पृष्ट्वा सप्तसहस्रं जपेत् । शत्रुराज्यं स्मृत्वा मन्त्रान्ते, 'प्रज्वल ज्वालापस्मारिन्' इति वदेत् । एतेन राजशत्रुरपस्मारी भवति । अनेनैव सर्वपदगं राजानं स्मृत्वा शुद्धतण्डुलकृतपिष्टैराहुतिमात्रैः शतसहस्रहोमेन राजयक्ष्मोत्पद्यते । तेनैव नश्यति ।

अलीकडे शोधून काढलेल्या मशीनगन्समध्यें जसे निरनिराळे प्रकार आहेत तशा आपल्या जुन्या मशीनगन्सही निरनिराळ्या प्रकारच्या आहेत. ही तिसऱ्या अनुवाकाची जी मशीनगन आहे, हिचे परिणाम असे आहेत कीं, हिच्या योगानें शत्रूचें राष्ट्र आणि त्यांतील प्रजा या रोगानें शुष्क होऊन जातात, व शत्रूच्या अंगामध्यें महाज्वर उत्पन्न होतो. शत्रूच्या राष्ट्रांतील जलादिक ज्या उपभोग्य वस्तु त्यांना पाहून किंवा स्पर्श करून या मंत्राचा एक लक्ष जप केल्यास त्या वस्तु जो वापरतो तो एक वर्षांत नष्ट होतो. याच मंत्राच्या दुसऱ्या एका साधनानें शत्रूचें नगर व्याधीनें नष्ट होतें, व तेथें रुईचें रान उगवतें. ह्या मंत्रानें शत्रूच्या राज्यांत कांजिण्या, गोवर वगैरेच्या सांथी उत्पन्न करितां येतात व अपस्मार, क्षयरोग, वगैरेसारखे रोग उत्पन्न करितां येतात.

पांचव्या आणि सहाव्या अनुवाकांचींही फळें अशींच सांगण्यांत आलेलीं आहेत. तीं येणेंप्रमाणें:—एताभ्यां संग्रामे प्रत्यासन्ने राज्ञो महानसपक्वान्नेन सोपदंशेन भक्तेन दधिमधुघृताक्तेन प्रतिनमस्कारं एकादशकृत्वो हुत्वा शेषं बलिं भूमौ निधायादाय जलमिश्रं प्रतिसेनामभिप्रक्षिपेत् । सा सेनाचिरान्नष्टा भवति । एताभ्यामेव राज्ञः सर्वायुधानि स्पृष्ट्वा सहस्रमभिमन्त्रयेत् । तेषां तेजो वर्धते । एताभ्यामेव परसेनां प्रतिक्षिपेत् सा सेना चिरं नष्टा भवति । एताभ्यामेव परसेनास्तम्भ उच्यते । अर्कसमिद्भिरादित्यं प्रतिनमस्कारं शतसहस्रं जुहुयात् । परसेनास्तम्भं करोमि स्वाहा । एवं कृते शत्रुसेना स्तम्भिता भवति । एताभ्यामेव राज्ञः सर्वाणि भोज्यवस्तून्यभिमन्त्रयेत् । तान्यमृतानि भवन्ति ।

ह्या पांचव्या व सहाव्या अनुवाकाच्या मशीनगननें शत्रूची सेना तात्डतोब नष्ट करून टाकतां येते, किंवा शत्रूची सेना जागच्या जागीं स्तम्भित करतां येते. तसेंच आपल्या राजाचीं आयुधें या मंत्रानें अभिमंत्रित केलीं असतां त्यांचें तेज वाढतें, आणि राजाच्या भोजनाच्या वस्तु अभिमंत्रित केल्या

असतां त्या अमृताप्रमाणें होतात.

नवव्या अनुवाकामध्यें चौदावा मंत्र आहे. त्याच्या पुरश्चरणाचें फळ पुढें लिहिल्याप्रमाणें आहे—राजा शत्रुनाशकामोऽतिशक्तेन ब्राह्मणेन कारयेत् । शत्रुं राजानं महाखदिररूपिणं कृत्वा कस्मिंश्चिद्विविक्ते देशे जलपूर्णकुंभे देवतामावाह्य तत्संनिधावग्निमाधाय शमीसमिद्भिः सकंटकाभिः रुधिराक्ताभिः शतसहस्रं जुहुयात् । रुधिरं च बैलाडं प्रशस्तं भवति । ततस्तद्रूपं प्रत्यंगं लोहशंङ्कुभिः प्रतिनमस्कारं खानयित्वा तदुपरि राजा स्वपादं विन्यसेत् । विन्यासकाले गुरुर्जपेत् । ततो राजा ब्राह्मणानां शतं भोजयेत् । ततो देव विसर्जयेत् । एवं कृते परराजा संवत्सरत्रयान्नष्टो भवति । अन्यच्च तदेव रूपं सशृंखलं कृत्वा पूर्ववद्धोमः । ततो राजाऽचिराच्छृंखली राजवश्यत्वं व्रजेत् । अन्यदपि वक्ष्यते । शत्रुराजनगरे कृत्रिमवेषधारिणो राजपुरुषाः सब्राह्मणाः सिद्धाः प्रविश्य चतुष्पथेषु देवालयेषु राजसभासु राजद्वारे च लोहशङ्कूनपि तान्शतसहस्राभिमन्त्रितान्कृत्वा गुप्ता न्यसेयुः । ततो भस्माभिमन्त्रितं सर्वतो विकिरेयुः । जलमपि विकिरेयुः । एवं कृते तत्पुरमासंवत्सरत्रयान्नष्टं भवति । तत्र खादिरबदर्यादयो वनस्पतयो रोहन्ति । ततो विकृतवेषाः । परराजपुरजलाशयेषु कण्ठप्रमाणे जले तपः कुर्वन्तः सूर्याभिमुखाः अष्टशतदिनानि प्रतिदिनमष्टशतगुणं जपेयुः । जपकाले भगवते हालाहलमेव कराभ्यामभिमन्त्रयेयुः । एवं कृते तज्जलपायिनो वाहनादयो विषदष्टा इव नश्यन्ति ।

ह्या मंत्राच्या मशीनगनमध्यें जगाचीं काडतुसें भरलीं असतां या तोफेचा प्रभाव असा आहे कीं, वर सांगितल्याप्रमाणें कृति केल्यानें परशत्रु तीन वर्षांमध्यें नष्ट होतो, व दुसरी एक वर सांगितलेली कृति केल्यास शत्रूचें नगरही तीन वर्षांच्या आंत उध्वस्त होऊन तेथें खैराचीं आणि बोरीचीं झाडें उगवतात, व या मंत्रानें शत्रूच्या नगरांतील पाणी अभिमंत्रित केल्यास जे हत्ती, घोडे तें पाणी पितात ते सर्व विषबाधेनें व्याकुळ होऊन आपले प्राण सोडतात.

दहाव्या अनुवाकामध्यें जी आठवी ऋचा आहे त्या ऋचेचें पुरश्चरण यथाविधि केलें असतां त्याचें पर्यवसान पुढीलप्रमाणें होतें. वैकङ्कतसमिधां विषतैलाक्तांना श्मशानाग्नौ लक्षं जुहुयात् । शत्रवो नश्यन्ति । शत्रुनामग्रहणं कृत्वा देवस्य संनिधौ भस्मपाणिरयुतं जपेत् । तस्य शत्रोर्महाज्वरो भवति । श्वेतासिद्धार्थैरयुतं जुहुयात् । शत्रोर्मसूरिका जायन्ते ताभिरेव म्रियते । शत्रोर्गृह-

क्षेत्रादिषु मंत्रैणानेनावटं खानयित्वा तत्र कलं रोमास्थिशर्करादिकं खातयेत् । तस्य शीघ्रं नाशो भवति । शत्रचा नाश, शत्रूला महाज्वर, देवी, गोवर वगैरेच्या सांथी इत्यादि कार्यें या मशीनगननें होत असल्याचें वरील उताऱ्यामध्यें सांगितलेलें आहे.

वर दिलेल्या ह्या दहाव्या अनुवाकामध्येंच एक अकरावी ऋचा आहे. हिच्या पुरश्चरणमध्यें कांहीं निराळयाच प्रकारचीं सामर्थ्यें असल्याचा उल्लेख आहे. तो येणेंप्रमाणें:—तर्वाञ्जेतुकामोऽपामार्गसमिधां कपिलाज्यसिक्तानां शतसहस्रमाहुतीर्जुहुयात् । एतेनैव वराहादयो वश्या भवन्ति । तिरश्चो जेतुकामो बिल्वसमिधां दधिमधुघृताक्तानां शतसहस्रमाहुतीर्जुहुयात् । अपो जेतुकामो जलस्य मध्ये आत्माग्निमाधाय कपिलेन पयसा शतसहस्रमाहुतीर्जुहुयात् । अद्भ्यो भयं न जायते । एवमन्यदपि यद्यज्जेतुकामो भवति तन्नामग्रहणं कृत्वा कापिलाज्येन शतसहस्रं जुहुयात् । तत्तत्सर्वं जयति । ह्या मशीनगनच्या साह्यानें सर्वांवर जय मिळवितां येतो. वराहादिक क्रूर पशूही वश होतात, मग इतरांची काय कथा? पक्षीही स्वाधीन होतात. या मंत्राच्या साधनानें पाण्यापासून भय उरत नाहीं, आणि जें जें जिंकावयाचें असेल त्याचें नांव घेऊन जप केला असतां तें सर्व जिंकलें जातें.

याप्रमाणें रुद्रांतील निरनिराळया मंत्रांचीं फळें आहेत. परंतु समग्र रुद्राच्या एकादशिनीचींही फळें अशाच प्रकारचीं अद्भुत सांगितलेलीं आहेत. शत्रुमारणकामः पूर्वोक्तविधिना मंत्रन्यासादि कृत्वा दिक्पालेभ्यो रक्तौदनबलीन्दत्वा ' स्तुहि श्रतम्– ' इत्यनेन षोडशोपचारान्कृत्वा रुद्रैकादशिनीमेकादशकृत्वो जपित्वा पुनः ' स्तुहि श्रुतम् '–इति सहस्रं जपेत्प्रत्यहम् । सप्तरात्रेण शत्रुविनाशो भवति । अथ कृत्यामुत्पादयितुकामो रक्तवाससा रक्तोष्णीषरक्त-माल्यानुलेपनैर्देवमर्चयेत् । श्मशानाङ्गणे लोहितशलाकाः प्रदेशमात्रा महा-तैलाक्ता लक्षं जुहुयात् । " उत्तिष्ठ रक्ताङ्गि रक्त नेत्रे रक्तकेशि " कन्यां तां क्षिप्रमेव रुधिरकुम्भेन पूर्णमांसमात्रेण तर्पयेत् । अन्यथा कर्तारमेव हिंसेत् । सा त्वरिता यंत्रिता वदति । " कं धर्षयामि वद वा ज्ञायते यदि त्रैलोक्यस्थितम-भ्युत्सादयिष्यामि " इति । तथा चैकैकस्य शरीरस्य ग्रामे नगरे गृहे च प्रयोगः । ' प्रमुञ्च धन्वन '–इति षड्भिरायुधमभिमंत्र्य संग्रामोपनीताः शत्रवः पलायन्ते । अभिमुखा नावतिष्ठन्ते । ' विकिरिद विलोहित–' इति यथा शत्रुभिरनेकपर्याय-

सुप्तशत्रुमुखे जुहुयत् । सर्वे विभग्नमनसो विमुखाः शलवश्च पलायन्ते । 'नमो हिरण्य-' इत्यनुवाकैः कटुतैलाक्तानां राजाभिशंकितानां सर्षपाञ्जुहुयात् चक्रमुत्सादयति। फट्कारेण देवस्योपरि मालामधोशिरामवलम्ब्य सशिरसा वस्त्रेण रुधिरमाप्लाव्य त्रिकटुकेनाभ्यज्य देवकराङ्गुलिना रेखामुत्पाद्य शत्रोर्नामानुस्मरन्जपेत्। सवलसमुदायं शत्रुमुच्चाटयति । एवं कृत्स्नं ग्राममुच्चाटयति एकह्ना । राजानमहोरात्रेण संपूर्णमर्धदिवसेन क्षत्रियं क्षपयति । दिवसत्रिभागेन वैश्यं चतुर्भागेन शूद्रम् । या विधानामध्यें शत्रुनाश हेंच फळ आहे. वरील उताऱ्यामध्यें कृत्या उत्पन्न करण्याचा एक उपाय सांगितलेला आहे. तांबडें वस्त्र, तांबडीं फुलें, तांबडें गंध, इत्यादिकांनीं देवाचें पूजन करावें व स्मशानामध्यें लोखंडाच्या शलाकानीं हवन करावें व "उत्तिष्ठ रक्तांगि रक्तनेत्रे रक्तकेशि" या मंत्रानें त्या कन्येला उठवून तिला रक्त व मांस यांनीं संतर्पित करावें. असें केलें असतां ती कन्या उत्पन्न होऊन कोणाचा वध करूं ? त्रैलोक्यामध्यें तो कोठेंहि असला तरी मी त्याचा घात करूं शकेन, असें बोलूं लागते. असली उग्र देवता साध्य झाली तर हल्लींच्या मशीनगन्स तिच्या बरोबरीला कितपत टिकणार आहेत ? तसेंच या मंत्रांच्या योगानें शत्रु समोर उभे राहूं शकत नाहींत, पराभव पावतात व सर्व गांवच्या गाव उठवून टाकिले जातात.

अशीं अनेक प्रकारचीं अद्भुत आणि विलक्षण कृत्यें ह्या मंत्रांच्या साधनानें होण्यासारखीं आहेत, हें वर दिलेल्या कित्येक उताऱ्यांवरून सर्वांच्या लक्षांत येईल. तसेंच हेंहि लक्षांत येईल कीं, हल्लींच्या मशीनगन्सनीं जीं कामें होतात, तींच कामें आपले पूर्वीचे लोक त्यांच्या ह्या जुन्या मशीनगन्सनीं करून घेत होते. किंबहुना जुन्या मशीनगन्सचे परिणाम हल्लींच्या पेक्षां जास्त भिन्नभिन्न तऱ्हेचे आहेत. ह्या जुन्या मशीनगन्सचे गोलंदाज आपली विद्या विसरून गेले आहेत, आणि पाश्चिमात्यांनीं एका मिनिटामध्यें हजारों गोळ्या फेंकून असंख्य माणसें मारण्याचें एखादें जड व आधिभौतिक यंत्र काढलें, म्हणजे आश्चर्यानें आ वासून त्याच्याबद्दल गोष्टी बोलत बसतात ! परंतु हेच परिणाम आपले पूर्वज दिव्य मानसिक शक्तीनें घडवून आणीत असत हें विचाऱ्यांच्या कधीं लक्षांतही येत नाहीं. परंतु प्रत्येक मोठ्या होऊन गेलेल्या अगर होत असलेल्या राष्ट्रापाशीं असें कांहीं तरी जड किंवा सूक्ष्म अद्भुत सामर्थ्याचें साधन

असल्यावांचून त्या राष्ट्राला सर्वांमध्यें श्रेष्ठत्व प्राप्त होणें कधींही शक्य नाहीं. या दृष्टीनें पाहिलें असतां हल्लींच्या पाश्चिमात्य राष्ट्रांपाशीं जशीं यांत्रिक साधनें आहेत, तशीं आपल्या जुन्या राष्ट्रापाशीं अद्‌भुत शक्तीचीं मानसिक साधनें असावीं असें दिसतें व पूर्वींच्या तेजस्वी ऋषींनीं आणि पराक्रमी क्षत्रियांनीं लढायांतून व अन्यत्र या साधनांचा उपयोग केल्याचीं अनेक उदाहरणें आढळून येतात. परंतु अशीं जरी उदाहरणें आहेत, तरीहि असल्या गोष्टींवर विश्वास बसणें फार मुष्किलीचें काम झालें आहे. पूर्वींच्या-बद्दल फारशी चर्चा नको, परंतु अलीकडच्या या नास्तिकपणाच्या, जड-वादाच्या आणि वैषयिक सुखोपभोगाच्या दिवसांमध्यें असल्या गोष्टींवर श्रद्धा बसणें म्हणजे फारच कठीण आहे. परंतु मनाच्या धर्माचीं प्रमेयें घेऊन त्यांवरून अनुमान काढल्यास या गोष्टी अशक्य आहेत असें नाहीं. याला मनाचें दाढर्य पाहिजे, अंतःकरणवृत्ति स्थिर झाली पाहिजे, तपश्चर्येचा जोर वाढला पाहिजे, आणि योगबलाचा संचय पाहिजे. व हें काम फारसें सोपें आहे असें नाहीं. परंतु ह्या जुन्या मशीनगनप्रमाणें नवीन मशीनगन साध्य करणेंही फारसें सोपें नाहीं. त्यालाही अनेक गुण लागतात. एका अर्वाचीन मशीनगनला जर पांच हजार रुपये पडत असले अशी कल्पना केली, तर ह्या पांच हजार रुपयांमध्यें काय काय मानासिक गुण येत नाहींत ? द्रव्याची मोठी रक्कम म्हणजे अनेक उत्तम मनोधर्मांचें एक प्रकारचें दृश्य रूपांतरच होय. तेव्हां असल्या यांत्रिक मशीनगनला देखील जर इतके उत्तम मानसिक गुण अवश्यक आहेत, तर आपल्या मांत्रिक मशीनगनला किती तरी जास्त पटीनें त्यांची अवश्यकता असली पाहिजे. परंतु इतके गुण क्वचितच एकवटतात आणि म्हणून या गोष्टी पुष्कळांना अशक्य वाटतात. परंतु जेथें दिव्य योगसाधन आहे आणि इच्छाबल अतिशय वृद्धिंगत झालेलें आहे, तेथें कोणतीही गोष्ट अशक्य नाहीं.

असो. येथवर केलेल्या विवेचनावरून अलीकडच्या शोधांची दिशा आणि प्राचीनांच्या प्रगतीची दिशा यांमधील भेद कोणाच्याही लक्षांत येईल. अध्यात्मशास्त्र हा पूर्वींचा बाणा; आधिभौतिक सुधारणा ही हल्लींची दिशा. एकेका युगामध्यें एकेका मार्गाचें महत्त्व असतें. पूर्वींच्या युगांतून पुण्यवान् पुरुषांची सूक्ष्म व दिव्य, अशा अध्यात्मिक शास्त्राकडे प्रवृत्ति होती, व

हल्लींच्या युगांत स्थूल व जड अशा आधिभौतिक सुधारणेकडे प्रवृत्ति आहे. आणि म्हणूनच असल्या युगाला कलियुग असें म्हणतात.

---

## १६२७ पूर्वी ६ वर्षे : : १४

वर दिलेला समय म्हणजे मुसलमानी अमलाची भर दोन प्रहरची वेळ होय. ह्या भारतवर्षांत त्या वेळीं मुसलमानांची सत्ता जिकडे तिकडे मी म्हणत होती. मुसलमानांच्या जुलमानें हिंदुस्थानच्या एका टोंकापासून दुसऱ्या टोंकापर्यंत सर्वत्र कहर करून सोडला होता. मुसलमानांना पाहून हिंदूंचीं देवळें थरथर कांपूं लागत, गाई पुरीषोत्सर्ग करीत आणि हिंदुधर्मीयांच्या तोंडचें पाणी पळून जाई ! अशी भयंकर स्थिति त्या वेळीं हिंदुस्थानाला प्राप्त झालेली होती. गिजनीच्या महंमदापासून हिंदुस्थानला शांतता आणि स्वतंत्रता या गोष्टी कशा त्या माहीतच नव्हत्या. सर्व हिंदु लोक जेरीस येऊन गेले होते. स्वतंत्रतेसाठीं अगदीं भुकेलेले होते आणि परतंत्रतेला अतिशय कंटाळलेले होते. परमेश्वराच्या अवकृपेनें आपल्या प्रियकर देशावर जें हें परतंत्रतेचें पटल पसरलें आहे, तें त्याच परमेश्वराच्या कृपेनें केव्हांतरी नाहींसें होईल, असें जरी प्रत्येकाच्या अंतःकरणाला वाटत असे, तरी आपल्या देशाला आपल्या डोळ्यांदेखत स्वतंत्रता मिळालेली आपण पहावी, अशी सर्वांची इच्छा होती. अशी इच्छा असणें हें सर्व समंजस मनुष्यांच्या ठिकाणीं साहजिकच आहे.

परंतु ही सगळ्यांचीच इच्छा तृप्त होते असें मात्र नाहीं. कित्येक असा सुयोग घडून येण्याच्या आधींच मरण पावतात ! अशा प्रकारचा एक हतभाग्य पुरुष १६२२ सालीं पैठण मुक्कामीं गतप्राण झाल्याबद्दलची एक हृदयद्रावक हकीकत तिकडील लोक सांगत असतात. हे गृहस्थ पूर्वीच्या जुन्या पद्धतीप्रमाणें आपल्या धर्माच्या आणि व्यवहाराच्या कामात फार दक्ष असत व यांची एकंदर राहणी अतिशय अनुकरणीय असे. आपल्या घरचा देवधर्म आणि शेतीभातीचें काम यांमध्येंच जरी ते सदासर्वदां गुंतलेले आहेत असें दिसत असे, तरी त्यांचें सर्व लक्ष हिंदुस्थानच्या त्या वेळच्या स्थितीकडे वेधून गेलेलें होतें. पैठण शहराला ज्ञानेश्वर, भानुदास, एकनाथ, इत्यादि महाविरक्त साधुसंतांच्या संबंधानें जें महत्त्व आलेलें होतें, त्याचाही ह्या गृहस्थांच्या मनावर फार परिणाम झालेला होता, व त्यावरून त्यांचा असा एक ग्रह झालेला होता कीं, ही जी आपल्या देशामध्यें इतकी धर्मजागृति झालेली आहे ती कधींही वायां जाणार नाहीं, तिच्या योगानें राष्ट्रामध्यें नवीन चैतन्य उत्पन्न झालेंच पाहिजे, आणि त्याच्यापासून आपलें राष्ट्र केव्हां तरी स्वतंत्रही झालें पाहिजे. देवादिकांच्या प्रसादानें आणि साधुसंतांच्या सदुपदेशानें आपल्या देशाला स्वतंत्रतेच्या सौख्याचा दिवस केव्हां तरी अनुभवावयाला सापडेल अशी जरी त्यांची खात्री होती, तरी तो दिवस केव्हां येईल, असें उतावीळपणाचे प्रश्न ते आपल्या मनाशीं वारंवार विचारीत असत, व तो हिंदुस्थानच्या स्वतंत्रतेचा आणि भाग्योदयाचा दिवस उद्यां येईल काय, परवां येईल काय, तेरवां येईल काय अशी प्रत्येक दिवसाची ते मोठ्या उत्सुकतेनें वाट पहात असत. प्रत्येक दिवशीं सूर्य उगवतांना 'हा भगवान् सूर्य नारायण आज आपल्या हिंदुस्थानच्या भाग्योदयासाठीं कांहीं करील काय ?' असे आशेचे उद्गार ते तोंडांतून काढीत. परंतु तो हिंदुस्थानचें कांहीं एक कल्याण केल्यावांचून अस्तास गेलेला पाहून त्यांच्या मनाला अतिशय खेद होई. सूर्याचे बारा नक्षत्रांवर जे बारा मुक्काम ठरलेले आहेत, त्यांपैकीं नवीन मुक्कामावर सूर्य जाऊन पोहोंचल्यानंतर तेथें तो या आर्यभूमीसाठीं कांहींतरी सुयोग जुळवून आणील, अशी त्यांना आशा वाटत असे. परंतु त्या मुक्कामाची मुदत सरली म्हणजे त्यांची निराशा होई. सूर्य आकाशमार्गोतून अतिशय त्वरेनें जात असतां एकदां दक्षिणेच्या बाजूला आणि एकदां उत्तरेच्या बाजूला जो झुलतो, त्या

प्रत्येक झुलण्याच्या अवधीमध्यें हिंदुस्थानच्या ऊर्जित दशेविषयीं प्रथम आशा आणि शेवटीं निराशा, अशा त्यांच्या मनाचा क्रम चाललेला असे. प्रत्येक वर्ष सुरू होतांना त्यानें आपल्या देशाकरितां कांहींतरी स्वतंत्रतेचा वांटा आणिला असेल असें त्यांना वाटे. परंतु तें प्रत्येक वर्ष संपतांना त्यांच्या मनाला पूर्ण निराशेचा वांटा देऊन समाप्त होत असे. अशा रीतीनें एका पाठीमागून एक अशीं अनेक वर्षे जातां जातां अखेरीस या गृहस्थांची शक्ति क्षीण होत चालली. हातापायांचे व्यवहार थांबले. त्यांचा राजयक्ष्म्याचा विकार बऱ्याच विकोपाला गेला आणि ते अगदीं आसन्नमरण झाले. एक दिवस त्यांचे मुलगे त्यांच्या अंथरुणाजवळ येऊन बसले असतां आतां आपण फार दिवस जगत नाहीं, असें त्यांच्या मनाला वाटलें. ज्यांची नेहमींची इच्छा वर वर्णन केलेल्या प्रकारची आहे, त्यांच्या मनांत अंतकाळच्या वेळीं काय विचार आले असतील, याची कल्पना करणें फारसें कठीण नाहीं. आपल्या एका मुलाच्या खांद्यावर मान टाकून आणि दुसऱ्या एका मुलाचा हात आपल्या हातांत घट्ट धरून, जवळ बसलेल्या बाकीच्या मुलांकडे पहात व दीर्घश्वास टाकीत ते असें म्हणाले:—

जन्मास आल्यापासून ह्या डोळयांनीं आपल्या देशाला स्वतंत्रता मिळालेली पहावी, हीच काय ती माझी एक इच्छा होती. परंतु ती माझी इच्छा पुरी करावी असें देवाच्या मनांत आलें नाहीं! असो. मर्जी त्याची! दैवी न्यायाच्या अनुक्रमाप्रमाणें तो निपक्षःपाती आणि सर्वांवर सारखी दया करणारा परमेश्वर आपल्याही देशाला केव्हां तरी स्वतंत्रतेचे दिवस दाखवील. परंतु माझ्या नशीबीं तें पहाण्याचें नाहीं, याबद्दल मला वाईट वाटतें. मी मरतों याबद्दल मला वाईट वाटत नाहीं, परंतु मी आपल्या देशाला स्वतंत्रता मिळालेली पाहण्याला जिवंत राहत नाहीं, याबद्दल मला अतिशय वाईट वाटतें! आणि एवढ्याचसाठीं जे माझ्या पाठीमागें जिवंत राहत आहेत, त्यांच्याबद्दल मला मोठा हेवा वाटतो. मी पुष्कळ वर्षे जगलों, परंतु आतां देशाची स्वतंत्रता पाहिल्यावांचून मरतों! असल्या दीर्घ आयुष्याचा काय उपयोग? ज्या दीर्घ आयुष्यानें जन्मास येऊन पाहण्यासारखी स्वातंत्र्य ही वस्तु पाहिली नाहीं, तें दीर्घ आयुष्य म्हणजे निवळ काळाचा अपव्यय होय. तसलें आयुष्य मला नको. मला आणखी कांहीं दिवस जगावयाला पाहिजे होतें. परंतु तें केवळ

जिवंत राहण्यासाठीं नको; तर आपल्या देशाचें स्वातंत्र्य या डोळ्यांनीं पाहण्यासाठीं मला जगावयाला पाहिजे होतें. आपल्या या भरतवर्षांतील गोब्राह्मण सुखी झालेले, आपल्या देवळांवरून मशिदीचे घुमट ढांसळलेले, आपल्या किल्ल्यांवरून आपलीं निशाणें उभारलेलीं, आपल्या संस्थानांच्या गाद्यांवरून आपले राजे बसलेले, आपले सर्व देशबांधव सुखी आणि संतुष्ट झालेले, आणि आपल्या मातृभूमीच्या निटिलप्रदेशीं स्वातंत्र्याचा सौभाग्यतिलक लागलेला माझ्या दृष्टीस पडल्यानंतर लागलीच त्याच्या दुसऱ्या दिवशीं मृत्यूचे दूत माझे पुढें येऊन उभे राहतील आणि मला 'चल' म्हणून म्हणतील, तर मी त्यांच्यापाशीं त्यानंतर एका क्षणाचीही फुरसत मागितली नसती. मग मीं या लोकांतून मोठ्या आनंदानें प्रयाण केलें असतें. तेथपर्यंत मला मुदत पाहिजे होती. पण ती मुदत मला कोण देणार! मनुष्यांनीं शंभर वर्षांच्या वर जगतांच कामा नये, असा ईश्वरानें विनाकारण कडक नियम करून ठेविला आहे! मी शंभर वर्षें जगलों खरा, परंतु तीं शंभर वर्षें मीं परतंत्रतेचें दुःख पाहण्यामध्यें फुकट दवडलीं. आणि स्वतंत्रतेचें सुख पाहण्याकरितां त्यापैकीं एक क्षणही मीं वगळून ठेविला नाहीं! सर्व आयुष्य व्यर्थ गेलें! डोळ्यांनो, देवानें तुमच्यामध्यें पाहण्याची शक्ति दिली होती; परंतु या जगांत येऊन पाहण्यासारखें जें आपल्या देशाचें स्वातंत्र्य तें पाहिल्यावांचून तुम्ही चाललां! असो. डोळ्यांची शक्ति गेली तर गेली पण आपला देश स्वतंत्र करण्यासाठीं अमक्या अमक्यांनीं अमक्या ठिकाणीं प्रयत्न केला, त्यांत त्यांना जय आला, आणि आपल्या देशाला स्वातंत्र्य प्राप्त झालें, अशी निदान आनंददायक बातमी तरी माझें प्राणोत्क्रमण होण्याच्या पूर्वी माझ्या कानावर कोणी आणून घालील काय? पण तिचा तरी काय उपयोग! कारण, कानांमध्यें ऐकण्याचीही शक्ति उरली नाहीं. सर्व इंद्रियें विगलित झालीं आहेत! यांचा आपल्या देशाच्या स्वतंत्रतेच्या कामीं कांहीं तरी उपयोग व्हावा, म्हणून मीं हीं सगळीं इंद्रियें लहानपणापासून पोसलीं. परंतु तीं एखाद्या कृतघ्न माणसाप्रमाणें मला कांहींच फळ न दाखवितां निघून चाललीं! शत्रूंवर प्रहार करतील म्हणून मीं हाताचे स्नायु घटविले आणि शत्रूंचा पाठलाग करतील म्हणून मीं पायांची बडदास्त ठेविली! पण त्या हातापायांच्या आतां अगदीं काड्या होऊन गेल्या आहेत. त्यांच्या हालचा

आतां स्वदेशाची सेवा काय घडणार ! सर्व कर्मेंद्रियांनीं आणि ज्ञानेंद्रियांनीं शैथिल्याचा स्वीकार केला आहे. फक्त एक मनानें मात्र माझ्यापाशीं दगलबाजी केली नाहीं. आपल्या देशाच्या स्वतंत्रतेसंबंधानें लहानपणापासून माझे जे विचार होते, ते सर्व या एकट्या मनानें मात्र अजूनपर्यंत शाबूत ठेविले आहेत. आणि जर आपल्या धर्मांतील पुनर्जन्माचें मत खरें असेल, आणि जर या जन्मींच्या संस्कारानें परिष्कृत अशा मनानें युक्त झालेला लिंगदेह एका शरीरांतून दुसऱ्या शरीरांत प्रवेश करतो हें खरें असेल, तर माझे हे सगळे विचार हें माझें मन माझ्या पुढल्या जन्मामध्येंही जसेच्या तसे माझ्या स्वाधीन करील, यांत शंका नाहीं. आपल्या देशाच्या स्वातंत्र्यप्राप्तीच्या कामीं आपला देह झिजावा अशी माझी इच्छा होती खरी; परंतु आतांच्या स्थितींतील हीं माझीं इंद्रियें त्या पराक्रमाच्या कामाला अगदीं निरुपयोगी आहेत. हीं साधनें योजावीं म्हणून मीं मनांत योजिलें होतें खरें; परंतु एखादा चाकू बोथट झाल्यामुळें त्यानें एखादी काठी तुटली नाहीं, तर तो टाकून देऊन लोक दुसरा घेतात, तशीं हीं माझीं इंद्रियरूप साधनें त्या महत्कार्याला बोथट झालीं असलीं, तर हीं टाकून दुसरीं घेण्याला काय प्रत्यवाय आहे ? इंद्रियरूप दुसरीं साधनें मीं घेतलीं म्हणून मी बदलतों असें नाहीं. मी एकच आहें. तेव्हां आपल्या देशाच्या स्वतंत्रतेचा दृढनिश्चय कायम ठेवून मरणें म्हणजे मरणें नव्हे, तर इष्ट कार्याला निरुपयोगी झालेलीं साधनें फेंकून देऊन इंद्रियरूपानें दुसरीं सामर्थ्ययुक्त साधनें घेऊन येऊन फिरून त्याच प्रयत्नाला लागणें होय ! एक जोडा झिजला तर आपण दुसरा घेतों, आणि एक अंगरखा फाटला तर आपण दुसरा शिवतों. तर मग हीं जीर्ण झालेलीं उपकरणें टाकून नवीन घेण्याला मला जेथें आनंद वाटावा, तेथें मी दुःख कां बरें मानून घेत आहें ? जीर्णापेक्षां नवीन साधनांनीं जर एखादें काम जास्त चांगलें होण्याचा संभव आहे, तर आपल्या देशाच्या स्वतंत्रतेच्या कामीं आपल्याला नवीन साधनें मिळत आहेत, याबद्दल मीं आनंदच मानला पाहिजे. जोंपर्यंत मनामध्यें स्वदेशभक्तीचे एकच विचार कायम आहेत, तोंपर्यंत साधनसामग्री बदलल्यानें कोणीही आत्मा बदलणार नाहीं. अशा दृढतर कल्पनेमध्यें मरणें, म्हणजे फक्त जुनीं साधनें टाकून नवीन साधनें आणण्याकरितां एक क्षणभर जाण्यासारखें आहे. नवीन अंगरखा मिळणारें

शिंप्याचें दुकान आपल्याला दिसतें, तसें जर आपल्याला तें नवीन देहरूपी वस्त्र देणाऱ्या शिंप्याचें घर दिसतें, तर मग कांहींच पंचाईत नव्हती. परंतु तें दिसत नाहीं ! आणि म्हणून तर सगळा घोंटाळा ! सगळे ब्रह्मज्ञानाचे आणि तत्त्वज्ञानाचे सिद्धांत मानवी युक्तीनें सप्रमाण सिद्ध करून दाखविल्यानंतरही तत्त्ववेत्त्यांना व्यामोह उत्पन्न झालेले आहेत. आणि आपण जें सिद्ध करून दाखविलें, तसेंच मरणानंतरच्या अदृश्य सृष्टीमध्यें होत असेल काय असे संशयमूलक प्रश्न त्यांनीं आपल्या मनाला विचारलेले आहेत. दुसऱ्यांना त्यांनीं जें निश्चयात्मक सांगितलें त्याच्याबद्दल त्यांच्या मनांत क्षणोक्षणीं संदेह उद्भवत असतात. कारण, तत्त्ववेत्ते झाले तरी मरणाच्या आधीं ते वैतरणी नदीच्या पलीकडे जाऊं शकत नाहींत आणि मरणानंतर ते त्या नदीच्या अलीकडे येऊं शकत नाहींत. अशा अवस्थेंत मरणोत्तर स्थितीबद्दल व्यर्थ वल्गना करीत बसण्यांत काय अर्थ आहे ? 'भस्मीभूतस्य देहस्य पुनरागमनं कुतः' हें जें चार्वाकांनीं म्हटलें आहे, त्याचप्रमाणें जर कदाचित स्थिति असेल, आणि देहाबरोबर जर त्यांतील आत्मा आणि आत्म्याच्या अनंत वासना ह्याही भस्मच होऊन जात असतील, जर अजरामर जीव लांकडांचें खाद्य असेल, आणि उत्तम दृढ विचारांची गोवऱ्यांनीं राख होत असेल, तर मग काय ! मग मात्र माझा हिंदुस्थान देश, माझी जन्मभूमि, माझी देशभक्ति, आणि ह्या माझ्या देशाची स्वतंत्रता, ह्या सगळ्यांची कथा मला येथेंच संपली ! पण असें नसलें पाहिजे. कारण, असें असेल तर ह्या जगामध्यें जे असंख्य अदृष्ट संबंध प्रत्यही आपल्या अनुभवाला येतात, त्यांची उपपत्ति काय ? ह्या कल्पनेनें आणि ह्या घातुक संशयानें जग अगदीं संकुचित होऊं लागेल आणि कालाची मर्यादा अगदीं आंखूड होईल. शिवाय तारुण्यांत तत्त्वज्ञानाचा दुरून विचार करणारांपेक्षां आसन्नमरण झालेल्या साध्या मनुष्यांनाही तत्त्वज्ञान जास्त दिसतें. मी आतां जगाच्या एका कांठावर येऊन ठेपलों आहे. येथून मी जें दुसरें पाऊल टाकीन तें माझें पाऊल परलोकांत पडणार. या लोकींचा कच्चा माल परलोकीं पाठविण्याची उतारपेठ जी मरणभूमि तिच्या जवळ मी येऊन पोहोंचलों आहें. येथून पलीकडची जी कांहीं स्थिति मला अंधकपणें दृग्गोचर होत आहे, तिजवरून पाहतां आत्मा आणि त्याच्या वासना ह्या अविनाशीच असल्या पाहिजेत,

आणि त्यांचा प्रादुर्भाव कोणत्या तरी पोषाखामध्यें फिरून झालाच पाहिजे परंतु आपल्या आत्म्याला आणि वासनांना कोणता पोषाख मिळेल याबद्दलही फिरून संशय आहेच! हे परमेश्वरा, माझ्या कर्मानुसार मला कोणताहि जन्म मिळो, परंतु त्या जन्मांत माझा या देशाच्या स्वातंत्र्याच्या कामीं कांहीं तरी उपयोग होईल, एवढी मजवर कृपा असावी. मला जर मनुष्यजन्म द्यावयाचा असेल, तर माझ्या शत्रूंच्या वेतनावर वरिष्ठ होऊन त्यांच्या तैनातीला राहणाऱ्या मनुष्याचा जन्म न देतां, प्रत्यक्ष देशसेवेमध्यें माझा देह झिजेल, असा कांहीं तरी जन्म मला द्यावा. परंतु मनुष्यजन्म मिळविण्याइतकी माझी पुण्याई नसेल, आणि इतर कोटींमध्यें माझा संभव होईल, तर तेथेंही माझा देह स्वतंत्रतेच्या कामीं उपयोगीं पडण्याचा प्रसंग फुकट न जावा. मला जर अश्वाचा जन्म मिळेल, तर जे देशभक्त घोडेस्वार शत्रूंचा पाठलाग करतील, त्यांना आपल्या पाठीवर वाहून नेण्याची तरी निदान मला संधि मिळावी. तिर्यग्योनीमध्यें मला जन्म मिळाल्यास त्यांत, हे परमेश्वरा, मला खबूतराचा तरी जन्म दे; म्हणजे आपल्या देशभक्तांच्या एका छावणींतील बातमी दुसऱ्या छावणीमध्यें पोंचविण्याच्या कामीं तरी मी आपला देह झिजवीन! मला वृक्षवर्गामध्यें ढकलून द्यावयाचें असेल, तर ज्या वृक्षापासून निशाणांच्या काठ्या करितात, त्या वृक्षाचा तरी, हे परमेश्वरा, मला जन्म दे; म्हणजे माझ्या देशबांधवांनीं शत्रूपासून जिंकून परत घेतलेल्या किल्ल्यांचे तटावर आपल्या देशाची स्वतंत्रता आणि देशबांधवांची विजयश्री व्यक्त करीत मी आनंदानें डुलत उभा राहीन. हे देवा, मला जर व्रीहियवादिकांच्या जन्मास घालावें असें तुझ्या मनास आलें, तर जेथें मी सोन्यासारखें अन्न म्हणून पोटांत शिरेन आणि केवळ विष्ठा म्हणून बाहेर पडेन, अशा एखाद्या देश-द्रोह्याच्या देशद्रोहानें इनाम मिळविलेल्या शेतांत तूं माझ्या आत्म्याला निष्ठुर-पणानें फेकूं नको, तर गरीब आणि सदाचरणी अशा एखाद्या शेतकऱ्याच्या शेतामध्यें तूं मला जन्म दे, म्हणजे मी त्याच्या भुकेलेल्या मुलाबाळांना संतोष देईन, त्याच्यावरील शेतसाऱ्याचें ओझें हलकें करीन आणि मग तेथून निघून ज्यांचें अंतःकरण स्वदेशाच्या स्वतंत्रतेसाठीं खरोखर हळहळत असेल, अशा एखाद्या स्वदेशभक्त योद्ध्याच्या शरीरामध्यें शिरून मी तेथें उत्तम रक्त होऊन बसेन, आणि जरूर लागेल तेव्हां तेथून निघून मी आपल्या देशाच्या स्वतंत्र-तेच्या लढाईंत समरांगणावर पतन पावण्यालाही मोठ्या आनंदानें तयार होईन.

दगडाचा जन्म हा सर्वांमध्यें अधम होय हें खरें, परंतु आपल्या देशाच्या संरक्षणाच्या किल्ल्याच्या भिंतीमध्यें बसणाऱ्या आणि तेथें बसून शत्रूंच्या गोळ्यांचा प्रतिकार करणाऱ्या अशा एखाद्या भाग्यवान् देशभक्त दगडाचा जन्म जर, हे परमेश्वरा, तुझ्या कोषामध्यें शिल्लक असेल, तर तो दगडाचा जन्मही मी मोठ्या आनंदानें पत्करीन. कारण, अतिशय मोठा मनुष्य होऊन स्वदेशाशीं निमकहरामपणा करण्यापेक्षां अतिशय नम्र अशा एखाद्या किल्ल्याच्या भिंतींतील दगडाचा जन्म पत्करून शत्रूपासून स्वदेशाचें संरक्षण करणें, हेंच जास्त चांगलें होय. मुलांनो, आपला देश स्वतंत्र झालेला पाहण्याचें माझ्या नशिबीं नाहीं, परंतु तुम्ही तरी ही गोष्ट पाहण्याकरितां जगा. तुम्हीं ही गोष्ट पाहिली, म्हणजे ती मीं पाहिल्यासारखीच आहे. कारण, तुमचे डोळे हे माझेच डोळे आहेत. माझ्या शरीरांतील पाणी त्यांच्यामध्यें खेळत आहे, आणि माझेच विचार त्यांच्यामध्यें प्रतिबिंबित झालेले आहेत. जे स्वदेशाचा उद्धार करतात, आणि त्याला स्वतंत्रता देण्याला आपल्या शौर्यानें आणि बुद्धीनें कारणीभूत होतात, ते फार थोर पुरुष होत. त्यांच्या खांद्याशीं खांदा लावून कूच करणें, हें तर आतां मला अशक्य आहे. परंतु तें नाहीं तर निदान त्यांचें दर्शन तरी व्हावें, त्यांच्याशीं संभाषणाचा तरी योग यावा व त्यांना अन्नसामग्रीची आणि द्रव्याची मदत करण्याची तरी संधि सांपडावी, अशी माझी फार इच्छा होती. परंतु ती जिवंतपणीं तृप्त होण्याचा योग आला नाहीं. तेव्हां आतां माझी तुम्हांला शेवटची एवढीच विनंति आहे कीं, मी मेल्यावर दहनक्रियेनंतर लौकिक रूढीला अनुसरून माझ्या अस्थि कदाचित् काशीस भागीरथीमध्यें टाकण्याकरितां नेण्याविषयीं तुम्हांला कोणी सांगतील; परंतु तसें न करितां माझ्या अस्थि अशा कोठें तरी पुरून ठेवा कीं, आपल्या देशाच्या स्वतंत्रतेच्या लढाया लढण्याकरितां धांवत जाणाऱ्या देशभक्त वीर पुरुषांच्या चरणांचा त्या अस्थींना सहजगत्या स्पर्श व्हावा! कारण, स्वदेशस्वातंत्र्याच्या पवित्र वाटेमध्यें झिजणाऱ्या चरणांमध्यें जो पावनपणा आहे, तो प्रत्यक्ष भागीरथीच्या उदकामध्येंही नसेल! तसेंच माझ्या श्राद्धादि कृत्यांसाठीं जें अन्न खर्च व्हावयाचें, तें त्या कामीं खर्च न करितां आपल्या देशाच्या स्वतंत्रतेच्या मोहिमेवर निघालेल्या सैन्याला अन्नसामग्री पुरविणाऱ्या सार्वजनिक कोठारामध्यें तें नेऊन द्या; म्हणजे लढाई करून थकलेल्या योद्ध्यांना

त्या अन्नापासून जास्त नेटानें लढण्याला आणि विजयासह स्वातंत्र्य मिळविण्याला जास्त उत्तेजन आल्यानें मला जें समाधान होईल, तें तुम्हीं गयेस विष्णुपदावर ठेवलेल्या भाताच्या हजारों पिंडांनींही होणार नाहीं !

अशा प्रकारचे उत्कट देशभक्तीचे प्रेमळ आणि उदात्त उद्गार काढून किंचित् थकवा आल्यामुळें त्या गृहस्थांनां डोळे मिटले आणि ते अंथरुणावर खालीं पडले, व तशाच गुंगीमध्यें ते पुढें एक दोन दिवस राहिले पण औषधांचा उपयोग होईना. वैद्यांचा उपाय चालेना. सर्वांचा धीर सुटला. नाडी बंद पडत चालली. आंतून श्वास कोंडत आला. आणि 'स्वातंत्र्य !' 'स्वातंत्र्य !' असे शेवटचे उद्गार काढीत त्यांनीं अखेरीस प्राण सोडला !

बिचारे दुर्दैवी गृहस्थ ! आणखी कांहीं जास्त वर्षे देवानें त्यांना आयुष्य दिलें असतें तर, महाराष्ट्राला स्वतंत्रता देणाऱ्या श्रीशिवाजीमहाराजांच्या पराक्रमांनीं त्यांचे डोळे खात्रीनें समाधान पावले असते. कारण, त्यांच्या मरणानंतर पांचच वर्षांनीं श्रीशिवाजीमहाराजांचा शिवनेरी किल्ल्यामध्यें जन्म झाला; आणि तेव्हांपासून आज तागायत आपल्या हिंदुस्थान देशाचा एकसारखा उत्कर्षच होत चालला आहे. शिवाजीमहाराजांनीं महाराष्ट्राला ज्या स्वतंत्रतेचा लाभ जोडून दिला, त्याच स्वतंत्रतेची एक लाट त्यांच्या वंशजांनीं दक्षिणेस कर्नाटक, जिंजी, तंजावरपर्यंत पोहोंचविली. आणि त्यांच्या मागून आलेल्या भाऊसाहेब, रघुनाथराव वगैरे मराठे वीरांनीं तर त्या स्वतंत्रतेची दुसरी लाट उत्तरेस थेट अटक नदीच्या पाण्याला नेऊन भिडविली. या पेशवाईच्या वेळीं सर्व हिंदुस्थानाला जें एकराष्ट्रीयत्व प्राप्त झालें होतें, तें जरी मध्यंतरीं किंचित् डळमळल्यासारखें वाटत होतें, तरी हल्लीं ब्रिटिश साम्राज्याच्या संरक्षक छत्राखालीं त्या एकराष्ट्रीयत्वाला फिरून जोर येऊं लागला आहे. हल्लीं हिंदुस्थानचे सर्व जातींचे लोक एकत्र झाले आहेत; विद्याभिवृद्धि होत चालली आहे; आगगाड्या आणि तारायंत्रें दिवसेंदिवस वाढत आहेत; हिंदुस्थानच्या व्यापाराची कमान चढती आहे; हिंदुस्थानचीं सैन्यें दरवेशी, बोअर, सोमाली, चिनी, तिबेटी, वगैरे लोकांवर विजय मिळवीत आहेत; हिंदुस्थानचें उत्पन्न अब्जांच्याहीवर धांव घेत चाललें आहे; आणि हिंदुस्थानची भरभराट इच्छिणारे वरील पैठणकर गृहस्थ पुढील सालअखेर हिंदुस्थानची तिजोरी मोजण्यास आले,तर त्यांना तिजोरीमध्यें १,३५,५७,००० रुपये शिल्लक पडलेले

मोजावयाला सांपडतील असा अंदाज आहे. याच्यापेक्षां आणखी हिंदुस्थानची भरभराट ती त्यांना काय पाहिजे ? सालिना जवळ जवळ दीड कोटीची अतर्क्य शिल्लक त्यांच्या कधीं स्वप्नांतहि आली नसेल ! तरी अजून हिंदुस्थानला जे उत्तम वरिष्ठ हक्क ते मिळावयाचेच आहेत ! तोंच हिंदुस्थानची जर इतकी भरभराट आहे, तर ते हक्क प्रत्यक्ष जेव्हां कधीं मिळतील, तेव्हां हिंदुस्थानची किती भरभराट होईल, आणि तो जगांतील किती देशांना मागें टाकील, याची कल्पनाही करणें कठीण आहे !

---

## एम्. डी. प्लेहवे : : १९

काळ : अग्रलेख, ता. २-९-१९०४

● मूळ लेखास मथळा नाहीं. कर्झन यांची व्हाइसरॉय म्हणून फेरनेमणूक व्हावी अशी खटपट सुरू झाली होती. प्लेहवे यांच्या दुष्कृत्यांनंतर कर्झनच्या अन्यायांचें वर्णन करून दुसऱ्या स्फुटांत काळ-कर्त्यांनीं विचारलें कीं, अशा लाटाचें पुनरागमन सहन करण्याला हिंदुस्थानच्या लोकांनीं कसें तयार व्हावें ? टाइम्सनें या लेखाचें व काळांतील आणखी कांहीं लेखांचीं भाषांतरें छापून प्रचार सुरू केला

कीं, कर्झनच्या खुनाला काळकर्त्यांनीं चिथावणी दिली आहे, म्हणून त्यांजवर सरकारनें खटला करावा. टाइम्सचा इषारा म्हणजे जवळ-जवळ सरकारचें मत अशी तेव्हां परिस्थिति होती. राज्यकर्त्यांच्या कानाशीं भिडणाऱ्या या नृपांगणगत खलाचा डाव हाणून पाडण्यासाठीं टिळकांनीं ता. २७।९।१९०४ च्या अंकांत "मराठी आणि इंग्रजी काळ" हा सणसणीत लेख लिहिला व टाइम्स या अँग्लो इंडियनाच्या कुलंग्या कुत्र्याची लुच्चेगिरी उघड केली. हिंडमन यांनीं जस्टिस पत्रांत लिहिलेला लेख व काळकर्त्यांचा लेख हेही या अंकांत छापले होते. हिंडमन यांचा लेख काळकर्त्यांच्या लेखापेक्षां अधिक कडक आहे असें दाखवून आणि दोन्ही लेखांची व परिस्थितीची चर्चा करून टिळकांनीं बजावलें कीं, सरकारनें स्वतंत्र लोकमत समजावून घ्यावें आणि दडपशाही करूं नये. कोणत्याही कारणामुळें असो, त्यावेळीं काळ पत्रावर खटला झाला नाहीं.

एम्. डी. ग्रेहवे यांचा खून करणाराबद्दलची हकीकत मागील अंकीं दिलेलीच आहे. मी तुम्हांला आमच्या गुप्त कटाबद्दलची कांहीं माहिती सांगणार नाहीं, असें त्यानें पोलिसांना निक्षून सांगितलें होतें. परंतु तो खुनी मनुष्य जरी त्या खुनाबद्दलची हकीकत सांगण्याला तयार नव्हता, तरी खून हा कधीं तरी बाहेर पडल्यावांचून रहावयाचा नाहीं. सूर्यप्रकाशामध्यें अंधकार दडून बसूं शकणार नाहीं, त्याप्रमाणेंच या जगाच्या रचनेमध्यें आणि व्यवस्थेमध्यें खून कधीं दडून बसणार नाहीं. पोलीस लोक आम्हीं खून शोधून काढला म्हणून वल्गना करीत असतात; पण ती व्यर्थ आहे. केव्हांना केव्हां तरी आणि कसाना कसा तरी खून उघडकीस आला पाहिजे, हा सृष्टीचा नियमच आहे. तो हुडकून काढण्याला पोलिसांची आवश्यकता नाहीं. त्या सृष्टीच्या नियमाप्रमाणें या खुनाचीही हकीकत हळूहळू बाहेर येऊं लागली आहे. ती हकीकत आम्ही येथें देत आहों, याचें कारण असें कीं, त्यांत एक प्रकारचें शिक्षण आहे. जगांतील प्रत्येक म्याजिस्ट्रेटाच्या पुढें नित्यशः जे शेकडों खुनांचे खटले येत असतात, त्यांतले हे खून नव्हेत. ब्रिनबुचाच्या लक्षावधि कातड्याच्या बाटल्यांतून जो वारा नेहमीं जात असतो आणि येत असतो, तशा प्रकारचें हें वाऱ्याचें निर्याण नव्हे. जेव्हां राजे किंवा त्यांचे मोठाले अधिकारी यांचे

खून होतात, तेव्हां सर्व जग क्षणभर आपले क्रमिक उद्योग बंद ठेवून या गोष्टीचा विचार करूं लागतें. आकाशाच्या पोटांतून एखादा धूमकेतु बाहेर आला असतां किंवा पृथ्वीचें हृदय फाटून त्यांतून ज्वालामुखीच्या रूपानें तिच्या शोकाची एखादी ज्वाला बाहेर पडूं लागली असतां ज्याप्रमाणें सर्व आश्चर्यचकित होतात, त्याप्रमाणेंच असले खून झाले म्हणजे लोकांची मनोवृत्ति थक्क होऊन जाते. हें काय झालें, म्हणून लोक एकमेकांना विचारतात, आणि यांत ईश्वराचा काय हेतु असला पाहिजे याबद्दल विचारी लोक आपली तर्कांची इमारत उभारीत असतात. असले खून हे इतर खुनांप्रमाणें सोनें, रुपें, हिरेमाणके, वगैरे एक प्रकारची माती आणि दगड यांच्या-सारख्या क्षुद्र वस्तूंच्या अभिलाषासाठीं केलेले नसतात. किंवा व्यक्तींच्या परस्पर द्वेषासाठीं आणि वैमनस्यासाठीं घडवून आणिलेले नसतात. जग हें जें परमेश्वराचें विराट शरीर, तें सर्व शरीर दोषी संसर्गानें येथून तेथून नासून जाऊं नये म्हणून आपल्या विषानें त्या शरीरांतील बाकीच्या अवयवांना असह्य वेदना देणारा असा जो अवयव, तोच छाटला जावा, असा असल्या कृत्यांतील उदात्त हेतु असतो. परमेश्वराच्या विराट शरीराला अपकार झाला असतां त्याला उपकार करण्याचा हा एक वैद्यकीय उपाय आहे. जेव्हां सर्व बड्या लोकांचे कान नाच, तमाशे आणि गाणीं यांनीं बधिर झालेले असतात, आणि गरिबांचीं गाऱ्हाणीं ऐकण्याला कोणालाच सवड नसते, त्या वेळीं सगळ्या जगाच्या कानठळ्या बसून जातील, अशी जुलमानें गांजलेल्या लोकांची ही भयंकर किंकाळी होय. यांत झांकून ठेवावयाचें असें कांहींच नसतें. असलीं कृत्यें जगाच्या कल्याणासाठीं असतात, आणि तीं करतांना जरी गुप्त असलीं तरी तीं केल्यावर प्रांजलपणें सर्व जगाच्या पुढें ठेवण्यांत येतात.

आणि तशाच प्रकारचें वर्तन रशियांतील राज्यक्रांतिकारक सोशिॲलिस्ट लोकांच्या सेंट्रल कमेटीनें केलें आहे. एम्. डी. प्लेह्वे यांच्या खुनाच्या सत्कर्माबद्दल आपण सर्व प्रकारें जबाबदार आहों असें जगाला जाहीर करण्या-करितां ही कमेटी पुढें आली आहे. एम्. डी. प्लेह्वे यांच्यापूर्वींचे त्यांच्या जागेवरील प्रधान, एम्. सीपिॲजिन, यांचाही अशाच रीतीनें खून झालेला होता. परंतु त्यांना गोळी घालून मारण्यांत आलें होतें, म्हणून त्याबद्दल फारसा गवगवा झाला नाहीं. परंतु जास्त महत्त्वाचा राजा असला

म्हणजे त्याच्या सन्मानार्थ जास्त दारूगोळ्याची सलामी दिली जाते, त्याप्रमाणें एम्. डी. प्लेह्वे यांनीं जास्त जुलूम केले होते म्हणूनच कीं काय कोण जाणें, रशियांतील सोशिॲलिस्ट लोकांकडून त्यांना रिव्हॉल्व्हरच्या लहानशा गोळीच्याऐवजीं एका मोठ्या कुलपी गोळ्याचा सन्मान देण्यांत आला. तो गोळा फुटतांक्षणींच एम्. डी. प्लेह्वे आणि त्यांच्या आसपासचीं नऊ माणसें एकदम जगांतून नाहींशीं झालीं. दाण्याबरोबर खडेही चिरडून गेले! एम्. डी. प्लेह्वे हे ज्या गाडींत बसले असतां हा बार उडाला, ती गाडी छिन्नाविच्छिन्न झाल्यावर कशी दिसत होती, याचें चित्र एका वर्तमानपत्रानें दिलें आहे. तें पाहिलें म्हणजे परमेश्वराच्या न्यायीपणावर न उभारलेलें ऐहिक वैभव कसें छिन्नविच्छिन्न होतें, याचें चित्र डोळ्यापुढें मूर्तिमंत उभें रहातें. अशा छिन्नविच्छिन्न झालेल्या गाड्या पृथ्वीच्या पाठीवर कितीतरी असतील! तरीही पण आपल्या जुलमी गाड्यांत बसून त्यांच्या चाकांखालीं दुबळ्या लोकांना चिरडणारे जुलमी राजे आणि प्रधान अजूनही जगामध्यें आहेतच! दुसऱ्याला लागलेल्या ठेचेनें शहाणे न होतां सर्वजण आपल्या स्वतःला ठेच लागण्यासाठीं थांबून बसले आहेत. वर निर्दिष्ट केलेल्या सेंट्रल कमेटीनें एक जाहीरनामा प्रसिद्ध करून त्यांत एम्. डी. प्लेह्वे यांना मारणें कां भाग पडलें, याबद्दलचीं कारणें सविस्तर दिलीं आहेत. ते म्हणतात कीं, एम्. डी. प्लेह्वे यांनीं वीस वर्षांपूर्वी आमच्यापैकीं कित्येक लोकांना तुरुंगांत टाकिलें, आणि तेथें त्यांचे इतके कांहीं विलक्षण हाल करण्यांत आले कीं, त्यांतील कित्येकांना वेड लागून ते मरण पावले, व नरकलोकापेक्षांही जास्त दुःसह यातना त्यांना तेथें सोसाव्या लागल्या. ह्यांनीं हातांत सत्ता येतांच रशियांतील कारागीर आणि शेतकरी लोक ह्यांना कधीं कोणीं ऐकिलें नाहीं, अशा रीतीनें छळण्याचा क्रम सुरू केला व ह्या जुलमाकडे लोकांचें विशेष लक्ष न लागतां तें दुसरीकडे वेधून जावें म्हणून ह्यांनीं झारचें मन वळवून जपानशीं लढाई सुरू केली. ह्या त्यांच्या कृत्यामुळें सर्व रशियावर मोठें संकट ओढवलें आहे व रशियांतील लक्षावधि तरुण लोक त्यांच्या ह्या कृत्याला बळी पडत आहेत, आणि सर्व रशियन लोकांच्या निढळच्या घामाचा मूर्तिमंत घनीभाव असे कोट्यवधि रूबल्स (रशियन नाणें) उधळले जात आहेत. जे जुलूम ऐकले असतां अंगावर शहारे

येतील, अशा प्रकारच्या जुलुमांनीं त्यांनीं सर्व लोकांना त्रासवून सोडलें. स्वदेश, स्वदेशबांधव, सुधारणा आणि मानवी प्राणी ह्यांच्याविरुद्ध एम्. डी. प्लेह्वे ह्यांनीं इतके अन्याय केले कीं, त्यांना मारणें भागच पडलें. रशियाच्या स्वतंत्रतेकरितां आणि तेथील झारच्या वर्चस्वाचा नाश करण्याकरितां जे झटत होते, त्या लोकांना त्यांनीं छळलें, म्हणून अशा परिणामाला गोष्ट आली. सदर जाहीरनाम्याच्या शेवटीं असें सांगण्यांत आलें आहे कीं, जेथें लोकांना स्वतंत्रता आहे, त्या देशांतून असल्या उपायांची योजना करणें हें अगदीं गैर आहे. परंतु जेथें राजकीय विषयांवर उघड रीतीनें चर्चा करण्याचीसुद्धां परवानगी नाहीं, जेथें तक्रारीची दाद लागत नाहीं आणि जेथें जुलमाचा अंमल जारीनें चालू आहे, अशा रशियामध्यें जुलमाच्या जबरदस्तीला राज्यक्रांतीच्या हक्कानेंच आळा घातला पाहिजे. याच्याशिवाय दुसरी तोड नाहीं. कोणत्याही देशांतील लोकांचे विचार इतक्या थराला येऊन पोंहचण्याला तेथें खरोखरच जुलमाची परमावधि झालेली असली पाहिजे. असल्या लोकांच्या प्रयत्नांना—ह्या जगांत जगण्यासाठीं धडपडणाऱ्या लोकांच्या प्रयत्नांना—जे नांवें ठेवतात त्यांना जुलमाचें आणि परतंत्रतेचें दुःख काय आहे, हें माहीत नसावें असें दिसतें. रशियामध्यें इतर ठिकाणींही पुष्कळ अस्वस्थता माजलेली आहे. मध्यम स्थितींतील लोकांमध्यें राज्यक्रांतीचीं तत्त्वें खळबळ करून सोडीत आहेत, आणि मँचूरियांतील रशियाच्या पराभवांनीं तर ह्या राज्यक्रांतीच्या आगीमध्यें तेलच ओतल्यासारखें होत आहे. सेंटपीटर्सबर्ग येथील वर्क शॉप्समधील लोकांत तर हीं राज्यक्रांतीचीं तत्त्वें फारच फैलावत चाललीं आहेत. ओडेसा येथील लोक अतिशय खवळून गेलेले आहेत. रिगा हें शहर तर बंडाच्याच स्थितीमध्यें आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं. अशा रीतीनें रशियामध्यें जिकडे तिकडे अगदीं विलक्षण अवस्था माजून राहिलेली आहे.

येणेंप्रमाणें वरील अध्यायामध्यें एम्. डी. प्लेह्वे ह्यांचें आख्यान समाप्त झालें. आतां आपण आपल्या कर्झनसाहेबांच्या आख्यानाकडे वळूं. येथपर्यंत आपण एम्. डी. प्लेह्वे यांचे गुणानुवाद श्रवण केले; आतां आपण लॉर्ड कर्झन यांच्या कीर्तिप्रवादानें आपले कर्ण पवित्र करून घेऊं. इंडिया नामक साप्ताहिकपत्रामध्यें कोणी ‘ इंडियन ’ या सहीनें कर्झनसाहेबांना लक्षोट्यांत घातल्यावांचून एक पत्र पाठविलें आहे. तें उघडें पत्र कोणींही पहावें. त्या

'इंडियन'च्या पत्रामध्यें पाहिलें असतां कर्झनसाहेबांचे सर्व गुण एखाद्या प्रभावळींत एकत्र मांडल्याप्रमाणें दृष्टीस पडतात. हें पत्र म्हणजे कर्झनसाहेबांच्या सत्कृत्यांची एक सहस्रनामावळीच होय. पांच वर्षांच्या अल्प अवधीमध्यें कर्झनसाहेबांनीं जीं अनेक सत्कृत्यें केलीं, त्यांचें सविस्तर संकीर्तन या पत्रामध्यें केलेलें आहे. ह्या पत्रांत बऱ्याच स्पष्टोक्तीचें अवलंबन केलें आहे, व त्याबद्दल क्षमा असावी, म्हणून व्हाइसरॉय साहेबांची प्रार्थना केली आहे. हा सर्व प्राथमिक व औपचारिक विधि झाल्यानंतर 'इंडियना'नें कर्झनसाहेबांची पूजा बांधण्याला सुरुवात केली आहे. हिंदुस्थानच्या व्हाइसरॉयांमध्यें वाईटपणांत पहिला नंबर कोण पटकाविणार याबद्दल, कर्झनसाहेब, आपण येण्याच्या पूर्वी लार्ड लिटन आणि एल्जिन यांच्यामध्यें चढाओढ चालली होती. परंतु आपल्या हिंदुस्थानांतील पांच वर्षांच्या कारकीर्दीनंतर ते चुकीच्या आणि जुलमाच्या राज्यपद्धतीचे दोघेही पुरस्कर्ते व्हाइसरॉय मागें सरून, ते ज्या जागेसाठीं भांडत होते, ती जागा त्यांनीं मुकाट्यानें बहुमानपुरस्सर आपल्या हवालीं केली आहे! हिंदु, मुसलमान वगैरे हिंदुस्थानांत ज्या अनेक जाती आहेत, त्या सर्वांना निःपक्षपातानें वागविणें हें हिंदुस्थानच्या व्हाइसरॉयांचें मुख्य कर्तव्यकर्म आहे. त्याप्रमाणें आपल्या राज्यांतील राजकीय हक्क आणि मोठमोठीं हुद्याचीं कामें हिंदु व मुसलमान ह्या दोघांनाही सारखींच द्यावयाचीं नाहींत असें धोरण ठेवण्यामध्यें आपण जो निःक्षपातीपणा दाखविला आहे तो खरोखर वर्णनीय आहे. परंतु याशिवाय आपल्या निःपक्षपातीपणाचें दुसरें एखादें उदाहरण कोणाला क्वचितच माहीत असेल. भाषण आणि कृति यांच्यामध्यें कधींही मेळ ठेवावयाचा नाहीं, हें व्रत चालविण्यामध्यें आपण दाखविलेला करारीपणा प्रशंसनीय आहे. हिंदुस्थानांतील सुशिक्षित लोकांना तर आपण फारच वाईट रीतीनें वागविलें आहे! आणि पायोनियर, टाइम्स ऑफ इंडिया किंवा इंग्लिशमन ह्या वर्तमानपत्रांतून जशी नेटिव सुशिक्षितांची झाडणी केलेली असते, तशा धर्तीवर आपण सुशिक्षिताच्या संबंधानें बोलण्याचा रोख ठेविलेला होता; व खेड्यांतील लोकांच्या स्थितीचें परीक्षण करण्याविषयींचीही विनंति आपण मान्य केली नाहीं. असें असतां, महाराज, पांच वर्षांची आपली मुदत संपल्यानंतर आपण फिरून हिंदुस्थानामध्यें यावें, अशीं आपल्या हातून कोणतीं महत्कृत्यें झालीं आहेत? तिबेटवर विनाकारण मोहीम पाठविली ही तर

आपल्या हातून मोठीच चूक झाली आहे. निरुपद्रवी तिबेटी लोकांवर जी ही मोहीम पाठविण्यांत आली आहे, तिचे भयंकर परिणाम आपल्या पाठीमागून येणाऱ्या अनेक व्हाइसरॉयांना सोसावे लागणार आहेत. आपण इराणच्या आखातामध्यें राजकीय थाटानें मिरविण्याकरितां गेलां होतां, ही गोष्ट हिंदुस्थानांतील लोकांना आवडली, असें आपल्याला वाटतें काय? इराणच्या आखाताची काळजी घेणें, हें ब्रिटिश फॉरेन आफिसचें काम आहे, किंवा हिंदुस्थानच्या व्हाइसरॉयाचें काम आहे? लॉर्ड नार्थब्रुक किंवा लार्ड रिपन हे जर हिंदुस्थानचे व्हाइसरॉय असते, तर त्यांनीं दिल्लीच्या तमाशामध्यें हिंदुस्थानचे इतके पैसे अशा रीतीनें उधळले असते काय? आणि उपाशी मरणाऱ्या लोकांच्या पैशावर असल्या डामडौलाच्या हत्तींच्या मिरवणुकी काढल्या असत्या काय? हिंदुस्थानचे नेटिव राजे हे आपल्या बरोबरीचे आहेत असें तुम्ही आपल्या भाषणांमध्यें भासविलें. परंतु वास्तविक त्यांना आपण किती वाईट रीतीनें वागविलें! दिल्लीदरबारच्या वेळीं त्यांचे अनेक वेळां अपमान झाले. आपल्या बरोबरीच्या हिंदुस्थानांतील राजांना हिंदुस्थान सोडून बाहेर जावयाचें असलें, तर त्या आपल्या बरोबरीच्या राजांना आपली परवानगी लागावी! मल्हारराव गायकवाडांच्या वेळीं नार्थब्रुक साहेबांनीं जशी उघड चौकशी करविली, तशी कांहीं एक चौकशी न करतां आपण आपल्या बरोबरीच्या नेटिव राजांना पदच्युत केलें! हैद्राबादच्या निजामापासून गोड गोड बोलून वऱ्हाड प्रांत उपटला, आणि त्याच्या मोबदला त्यांना G. C. B. ही पदवी दिली! हैद्राबादेस ह्या आपल्या पदवीचा अर्थ लोक काय करतात, हें आपल्याला माहीत आहे काय? G. C B. म्हणजे 'Gave Curzon Berar' असा त्यांचा अर्थ आहे. परंतु आपण हिंदुस्थानांतील राजांनाच वाईट रीतीनें वागवून थांबला नाहीं. हिंदुस्थानांतील लोकांच्याही डोक्यावरून आपण हात फिरविला आहे. प्रेस अॅक्ट आणि युनिव्हर्सिटी बिल हीं याचीं स्पष्ट उदाहरणें आहेत. नेटिवांना मोठ्या जागा न देण्याबद्दल आपला कटाक्ष आहेच. अशी स्थिति असतांना आपण फिरून व्हाइसरॉय होऊन येणार, ही गोष्ट सहन करण्याला हिंदुस्थानांतील लोकांनीं कसें तयार व्हावें? महाराज, हिंदुस्थानांतील उपाशी मरणाऱ्या लोकांकरितां आपण काय केलें आहे? आपल्या पांच वर्षांच्या कारकीर्दीत चार वेळां भयंकर दुष्काळ

पडले, व त्यामुळें कोट्यवधि लोक मरण पावले. दारिद्रय हें दुष्काळांचें खरें कारण होय, म्हणून आतां सर्वांचें मत झालेलें आहे. त्या दारिद्र्याच्या निवारणासाठीं आपण काय केलें? जमाखर्चाच्या खर्ड्यांत शिल्लक असतांनाही आपण कर कमी केले नाहींत, किंवा फॅमिन कमिशनच्या उपयुक्त सूचना अमलांत आणिल्या नाहींत. आपण कलकत्ता आणि मद्रास येथील स्थानिक स्वराज्याचे हक्क लयाला नेले. टाटाची रीसर्च युनिव्हर्सिटी स्थापन करण्याच्या कामीं आपण मदत केली नाहीं. मुल्की खात्यापासून दिवाणी खातें विभक्त करण्याचें काम आपण मनावर घेतलें नाहीं. सर हेन्री कॉटन आणि मिडोनाल्ड स्मीटन यांना आपण न्याय दिला नाहीं. राणीचें स्मारक निरनिराळ्या लोकांना आपआपल्या पुरतें करूं न देतां सगळ्या इंडियाचें मिळून एक स्मारक करण्याची आपण हिंदुस्थानांतील लोकांवर जबरदस्ती केली. अशीं आपलीं कृत्यें असल्यामुळें हिंदुस्थानाला आपण फिरून व्हाइसरॉय म्हणून नको आहां. आपण हिंदुस्थानचे पुष्कळ अन्याय केले आहेत व फिरून आपण व्हाइसरॉय होऊन आल्यास आपल्या हातून आणखी जास्त अन्याय होतील, अशी भीति आहे. एखाद्या प्रधानमंडळीविरुद्ध पार्लमेंटमधील लोकमत जास्त झालें, तर त्या प्रधानमंडळालादेखील आपल्या अधिकाराचा राजीनामा द्यावा लागतो. मग आपण फिरून हिंदुस्थानांत येण्याची तसदी घेऊं नये, अशी हिंदुस्थानांतील लोकांची अंतःकरणापासून इच्छा आहे व ते ती उघडपणें बोलून दाखवीत आहेत, अशा स्थितींत आपण हिंदुस्थानांत न येण्याचा निश्चय केल्यास तें चांगलें होणार नाहीं काय? अशा अर्थाचें हें पत्र प्रसिद्ध झालें आहे. कर्झनसाहेबांच्या कारकीर्दीतील सर्व वाईट ठळक गोष्टींची माळा ह्यामध्यें गुंफिली आहे. पण लोक नको नको म्हणत असतांही कर्झनसाहेब, हिंदुस्थानचें कल्याण करण्याकरितां येणार, यांत संदेह नाहीं.

---

# हृदयाविष्करण : : : १६

काळ : अग्रलेख, ता. ७।१०।१९०४

● मूळ लेखास मथळा नाहीं. ग्रेहवे प्रकरणामुळें आपल्याविरुद्ध उठलेल्या काहुराला या लेखांत काळकर्त्यांनीं उत्तर दिलें आहे. हिंदुस्थानांतील परकीय राजे व प्रजा यांचेमध्यें परस्परांबद्दल विश्वास असणें शक्य नसल्यामुळें आपल्या लेखाबद्दल सरकारास गैरविश्वास वाटूं नये म्हणून जेवढी खबरदारी राज्याच्या व कायद्याच्या स्थितींत ठेवणें जरूर आहे तेवढी काळकर्त्यांनीं प्रस्तुत लेखांत ठेवली नाहीं; असें करून त्यांनीं आपणांस विनाकारण सरकारच्या संशयास पात्र करून घेऊं नये, असें टिळकांनीं काळकर्त्यांनाही बजावलें होतें. असेच उद्गार काळकर्त्यांच्या अनेक हितचिंतकांनींही काढले होते. या लेखाच्या शेवटीं काळकर्त्यांनीं आपल्या मित्रांची व व्यवसाय-बंधूंचीही संभावना करून आपली निष्ठाप्रतिज्ञा स्पष्टपणें जाहीर केली आहे.

सूर्यास्त होऊन जिकडे तिकडे रात्र पडल्यानंतर त्या रात्रीचा काळोख जर असें म्हणूं लागला कीं, आतां हें सर्व जग माझ्या ताब्यांत आलें आहे, आणि हें माझें अस्तित्व त्रिकालाबाधित अशा रीतीनें कायम रहाणार व सत्य ठरणार आहे, तर त्याच्याशीं वाद करण्यांत काय हशील आहे ? तेवढी रात्र संपेपर्यंत स्वस्थच बसलें पाहिजे. सकाळच्या दहिंवराचा बिंदु पडला आणि सूर्य-किरणांमध्यें चमकत असतां तो म्हणूं लागला कीं, मी मोतीं आहें, तर त्या बिंदूपाशीं भांडत बसून काय अर्थ आहे ! एखादी वाऱ्याची झुळूक येईपर्यंत वाट पहातच बसलें पाहिजे. वाऱ्यानें पान हलून त्यावरील दहिंवराचा बिंदु

खालीं गळून पडला म्हणजे त्याच्या मौक्तिकत्वाविषयींचा वाद आपोआपच आटपला! थंडीच्या दिवसांत उषःकाळच्या समयीं सर्व प्रदेश झांकून टाकणाऱ्या धुक्यानें असें प्रतिपादन केलें कीं, मी हे जे आपले बाष्पमय कण चोहोंकडे पसरीत आहें, तेच कायम टिकणार, आणि तेच सत्यत्व पावणार, तर त्या धुक्याच्या वाफेबरोबर वितंडवाद घालीत बसून आपल्या तोंडाची वाफ फुकट दवडण्यापासून काय अर्थनिष्पत्ति व्हावयाची आहे? सूर्याचे किरण प्रखरता पावेपर्यंत कांहीं वेळ मुग्धता स्वीकारली असतां ती केवळ अप्रासंगिकच होते असें नाहीं. आपण त्या धुक्याशीं सकाळच्या प्रहरीं छाती फुटेपर्यंत भांडलों, तरी देखील जें काम व्हावयाचें नाहीं, तें नऊ दहा वाजण्याच्या सुमाराच्या सूर्यप्रकाशानें सहज होणारें असतें. तेव्हां आपल्यासाठीं जर प्रत्यक्ष सूर्य नारायण असल्या धुक्याशीं भांडणार आहे व त्या धुक्याचें एका क्षणांत निरसन करणार आहे, तर मग अशा स्थितीमध्यें त्या धुक्याच्या म्हणण्याच्या सत्यत्वाविषयीं किंवा असत्यत्वाविषयीं आपण श्रम कशाला घ्यावे? अशा प्रसंगीं स्वस्थ बसणें हेंच एका दृष्टीनें श्रेयस्कर असतें. वरील उदाहरणांवरून एवढा एक बोध घेण्यासारखा आहे कीं, बहुतेक गोष्टींतील असत्यपणा कांहीं थोड्याशा अवकाशानें आपोआपच गळून पडतो. त्याच्या खंडनासाठीं निराळा प्रयत्न नको असतो. कांहीं अवधि जाणें हें असत्याचें असत्य स्वरूप सर्वांपुढें आविष्कृत होण्याला पुरेसें औषध आहे. याच्यापेक्षां जास्त उपचाराची त्याला आवश्यकता आहे, असें नाहीं. टाइम्सनें आपल्या १९ सप्टेंबरच्या अंकांत आमच्याविरुद्ध जो एक निर्मूलक, भ्रामक आणि असत्य आक्षेप आणला आहे, त्या आक्षेपाचीही वर दिलेल्या उदाहरणासारखीच स्थिति आहे. टाइम्सचा आमच्यावर मुख्य कटाक्ष ता. २ सप्टेंबरच्या आमच्या अंकांतील कित्येक स्फुटलेखांबद्दल आहे. या ता. २ सप्टेंबरच्या अंकांत आम्हीं काय लिहिलें आहे, आणि त्यावर टाइम्सनें आपली काय करामत केली आहे, वगैरे गोष्टी आतां बहुतेक वाचकांच्या पुढें आलेल्याच आहेत. तेव्हां त्यांचें पुनरुच्चारण करण्याची आवश्यकता आहे, असें नाहीं. टाइम्सचें असें म्हणणें आहे कीं, रशियामध्यें एम्. डी. प्लेह्वे ह्यांचा जसा खून झाला, तसा हिंदुस्थानांत कर्झनसाहेबांसंबंधानें प्रकार व्हावा, अशाबद्दल आम्हीं लोकांना चिथविलें आहे. हा टाइम्सचा आक्षेप होय. समर्थांनीं असा

अक्षेप घेतल्यावर त्यांच्याशीं काय मांडावयाचें ? रात्रीचा काळोख, दहिंवरचा बिंदु आणि हेमंत ऋतूंतील धुकें यांच्याशीं आपण गरीब झगडण्याला किती पुरणार ! अरुणोदय, वारा आणि प्रखर सूर्यप्रकाश हीं ईश्वराच्या घरचीं महाभूतें आपल्या मदतीला येईपर्यंत आपण स्वस्थच बसलें पाहिजे, अशी आमची अल्प समजूत आहे ! कर्झनसाहेबांच्या जीविताविरुद्ध आम्हीं लोकांना चिथविलें, असा टाइम्सकारांचा आक्षेप आहे ! ठीक आहे. याच्यावर कांहीं वेळपर्यंत मौनव्रत धारण करणें हेंच आमचें गरिबाचें उत्तर ! कर्झनसाहेब विलायतेहून येऊन कलकत्त्यास सुरक्षित पोंचेपर्यंत आपण मौनव्रत धरून बसणें हा वकील, आमची बाजू जितकी उचलून धरील, तितकी रोज हजार रुपये देऊन एकादा इंग्लिश बॅरिस्टर आणला, तरी तोही उचलून धरूं शकणार नाहीं. कर्झनसाहेब विलायतेहून हिंदुस्थानच्या किनाऱ्यावर आले, आणि किनाऱ्यावरील मंडपामधून कलकत्त्याच्या आपल्या राजवाड्यामध्यें सुरक्षितपणें जाऊन पोहोंचले, म्हणजे टाइम्सनें आपले सात कॉलम, नव्हे सत्तर कॉलम खर्च केले असले, तरी ते आपोआप निष्फळ होणार ! तेव्हां फक्त कालावधीसारख्या स्वल्प उपायानें जर आपला मोठा कार्यभाग अनायासानें सिद्ध होण्यासारखा आहे, तर मग व्यर्थ यातायात कशाला करावी ? ह्या बऱ्या किंवा वाईट समजुतीवर स्वस्थ बसणें हेंच आम्हांला श्रेयस्कर वाटत होतें. टाइम्सनें जेव्हां १९ तारखेस सकाळीं हातांत चूड घेतली, त्या वेळीं लेडी कर्झन आजारी पडल्याची बातमी हिंदुस्थानांत आलेली नव्हती. कर्झनसाहेबांची हिंदुस्थानांत येण्याची तारीख बहुतेक ठरलेली होती. त्याप्रमाणें त्या तेवढ्या थोड्याशा मुदतींत ते येऊन सुरक्षितपणें कलकत्त्यास जाऊन पोहोंचते म्हणजे आमचें काम परस्परच भागत होतें. त्या वेळच्या स्थितीप्रमाणें आणि अदमासाप्रमाणें ह्या गोष्टी होऊन जाण्याला पंधरा वीस दिवसांची मुदत बस्स होती, व तेवढ्या वेळपर्यंत आपण स्वस्थ बसलों, म्हणजे आपल्यावरील आक्षेपकांनाच त्यांनीं काढलेल्या आक्षेपांचें वैयर्थ्य कळून येईल, अशी आम्हांला खात्री होती, व म्हणूनच आम्ही कर्झनसाहेब येऊन सुरक्षित जाईपर्यंत कांहीं एक न बोलण्याचा विचार ठरविला होता. परंतु लेडी कर्झन यांच्या आकस्मिक आजारामुळें ह्या सगळ्या परिस्थितीमध्यें बदल झाला आहे. लेडी कर्झन यांची प्रकृति अजून बरीच अस्वस्थ आहे,

आणि त्यामुळें कर्झनसाहेबांचें येणें बऱ्याच लांबणीवर पडल्यासारखें दिसत आहे. तेव्हां इतक्या अवधीपर्यंत आपण या प्रश्नाबद्दल मुग्धच असावें कीं काय, असा प्रश्न साहजिकपणेंच पुढें आला. पंधरा वीस दिवसांची गोष्ट निराळी होती, परंतु असल्या आक्षेपाखालीं एक दोन महिनेपर्यंत तरी मौनव्रत धारण करणें हितकारक नाहीं. इतके दिवसपर्यंतही मौन धरून दिनावधी-कडून आपल्यावरील आक्षेपाचें अपनयन करविण्यामध्येंही आमचें कांहीं बिघडत होतें असें नाहीं. परंतु तें धोरण टाकून देण्याला मध्यंतरीं दुसरींही अनेक कारणें दिवसेंदिवस जास्त वाढत चाललीं आहेत. तीं कारणें कोणतीं, याच्याबद्दल पुढें उल्लेख येणारच आहे, तेव्हां त्यांबद्दल येथें विस्तार अनवश्यक आहे. प्रस्तुतसारख्या प्रसंगीं आपलें म्हणणें काय आहे, हें योग्य वेळेच्या आधीं बाहेर पडणें फारसे श्रेयस्कर नाहीं. परंतु हल्लीं आपल्या देश-बांधवांपैकींच हितमित्र या वर्गांत मोडणाऱ्या मंडळींकडून उघडपणें आणि खाजगी रीतीनें टीकेचा जो भडिमार चालू झाला आहे, त्यामुळें इत:पर मुग्ध बसण्याची सोयच उरली नाहीं. मुग्ध बसावें तरी तोटा, आणि न बसावें तरी तोटा, अशा विलक्षण स्थितीमध्यें परकीयांनीं आणि स्वकीयांनींही आणून टाकल्यामुळें कांहीं गोष्टींसंबंधानें हृदयाविष्कारण करणें अपरिहार्य झालें आहे.

टाइम्सचा आमच्यावर आक्षेप काय आहे, तो वर सांगितलाच आहे. हा आक्षेप अगदीं निराधार आहे. कर्झनसाहेब कलकत्त्यास सुरक्षित जाईपर्यंत आपण स्तब्ध बसावें, म्हणजे या आक्षेपाचें आपोआप परिहरण होत आहे, असें जें आम्हीं वर म्हटलें आहे, त्यांतीलसुद्धां बीज हेंच आहे. संशयग्रस्त झालेल्या युरोपियन अधिकाऱ्यांच्या मनाला जी भीति वाटत आहे, ती सर्वथैव चुकीची आहे. इंग्रजी अधिकाऱ्यांना जी भीति वाटत आहे, तशी गोष्ट सत्त्व-गुणप्रेरित मनोवृत्तीच्या हिंदुस्थानांत कधींही घडावयाची नाहीं, अशी आम्हां हिंदुस्थानांतील लोकांना पूर्ण खात्री आहे. इंग्लिश लोक कितीही घमेंड मारीत असोत, परंतु आमच्या लोकांचीं मनें आम्हां लोकांना जितकीं समजतात, तितकीं इंग्लिशांना खात्रीनें समजत नाहींत, आणि त्यावरून आम्ही असें म्हणतों कीं, अशी गोष्ट हिंदुस्थानांत कधींही घडावयाची नाहीं. हिंदुस्थानांतील लोकांचें एका दृष्टीनें जर कोणी एखाद्या गव्हर्नर जनरलनें

अतिशय नुकसान केलें असेल, तर तें लॉर्ड डलहौसी यांनीं केलेलें आहे. परंतु तेसुद्धां आठ वर्षांच्या अवधींत जवळजवळ आठ राज्यें बुडवून जाऊं लागले असतांही हिंदुस्थानांतून सुरक्षित गेले, तर लॉर्ड डलहौसीच्या पासंगालाही ज्यांची राजकीय कमाई लागावयाची नाहीं, त्या कर्झनसाहेबांबद्दल —आणि खरोखरच ज्यांच्या अंगामध्यें लोकप्रिय होण्यासारखे अनेक गोडगोड गुण आहेत त्यां कर्झनसाहेबांबद्दल—असे कुविचार कोणाच्या मनामध्यें येतील, असें आम्हां हिंदुस्थानांतील लोकांना कधीं स्वप्नांत सुद्धां वाटत नाहीं. गव्हर्नर जनरलवर हिंदुस्थानांत असा भयंकर प्रसंग आल्याचें काय तें फक्त एकच उदाहरण आहे. परंतु लॉर्ड मेयो हे एका गुन्हेगाराच्या खाजगी द्वेषाला बळी पडलेले आहेत. जी सार्वजनिक हिताहिताची बुद्धि कित्येक संशयी अधिकारी आम्हां लोकावर लादीत आहेत, ती आमच्यामध्यें मूळचीच नाहीं व यापुढेंही ती उत्पन्न होण्याचा संभव नाहीं. इंग्रजी राज्य येथें इतक्या सुरळीत रीतीनें चाललें आहे, हेंच आम्ही म्हणतों याचें प्रत्यंतर आहे. याच्यापेक्षां आणखी काय पुरावा पाहिजे? शिवाय अशी गोष्ट होणारच नाहीं, असें जें आमच्या मनाला खात्रीपूर्वक वाटत आहे, त्याचें दुसरें कारण असें आहे कीं, आमचें मन निरपराधी आहे. आणि अशा मनाला जें वाटत असतें, तेंच खरें ठरत असतें! ह्या मागील इतिहासावरून आणि येथील लोकांच्या स्वभावाच्या परिज्ञानावरून आम्ही खात्रीनें सांगतों कीं, या प्रश्नासंबंधानें सांप्रतच्या अधिकाऱ्यांनीं जी कुकल्पना आपल्या डोक्यामध्यें शिरवून घेतली आहे ती अगदीं खोटी, निराधार आणि अंतीं त्यांना तोंडघशीं पाडणारी अशी आहे.

हिंदुस्थानांतील लोकांची स्वाभाविक प्रवृत्ति असल्या नीच कामीं किती पराङ्गमुख असते, हें वर सांगितलेंच आहे. अशा लोकांना चिथवण्याबद्दलचा टाइम्सचा आमच्यावर आक्षेप आहे! त्याबद्दल थोडासा विचार करूं. ह्या प्रकरणांत टाइम्सच्या कागदाच्या आड कोण कोण मंडळी आहेत, हें समोर आणि सरळ पाहणाराला दिसत नाहीं हें खरें. परंतु तेथें जी कोणी मंडळी असतील, त्यांत पोलिसपैकीं कोणी नसतील, असें संभवत नाहीं. टाइम्सकार तर सर्वज्ञच आहेत! परंतु पोलिस मंडळीसुद्धां खून वगैरे पकडण्याच्या नेहमींच्या व्यवसायामुळें त्यासंबंधींच्या माहितीमध्यें पूर्णपणें वाकबगार झालेली

असतात. अशा मंडळींना आणि टाइम्सकारांसारख्या सर्वज्ञ गृहस्थांना खून कसे करविले जातात, याबद्दलची चांगली माहिती असली पाहिजे. आम्ही असल्या नीच कामांत आज शके १८२६ सालांतील भाद्रपद वद्य १३ पर्यंत तरी निदान अनभ्यस्त आहों. तरी पण मनुष्यस्वभावाची जी थोडीबहुत माहिती प्रत्येक मनुष्याला ईश्वराच्या कृपेनें मिळालेली असते, तिजवरून पाहतां खून अशा रीतीनें तयार केले जात असतील, असें आम्हांला वाटत नाहीं. खून ही गोष्ट गुप्त रीतीनेंच घडवून आणिली जात असली पाहिजे. जें पत्र हजारों लोकांच्या हातांमध्यें जावयाचें, त्यामध्यें खुनाचा उल्लेख करून खून घडवून आणण्याचा दुसऱ्यावर आक्षेप करणें, म्हणजे जगांतलें सगळें शहाण-पण आपल्याचपाशीं आहे, आणि दुसऱ्यांच्या वांटणीला कांहींच आलें नाहीं, असें समजण्यासारखें आहे. एखाद्यावर जर असला भयंकर आक्षेप करावयाचा असेल, तर त्या कृत्याला अवश्य लागणारें शहाणपण त्याच्याजवळ आहे, असें तरी निदान कबूल केलें पाहिजे. आणि तेवढें शहाणपण बाळगण्याची जर त्याला परवानगी असेल, तर ह्या शहाणपणानें युक्त असलेला तो मनुष्य आपला इष्ट हेतु ( तो जर त्याला इष्ट असेल तर ) साधण्यासाठीं दिवसा ढवळ्या राजरोसपणें हजारों लोकांपुढें मांडल्या जाणाऱ्या वर्तमानपत्रांतून तो हेतु कधींही लिहिणार नाहीं. तो रात्रीचा फिरेल; तो काळोखांतून जाईल; तो रात्रींच्या वाटसरूंच्या पावलांला दचकेल आणि कंदिलाच्या उजेडाला भिईल. जेथें दुसरा कोणी ऐकावयाला नाहीं, अशा एखाद्या निर्जन अरण्यांत किंवा भयाण स्मशानांत, मध्यरात्रीच्या काळोखांत असल्या अधम कामांत त्याला जर कोणी अधमतम साथीदार असेल, तर त्याला—त्याला सुद्धां नव्हे, तर फक्त त्याच्या कानाला—तो आपला हेतु सांगेल. सूर्यप्रकाशांत प्रसिद्ध होणाऱ्या वर्तमानपत्रामध्यें असली गोष्ट प्रसिद्धपणें लिहिली जाते, ह्यावरूनच आपला संशय आणि कुतर्क अनाठायीं आहे, हें या आक्षेपकांना समजावयाला पाहिजे होतें. पोलिसमधील अधिकारी यांना मनुष्यस्वभावामधील इतकी साधी गोष्ट-सुद्धां समजूं नये, आणि पोलिसच्या कामांत आपण फार हुषार आहों असें म्हणून पगारादाखल त्यांनीं लोकांचे ओंझींच्या ओंझीं पैसे घ्यावे, ही मोठी लज्जास्पद गोष्ट आहे ! ज्याला असलें कृत्य करावयाचें आहे, तो तें गुप्तपणानें करतो, हें गुन्ह्यांच्या तत्त्वज्ञानांतील पहिलें तत्त्व—हीं मुळाक्षरें—हा ओनामासुद्धां

बऱ्या बऱ्या कामगारांच्या लक्षांत येऊं नये, ही मोठ्या खेदाची आणि दुर्दैवाची गोष्ट आहे. आम्हीं चिथविलें असा आक्षेप आहे, पण आम्हा कोणाला चिथविलें ! असें वाऱ्यावर बोलून किंवा लिहून खुनाचीं कामें होत असतात काय ? असें जर टाइम्सकारांना किंवा पोलिसांना वाटत असलें, तर त्यांनीं आजपर्यंत जगांत घालविलेलीं वर्षें निवळ वायां दवडिलीं असेंच म्हटलें पाहिजे. आम्ही चिथवितों असें गृहीत धरलें, तरी आम्ही चिथविल्या-बरोबर चिथविला जाणारा असा एवढा कोण वेडापीर किंवा महात्मा आमच्या मुठीमध्यें आहे ? प्रत्येकाला आपल्या जिवाची आणि सुखदुःखाची कांहीं तरी काळजी आहे. ह्या सगळयावर नुसत्या एखाद्या वर्तमानपत्रांतील एखाद्या दिवशींच्या एखाद्या लेखानें कोण उदार होणार ? सद्‌गृहस्थहो, जग अजून इतकें भोळें झालेलें नाहीं. निदान आमच्या लिहिण्यांत इतकी शक्ति आहे, असें आम्हांला निदान अजूनपर्यंत तरी वाटत नव्हतें व आतांही वाटत नाहीं. आणि वर्तमानपत्रांतून प्रसिद्ध करून जर असलीं कृत्यें घडून येत असतील, तर टाइम्स वगैरे वर्तमानपत्रांतील प्रसिद्धीवरही त्याबद्दलची जबाबदारी येऊन पडणें अपरिहार्य आहे. सारांश, असलीं अपेक्षित कामें ज्याला करावयाचीं असतात, तो तीं वर्तमानपत्रामध्यें प्रसिद्ध करीत नसतो. आणि असल्या कृत्यांबद्दल वर्तमानपत्रांतून कोणीं कितीही कोरड्या चिथावण्या दिल्या असें मानलें, तरी त्यांच्या योगानें चिथवला जाण्याइतका मूर्ख मनुष्य कोणीही नसतो, ही गोष्ट सर्वांनीं लक्षांत बाळगिली पाहिजे. परंतु दुर्दैव आहे कीं, सरकारला असल्या बाबतींत एकदां अद्दल घडलेली असूनही, फिरून सरकारचे हातून तीच चूक घडविण्याचे यत्न चालले आहेत. १८९७ सालांत येथील विठोबाचे देवळांत अफझुलखानाच्या वधाबद्दल जी वाटाघाट झाली, त्यामुळेंच रँडसाहेब परलोकवासी झाले, असें त्या वेळीं सरकारला वाटत होतें. तें चुकीचें माप त्या वेळच्या वस्तुस्थितीवरून त्यांच्या पूर्ण पदरांत पडलेलें आहे. असें असूनही फिरून तेच टाइम्सकार आणि त्यांचे तेच मदतगार त्याच सरकारला त्याच चुकीकडे सध्यां खेचून नेत आहेत, हें आश्चर्य नव्हे काय ?

वर दिलेल्या गोष्टी सगळ्या खऱ्या. परंतु अलीकडच्या कायद्यानें मंडित झालेला एखादा पंडित, आपल्या विजारीच्या दोन बाजूंच्या दोन खिशांत दोन हात घालून डुलत डुलत असें म्हणावयाला चुकावयाचा नाहीं कीं, तुमच्या

लिहिण्यानें कोणीही मनुष्य चिथविला जाणें शक्य नाहीं हें तुमचें म्हणणें खरें आहे; परंतु कोणी तरी चिथविला जावा असा तुमचा हेतु नव्हता कशावरून? नुसत्या लिहिण्यानें कोणीही मनुष्य चिथविला जाणें अशक्य आहे, हें ज्ञान आम्हाला असणें शक्य आहे, असें तुम्ही कबूल करतां, एवढ्यावरूनच आमचा हेतु तसा नसला पाहिजे, असें आमचें वरील प्रश्नाला उत्तर आहे. परंतु आमचा असा हेतु असला पाहिजे, असें टाइम्सनें गृहीत धरलें असल्याचें दिसत आहे. मनकवडेपणा ही एक हिंदुस्थानांतील रानटी आणि बिनसुधारलेल्या नेटिव्ह लोकांमधील काल्पनिक चीज आहे, अशी आमची आजपर्यंत समजूत होती. परंतु टाइम्सकारांसारख्या धर्मभोळेपणांतून दहा हात वर निघालेल्या आणि सुधारलेल्या इंग्रजी गृहस्थांना ही विद्या साध्य झालेली आहे, हें पाहून मनकवडेपणावरील डळमळूं लागलेला कोणाचाही विश्वास फिरून तेथें दृढ झाल्यावांचून रहाणार नाहीं. टाइम्सकारांना आमच्या मनांतील हा हेतु कसा काय कळला असेल तो असो! परंतु आमचा तसा हेतु नाहीं, अशाबद्दल आमच्यापाशीं कांहीं एक दोन गोष्टी आहेत. त्यांकडे कोणीच कांहीं लक्ष देणार नाहीं असें नाहीं. किंवा त्या कोणालाच कांहीं पटणार नाहींत असेंही नाहीं; व म्हणूनच त्या त्यांच्यासाठीं खालीं सादर करून पाहतों. एम्. डी. प्रेहवे यांच्याबद्दलचें स्फुट आणि लॉर्ड कर्झन यांच्याबद्दलचें स्फुट यांची सांखळी एकमेकांत अडकविलेली आहे. या वाळूवर विरुद्ध बाजूनें आपली इमारत रचिली आहे. प्रस्तुतचा लेख हृदयाविष्करणाच्या स्वरूपाचा असल्याचें वर एकदां दिग्दर्शन केलें आहे. त्यामुळें पुढील गोष्ट लिहिली असतां ती हृदयाविष्करणामध्यें खपून जाण्याला अडचण पडणार नाहीं. लाहोरच्या कॉंग्रेसच्या वेळीं हल्लीचे न्यायमूर्ति चंदावरकर हे अध्यक्ष होते. कॉंग्रेसच्या अध्यक्षांचें भाषण म्हणजे त्या वर्षामध्यें घडलेल्या एकंदर गोष्टींचें परीक्षण होय. हें परीक्षण अध्यक्ष चंदावरकर यांनीं जें केलें आहे, त्यामध्यें जरी अगदीं भिन्न भिन्न विषय एकापुढें एक आलेले आहेत, तरी ते लोकांपुढें मांडतांना त्यांनीं अशा प्रकारची भाषाशैली उपयोगांत आणलेली आहे कीं, एका विषयामधून दुसरा विषय स्वाभाविकपणेंच उत्पन्न होत चालला आहे, असा श्रोत्यांच्या मनाचा ग्रह होतो. रिव्ह्यू ऑफ रिव्ह्यूजचे कर्ते मि. स्टेड हे आपल्या मासिकपुस्तकामध्यें "प्रोग्रेस ऑफ दि वर्ल्ड" या सदराखालीं प्रत्येक

महिन्याला कांहीं स्फुट लेख लिहीत असतात. त्यांची पद्धतही अशीच आहे. प्रत्येक महिन्यांत काय काय विशेष गोष्टी झाल्या आणि काय काय विशेष मतें पुढें आलीं, तीं सगळीं एकत्र करून, केळीच्या एका पानांतून दुसरें पान निघतें त्याप्रमाणें कदलीदलन्यायानें किंवा मालापुष्पन्यायानें एकापुढें एक मांडावयाचीं, असा स्टेड साहेबांचा बहुतेक वेळां परिपाठ असतो. वास्तविक जगाच्या घडामोडींतील भिन्न भिन्न विषय एकमेकांपासून असंबद्धच असतात. परंतु एकाचा शेवट दुसऱ्याच्या आरंभाला थोड्याशा भाषापद्धतीच्या खुबीनें चिकटवून दिला तर तो प्रकार अधिक गोड दिसतो, व तसाच क्रम काळांतील स्फुट लेखांमध्यें पाळण्यांत येतो. हा क्रम दोन सप्टेंबरच्या अंकाकरितांच स्वीकारलेला दिसत होता असें नाहीं. ज्यांना काळाचे दुसरे अंक पाहण्याची सवड झाली असेल किंवा होईल, त्यांना असें आढळून येईल कीं, ही लेखनपद्धति काळांत अनेक प्रसंगीं उपयोगांत आणली गेलेली आहे. जे स्थानिक किंवा क्षुद्रविषयें असतील ते सोडून देऊन प्रत्येक आठवड्यांतील ठळक ठळक गोष्टी आणि मतें होतां होईतोंपर्यंत एकत्र गुंफून त्यांचा सुवासिक गुच्छ आपल्या वाचकांच्या हातामध्यें द्यावा, असा बहुधा नेहमीं काळाचा एक अत्यंत नम्र प्रयत्न असतो, ही एक गोष्ट निःपक्षपाती न्याय निवडणारांनीं लक्षांत ठेवण्यासारखी आहे. बाकी असली मोठमोठ्या लोकांची भाषाशैली आणि लेखनपद्धति आमच्यासारख्या एकाद्या क्षुद्र आणि 'Rag' या नांवाखालीं मोडणाऱ्या वर्तमानपत्राला उचलण्याचा अधिकार नाहीं व अशी पद्धत उचलणें हाच मुळीं गुन्हा आहे हें आमच्या लक्षांत आहे! तरी पण एक वस्तुस्थिति पुढें ठेविली आहे. ती कोणाला रुचल्यास पहावी!

दुसरी गोष्ट अशी कीं, जो ज्याचा हेतु असतो तो त्याच्याचवर फक्त अवलंबून असतो. तो मनुष्य आणि त्याचा तो हेतु यांच्यामध्यें नेहमीं अव्यभिचारानें साहचर्य पाहिजे, हा एक मनाचा अप्रतिबाधित नियम आहे. जो हेतु आमच्यावर आक्षिप्त केला जात आहे, तो हेतु अशा प्रकारचा नाहीं. आम्हीं ता. १ सप्टेंबरच्या अंकांत जे स्फुट लेख लिहिले आहेत, आणि जे हल्लीं वादविषय झालेले आहेत, ते लेख आमच्या मनांत कांहीं विशिष्ट हेतु होता म्हणून आम्हीं लिहिले, असें आमच्या आक्षेपकांना कसें म्हणतां येतें,

हें त्यांचें त्यांनाच माहीत ! वस्तुस्थिति थोडी लक्षांत घेतली तर कोणालाही असें कबूल करावें लागेल कीं, आमचे ते स्फुट लेख हेतुमूलक नसून केवळ यदृच्छामूलक आहेत. वस्तुस्थिति अशी आहे कीं, आम्हीं एम्. डी. प्रेहवे यांच्या संबंधानें जीं स्फुटें लिहिलीं आहेत तीं 'रेनॉल्डस् न्यूजपेपर' मधील लेखाच्या आधारावर लिहिलेलीं आहेत, व कर्झनसाहेबांच्या बद्दलचें स्फुट हें इंडियापत्रांतील 'इंडियन' या सहीच्या एका पत्रव्यवहाराच्या आधारावर लिहिलें आहे. पैकीं 'रेनॉल्डस् न्यूजपेपर' हा ऑगस्टच्या १४ तारखेचा आहे. आणि इंडियाचा अंक ऑगस्टच्या १२ व्या तारखेचा आहे. हीं दोन्ही पत्रें विलायतेस छापलीं जातात व तेथून आगबोटींत बसून तीं मुंबईवरून पुण्याला येतात. हीं दोन्हीं पत्रें विलायतच्या एकाच मेलनें ता. २७ ऑगस्ट रोजीं संध्याकाळीं पुण्यास येऊन पोहोंचलीं, व त्यांतील मजकुराचा आम्हीं दोन सप्टेंबरच्या अंकामध्यें उतारा दिला. वर हें सांगितलेंच आहे कीं, 'रेनॉल्डस् न्यूजपेपर' आणि 'इंडिया' हीं पत्रें विलायतेस अनुक्रमें ता. १४ आणि १२ या दिवशीं छापलीं गेलीं आहेत. त्यापूर्वीं आम्हीं त्यांना कधीं पत्र लिहिलें असल्याचें आम्हांला स्मरत नाहीं ! ता. २ सप्टेंबरच्या अंकांत कर्झनसाहेबांच्या जीविताविरुद्ध लोकांना चिथविण्यासाठीं तीन-चार कॉलम मजकूर लिहिण्याचा आमचा हेतु आहे, याकरितां आपण ( रेनॉल्डस् न्यूजपेपर ) रशियांतील सेंट्रल कमेटीचा जाहीरनामा आपल्या पत्रामध्यें मेहरबानी करून छापावा, व आपण ( इंडिया ) कर्झन-साहेबांबद्दलचें 'इंडियन' चें अनावृत्त पत्र कृपा करून प्रसिद्ध करावें, असें पत्र आम्हीं या पत्रकारांपैकीं कोणालाहि पाठविलें नव्हतें ! पण टाइम्सला आणि पोलिसला तशी वर्दी लागली असली पाहिजे असें दिसतें ! एरवीं त्यांच्यासारख्या चाणाक्ष मनुष्याच्या हातून एवढी ढोबळ चूक व्हावयाची नाहीं ! काकतालीय न्यायानें हे दोन्ही लेख आम्हीं एके ठिकाणीं घातले. ऑगस्टच्या २७ तारखेच्या मेलनें प्रेहवे आणि कर्झन यांच्या हकीकती आल्या म्हणून आम्हीं त्या घातल्या. त्या आल्या नसत्या, तर आम्हीं त्या घातल्या नसत्या, किंवा प्रेहवे आणि कर्झन यांच्या हकीकती न येतां दुसऱ्या एखाद्या गोम्याच्या आणि सोम्याच्या हकीकती येत्या, तर कदाचित् त्या गोम्यांच्या आणि सोम्यांच्या एकत्र मांडल्या असत्या. अशी जेथें स्थिति आहे, आणि जेथें यदृच्छेवर आणि काकतालीय न्यायावर गोष्टी जुळून येत

आहेत, तेथें त्यामध्यें अमुकाचा अमुकच हेतु होता असें म्हणण्याचा अविचार टाइम्स किंवा पोलिस यांच्याशिवाय दुसरा कोण करणार आहे? यामध्यें आमचा हेतु होता असें जर म्हणावयाचें असेल, तर हा ता. २ सप्टेंबरचा लेख लिहिण्याकरितां आमच्यासाठीं एम्. डी. ग्रेहवेचा खून करण्याची आणि कर्झनसाहेबांना विलायतेस पाठविण्याची देवानें योजना केली होती असेंहि कां म्हणूं नये? तात्पर्य, यांत आमचा हेतु नाही. ही केवळ यदृच्छा आहे. नदीच्या पुरामध्यें दोन काष्ठें यदृच्छेनें एकत्र होतात आणि फिरून तीं दोन दोहोंकडे वहात जातात, तद्वत् या जगाच्या घडामोडींत ग्रेहवे आणि कर्झन यांची या ठिकाणीं यदृच्छेनें अकस्मात् गांठ पडली आणि फिरून ते दोन दोहींकडे वाहून गेले, ह्यांत काळाचा कांहीं एक हेतु नाहीं. परंतु समंजस म्हणून मानल्या जाणाऱ्या मनुष्यांना हा काळाचा खोडसाळपणाच आहे असें वाटल्यावांचून रहावयाचें नाहीं, अशी आम्हांला खात्री आहे! असो. परकीय लोकांनीं एका बाजूनें आणि स्वकीय लोकांनीं दुसऱ्या बाजूनें खेंचाखेंची सुरू केल्यामुळें या विषयासंबंधानें अवेळींही कांहीं प्रत्युत्तरें देणें भाग पडलें आहे, म्हणून कांहीं थोड्याशा मुद्याच्या गोष्टी वर दिलेल्या आहेत. कांहींच न सांगावें तरी पंचाईत आणि सर्वच सांगावें तरी पंचाईत, अशा स्थितीमध्यें काहीं ठळक ठळक तेवढ्या गोष्टी मात्र वर प्रदर्शित केलेल्या आहेत व याच्यापेक्षां जास्त निखालस महत्त्वाच्या गोष्टी आजच सर्वांच्या पुढें आणून मांडणें अहितकारक आहे म्हणून तसें केलें नाहीं, याच्याबद्दल वाचकांनीं क्षमा करावी. वर दिलेल्या गोष्टी हा कांहीं पुरावा नव्हे. हें हृदयाविष्करण आहे. पुरावा ही वस्तु तुच्छ, आणि खालच्या पायरीवरची होय; हृदयाविष्करण ही पुराव्याच्या फार वरची पायरी आहे. हा भेद कोणींही विसरतां कामा नये!

आतां कोणी असें म्हणेल कीं, एकाच मेलमधून रेनॉल्डस् न्यूजपेपर आणि इंडिया हीं दोन पत्रें आलीं, येथपर्यंत यदृच्छेचें म्हणणें जुळतें, व तेथपर्यंत कांहीं हेतु नव्हता असें कबूल केलें पाहिजे, हें खरें. परंतु तारीख २७ ऑगस्टला तीं दोन्हीं पत्रें आल्यानंतर त्यांतील ते दोन्हीं लेख वाचून मग प्रस्तुतचा हेतु मनामध्यें उत्पन्न झाला नसेल कशावरून, अशी शंका येते, व त्या शंकेचें निवारण वरील हकीकतीनें होत नाहीं. ही शंका बरोबर आहे, व या शंकेच्या

निरसनासाठींही आमच्यापाशीं पुरावा आहे. टाइम्सला ज्या कोणी सज्जनांनीं भाषांतरें दिलीं त्यांनीं त्याला एक प्रकारें फसविलें आहे. सर्व भाषांतरें दिलीं असतीं तर टाइम्सला अशा रीतीनें फसण्याचा प्रसंग आला नसता. ज्या तारीख २ सप्टेंबरच्या अंकाबद्दल इतका गवगवा करण्यांत आला आहे, व ज्या अंकांतील प्रेह्वे आणि कर्झन यांच्याबद्दलचीं स्फुटें लिहिण्यांत आमचा हेतु असल्याचें प्रतिपादन करण्यांत येत आहे, त्याच्या आधींच्या अंकांतच खुद्द प्रेह्वेच्या संबंधानेंच लिहीत असतांना आम्हीं आपले त्या विषयासंबंधाचे पुढील विचार नमूद केलेले आहेतः—"वाइटापासून वाईटच उत्पन्न व्हावयाचें, ह्याकरितां असल्या मार्गापासून लोक जितके परावृत्त होतील तितकें चांगलें. युरोपमध्यें जे अनेक दुर्गुण माजले आहेत, त्यांतीलच हा एक आहे. आशियाखंड हल्लीं युरोपचें अनुकरण करीत आहे. त्यांत असल्या दुर्गुणांचें अनुकरण न होवो म्हणजे झालें." हें आम्हीं आपलें असल्या प्रकारांबद्दलचें स्पष्ट मत तारीख २६ ऑगस्टच्या अंकामध्यें दिलें आहे. तारीख २७ ला जी मेल मुंबईस आली त्या मेलमधील पत्रांतील दोन निरनिराळया लेखांचा संबंध (प्रतिपक्षाच्या म्हणण्याप्रमाणें) हेतुपुरस्सर जुळविण्याच्या आधीं, एम्. डी. प्रेह्वे यांच्या खुनावरून सारांश काढतांना असल्या गोष्टी आपल्या इकडे होऊं नयेत, असल्या वाईट गोष्टींचा वाईटच परिणाम व्हावयाचा, युरोपियनांच्या ह्या असल्या वाईट गोष्टी आम्हांला नकोत, असें आम्हीं स्पष्टपणें पुढील लेखाचा कांहीं एक मागमूस नाहीं अशा वेळीं लिहिलें असतांहि, आमच्यावर जर कोणाला असा दुष्ट हेतु लादावयाचा असेल, तर सरकार कर्तुमकर्तुमन्यथाकर्तुं समर्थ आहे असेंच म्हटलें पाहिजे ! दुसरें काय म्हणावयाचें !

असो. येथपर्यंत वादविषयक लेखामध्यें आमचा कांहीं एक हेतु नाहीं, हें यथाशक्ति दाखविलें आहे. आतां टाइम्सनें आमचे लेख लोकांपुढें मांडतांना काय काय करामती केल्या आहेत, याचें थोडक्यांत आविष्करण करूं. ता. २६ ऑगस्टच्या अंकामधून आम्हीं जो उतारा दिला आहे त्यावरून आमचा कांहीं हेतु नाहीं हें तर सिद्ध होतच आहे; पण असलीं युरोपियनांचीं नीच आणि अधम कृत्यें आम्हांला पूर्णपणें नापसंत आहेत, हेंहि व्यक्त होत आहे. असें असूनहि टाइम्सनें पुढील वाक्य लिहिलें आहेः—We are very much doubtful whether, in any city in the world

except Poona, any journalist had the wicked audacity to command the assassination as a "noble deed." वरील वाक्यांतील भावार्थ असा आहे कीं, एम्. डी. ग्रेहवे यांचा खून हें एक चांगलें कृत्य आहे असें म्हणणारा वर्तमानपत्रकार पुणें खेरीजकरून साऱ्या जगामध्येंहि दुसरीकडे कोठें सांपडणार नाहीं. आम्ही असल्या कृत्याला किती राईट मानितों हें वर दाखविलेंच आहे. आतां टाइम्सनें अवतरणचिन्हांत घातलेलें " noble deed " ( चांगलें कृत्य ) हे शब्द त्याला कोठून मिळाले हें पाहूं. हे शब्द अवतरणचिन्हांत घातलेले असल्यामुळें ते दुसरीकडूनच घेतलेले असले पाहिजेत, हें उघड होत आहे व ते टाइम्सनें आपल्या भाषांतरांतील The Central Committee...have openly accepted responsibility for the noble deed ' या वाक्यामधून घेतलेले आहेत. आतां वर दिलेलें इंग्रजी वाक्य हें " एम्. डी. ग्रेहवे यांच्या खुनाच्या सत्कर्माबद्दल आपण सर्व प्रकारें जबाबदार आहों असें जगाला जाहीर करण्याकरितां ही कमिटी पुढें आली आहे, " या आमच्या मराठी वाक्याचें भाषांतर आहे. या मराठी वाक्यांत आम्हीं सत्कर्म हा शब्द घातला आहे. पण हा आम्हीं आमचा म्हणून घातलेला नाहीं. रेनॉल्डस् न्यूजपेपर, लंडन टाइम्स, वगैरे पत्रांतून या गोष्टीबद्दल जेथें उल्लेख आहे, तेथें इंग्रजीमध्यें A righteous act ' असे शब्द आहेत. आणि त्यांचें मराठींमध्यें सत्कर्म हें भाषांतर आहे. यावरून टाइम्सच्या वर दिलेल्या आक्षेपामध्यें किती जोर आहे, हें कोणाच्याहि लक्षांत येईल. शिवाय दुसरी गंमत अशी आहे कीं, ज्या सेंट्रल कमिटीचीं वरील मतें प्रसिद्ध करण्याचे पापाबद्दल आमच्यावर एवढा गहजब उडविलेला आहे, त्याच कमिटीचीं तींच मतें ह्या हिंदुस्थानच्या टाईम्सनें ' लंडन मेल लेटर ' या सदराखालीं ऑगस्टच्या ११ तारखेच्या आपल्या स्वतःच्या अंकामध्येंहि बरींच दिलेलीं आहेत. अशा स्थितींत स्वाभाविकपणें आपण जशी एखादी गोष्ट करितों तशीच दुसऱ्या कोणीं केली असतां त्याच्यावर आग पाखडणें, हें कोणाचें काम आहे हें कोणाला माहीत असलें तरी त्याचें नामोच्चारण करूं नये !

टाइम्सचें दुसरें एक म्हणणें आहे कीं, " The writer openly avows at the commencement of the article that he has

reproduced the facts about the assassination because such murders have an educative value " ज्या मराठी वाक्यावरून हें वाक्य इंग्रजींत टाइम्सनें बनविलें आहे, तें वाक्य असें आहे कीं, "ती हकीगत आम्ही येथें देत आहों, याचें कारण असें कीं, त्यांत एक प्रकारचें शिक्षण आहे." वरील इंग्रजी वाक्यांत 'Educative value of murder' हे जे शब्द आहेत तेच टाईम्सनें आमच्या ता. २ सप्टेंबरच्या अंकांतील प्रेहत्ते आणि कर्झन यांसंबंधींच्या स्फुट लेखांच्या भाषांतराला हेडिंग म्हणूनहि दिलेले आहेत. ज्याला मराठीचा अर्थ समजतो आणि ज्यानें आमचे प्रस्तुतचे स्फुट लेख वाचले असतील त्याला त्या सर्व स्फुटांना मिळून हें एक हेडिंग देण्यामध्यें किती लबाडी, खोडसाळपणा आणि दुष्ट हेतु आहे, हें तेव्हांच कळून येईल. कर्झनसाहेबांबद्दल इंडियनच्या पत्रावरून आम्ही जें अगदीं स्वतंत्र असें स्फुट लिहिलें आहे, त्यांतील मजकूरही वरच्यांतच दडपून त्यालाही ' Educative value of murder ' हें हेडिंग लागूं करावयाचें, ही हातचलाखी कांहीं सामान्य नव्हे ! भाषांतरें देतेवेळीं टाइम्सनें हळूच एके ठिकाणीं म्हणून ठेविलें आहे कीं, The Headings to the articles are our own ( ह्या लेखांच्या भाषांतरांना दिलेलीं हेडिंगें आमचीं स्वतःचीं आहेत. ) परंतु एवढें म्हटलें म्हणजे तेवढयानें दोषनिर्मुक्ति होते असें नाहीं. ज्यांना मीमांसेंतील नियमांची थोडीबहुत माहिती आहे, त्यांना असल्या हेडिंगांपासून किती अनर्थ उत्पन्न करतां येतील हें सहज कळण्यासारखें आहे. हेडिंग म्हणजे मुख्य उद्देश होय. त्या हेडिंगाखालील सर्व वाक्यें तत्पर लावावयाचीं असें ओघानेंच प्राप्त होतें. ' Educative value of murder ' हें आपल्या पदरचें हेडिंग देऊन त्याच्याखालीं आमच्या लेखांचीं भाषांतरें देणें, म्हणजे काळाच्या ता. २ सप्टेंबरच्या लेखाचा तुम्ही अमुक अमुकच अर्थ करा, असा लोकांना अप्रत्यक्ष रीतीनें सरकारी हुकूम सोडण्यासारखेंच बळजबरीचें काम आहे ! बाकी थोरांनीं असें करण्याला कांहीं हरकत आहे असें आमचें मुळींच म्हणणें नाहीं ! इतर भाषांतरांवरील हेडिंगांसंबंधानेंही असाच अन्याय झालेला आहे, हें जे कोणी शांतपणानें पाहतील त्यांना दिसण्यासारखें आहे. असो. आता, अशा अन्यायानें आणि खोडसाळपणानें दिलेल्या हेडिंगापासून तरी टाइम्सचा किंवा दुसऱ्या कोणाचा

कितपत अर्थ साधला आहे, हें आपण पाहूं. "The writer openly avows" इत्यादि जें टाइम्सचें वाक्य वर दिलें आहे, त्यांत लोकांनी खून करावा, असें आम्हीं चिथविलें आहे, असें सुचविण्याचा आणि ध्वनित करण्याचा टाइम्सचा दुष्ट इरादा स्पष्ट होत आहे, परंतु अशा कृत्यासाठीं आम्हीं लोकांना चिथविलें आहे असें कसें निष्पन्न होतें आहे? 'त्यात एक प्रकारचें शिक्षण आहे,' ( educative value of murder ) असें आम्हीं म्हटलें आहे हें खरें. परंतु हें शिक्षण कोणाला? खून करणारांना नव्हे, तर असल्या खुनांना जे बळी पडतात त्यांना यांत शिक्षण आहे. प्रेहवेच्या संबंधाचा आमचा लेख जे कोणी मराठींत शांतपणें वाचतील त्यांना असें आढळून येईल कीं, असे खून होतात याकरितां दुसऱ्यांना त्रास होईल अशा रीतीनें कोणीं वागूं नये असाच उपदेश आम्हीं सदर लेखांत केलेला आहे, हेंच शिक्षण देण्याचा आमचा हेतु आहे, व हाच बोध आम्हांला काढावयाचा आहे. हा बोध कोणाला घ्यावयाचा नसला तर तो त्यांनीं घेऊं नये. परंतु एखादा मनुष्य असला सदुपदेश करीत असतां त्याच्या हेतूंचा विपर्यास करून तो खून करण्याला चिथवीत आहे, असें म्हणण्याचा नीचपणा तरी त्यांनीं करूं नये. दुसऱ्यांना त्रास दिल्यापासून असले अनर्थ होतात, तेव्हां असें कोणीं करूं नये, असा सदाचरणाचा आम्ही उपदेश करीत असतां व तो आमच्या लेखांमधून स्पष्टही दिसत असतां टाइम्सनें "Educative value of murder" असा मथळा देऊन आमच्या लेखाचा विपर्यास करण्याचा जो प्रयत्न केला आहे, त्यामध्यें त्यास किती तोंडघशीं पडावें लागलें आहे, हें कोणाच्याही सहज लक्षांत येईल.

आमची बाजू आणि आमचे हेतु कसे आहेत, हे आम्ही कांहींएक पडदा न ठेवितां लोकांच्या पुढें मांडलें आहे, असें असून टाइम्सच्या किंवा त्याच्या आड असलेल्या मंडळीच्या मनामध्यें असले कुतर्क कां येतात, हा एक प्रश्न उत्पन्न होतो, आणि त्याबरोबरच 'खातें त्याला खवखवतें' या म्हणीची प्रत्येकाला आठवण होते. क्षणभर अशीही कल्पना केली कीं, प्रेहवेची हकीकत देण्यांत आमचा हेतु होता, तरी काय? जेथें प्रेहवेच नाहींत तेथें भिण्याचें तरी कारण काय आहे? आमच्या मतें हिंदुस्थानांत कोणीही प्रेहवे नाहींत. जर असते तर त्यांच्या शासनाला आमच्या लेखांची आवश्यकता लागली

नसती. खुद्द कर्झनसाहेबांबद्दलही आमचें मत असेंच आहे कीं, तेही प्रेहवे नाहींत, व हेंच मत आम्हीं मुद्दाम ता. २ सप्टेंबरच्या अंकामध्यें नमूद केलेलें आहे. कर्झन साहेबांनीं हिंदुस्थानला अहितकारक अशा कित्येक गोष्टी केल्या आहेत, हें आम्ही बाकीच्या जगाबरोबर फिरूनही म्हणतों. परंतु असें म्हटलें म्हणून त्यांच्या अंगच्या सदगुणांचा आम्ही लोप करितों असें नाहीं. त्यांच्यापासून हिंदुस्थानचे फायदेही झालेले आहेत व ते आम्ही कोणीही विसरलों नाहीं. इतकेंच नव्हे, तर आमचें असेंही मत आहे कीं, कर्झनसाहेब येथें असते तर टाइम्सच्या हातांत कोलीत देऊन कित्येकानीं हल्लीं त्यांच्या संबंधीच्या ह्या प्रकरणामध्यें जो पोरकटपणा चालविला आहे, तो त्यांनीं कधींही चालूं दिला नसता; इतके ते स्वतः उदार आणि उदात्त मनाचे आहेत, व त्यांना इतकी मानवी स्वभावाची आणि कृतीची पूर्ण माहिती आहे. सारांश, कर्झनसाहेब हे प्रेहवे नाहींत, आणि हिंदुस्थान हाही कांहीं रशिया नाहीं. कर्झनसाहेब हिंदुस्थानांत खुशाल येवोत आणि एडवर्ड-साहेब त्यांना ठेवतील तितके दिवस ते हिंदुस्थानावर निर्भयपणें राज्य करोत. त्यांनीं गरीब लोकांच्या कल्याणाकडे लक्ष देऊन राज्य करावें, एवढीच आमची त्यांना विनंति आहे. अशी वास्तविक स्थिति असतां कित्येक लोक टाइम्सच्या द्वारें भलतीच भीति व्यक्त करितात याला काय म्हणावें ! जे भितात ते आपल्यामध्यें कोणी प्रेहवे आहेत असें पर्यायानें कबूल करितात असें फलित होतें, याकडे त्यांचें लक्ष जात नाहीं असें दिसतें.

असो. येथवार ता. २ सप्टेंबरच्या अंकांतील लेखासंबंधानें टाइम्सनें जें अकांडतांडव केलें आहे, त्यांतील निराधारपणा यथाशक्ति थोडासा प्रत्ययास आणून देण्याचा आम्हीं प्रयत्न केला आहे. आतां टाइम्सचा वरच्या बरोबरच दुसरा एक आक्षेप असा आहे कीं, आमचे लेख राजद्रोहात्मक असतात. या आक्षेपाचा आतां विचार कर्तव्य आहे, व याच्याच बरोबर आम्हीं ता. २३ सप्टेंबरच्या अंकामध्यें टाइम्सचा लेख आल्यानंतर जो एक पॅरिग्राफ लिहिला आहे व ज्याच्यावर आमच्या देशबांधवांकडून जोराची चर्चा चालली आहे, त्याच्याबद्दलही येथेंच एकत्र विवेचन करण्याचा आमचा विचार आहे. या आक्षेपाच्या प्रतिकारार्थ पुष्कळ मुद्दे व उतारे देतां येण्यासारखे आहेत; परंतु ते तूर्त येथें देत न बसतां मुख्य गोष्ट आम्ही

सांगणार आहों. काळांत बहुतकरून राजकीय विषयांवरच विशेष चर्चा येत असते. ह्या राजकीय विषयासंबंधानें आपल्या हल्लींच्या देशस्थितीकडे लक्ष देऊन पाहिलें असतां कोणालाही असें आढळून येईल कीं, आपल्या सगळ्या राजकीय विषयांमध्यें राजनिष्ठा आणि स्वदेशभक्ति हीं दोन मुख्य अंगें आहेत. आपण इंग्रजांच्या अमलाखालील हिंदुस्थानांतील लोकांनीं राजनिष्ठाही दाखविली पाहिजे व स्वदेशभक्तिही केली पाहिजे हें आपलें कर्तव्यकर्म आहे, ही गोष्ट कोणालाही नाकबूल करतां येणार नाहीं. हें आपलें पवित्र कर्तव्यकर्म आहे अशी इतरांप्रमाणें आमचीही दृढ समजूत आहे, व त्याच धोरणावर आम्हीं आपल्या वर्तमानपत्राचें वळण ठेविलेलें आहे. आम्ही जें जें काहीं लिहीत असतों, तें तें ह्या दोन परमपूज्य आणि पवित्र गोष्टी डोळ्यापुढें ठेवून लिहीत असतों. आम्ही आपल्या राजाच्या किंवा देशाच्या विरुद्ध कधींही लिहीत नाहीं. जें सत्य असेल तेंच लिहितों, आणि तें सत्य एखादे वेळीं कोणाला प्रिय वाटण्यासारखें नसलें तरीही आम्ही लिहितों, याचें कारण त्याच्याविरुद्ध लिहावें किंवा त्यांचें मन दुखवावें हें नसून त्यापासून त्यांनीं धडा घेऊन शहाणें व्हावें, हेंच असतें. सत्य स्थितीचें सत्य वर्णन करावें हें वर्तमानपत्रांचें सत्य कर्तव्यकर्म आहे, तें आम्हीं वर्तमानपत्रांनीं न करावें तर कोणीं करावें? सत्याची किंमत फार मोठी आहे, आणि सत्यावर कितीही संकटें आलीं तरीं अखेरीस सत्याचाच विजय व्हावयाचा, ही गोष्ट ठरलेली असल्यामुळें राजनिष्ठापूर्वक आणि देशभक्तिपूर्वक सत्यस्थितिनिदर्शनाचा मार्ग आम्हीं स्वीकारिलेला आहे; व आमच्या लेखांमधून ह्याच तीन गोष्टींना नेहमीं प्राधान्य दिलेलें असतें. परंतु टाइम्सला त्यांत राजनिष्ठेचें प्रमाण या वर्षाच्या प्रारंभापासून कांहीं कमी दिसूं लागलें आहे. आमच्या मतानें तें बिलकूल कमी नाहीं. जितकें असावयाला पाहिजे तितकें तें आम्हीं ठेवलेलें आहे. परंतु या बाबतींत आमचा आग्रह नाहीं. टाइम्सला किंवा टाइम्सच्या आड असणाऱ्या लोकांना जर असें वाटत असेल कीं, यामध्यें जास्त राजनिष्ठा पाहिजे, तर आम्ही ती जास्त प्रमाणानें घालीत जाऊं; व 'युरोपियन लोकांना बाधक गोष्टी आवडत नसतील तर त्या वेळेस सोडून देणें भाग आहे,' या वाक्यांतीलही आशय ह्याच आहे. राजनिष्ठेचें प्रमाण जास्त वाढविण्याला आमच्याकडून कधींही हरकत

नाहीं. ह्या राजद्रोहाच्या संबंधानें सरकारनें वर्तमानपत्रकारांना एका मोठ्या विलक्षण तऱ्हेच्या अडचणीमध्यें आणून ठेविलें आहे. एकीकडे मुद्रणस्वातंत्र्य दिलें आहे, आणि दुसरीकडे राजद्रोहाचीं कलमें करून ठेविलीं आहेत. 'लिहा' ही म्हणावयाचें, आणि 'लिहूं नका' असेंही म्हणावयाचें, अशा प्रकारची विलक्षण स्थिति निर्माण करून ठेवण्यांत आली आहे. लिहूं नका असें सरकार प्रत्यक्ष म्हणत नाहीं, हें खरें. तरी पण राजद्रोहासंबंधानें सरकारनें जीं कलमें करून ठेविलीं आहेत तीं इतकीं लवचीक आहेत कीं, तीं वाटतील तशीं वांकवून वाटेल त्या ठिकाणीं लावतां येण्यासारखीं आहेत. आम्ही तर कायद्याच्या कौटिल्यामध्यें बोलून चालून अनभ्यस्तच आहों. परंतु एकच वादग्रस्त वाक्य कायदेपंडितांना दाखविलें तर चौघांचीं चार मतें पडतात. एक तें राजनिष्ठात्मक म्हणतो; दुसरा तें राजद्रोहात्मक मानलें तर मानतां येईल असें म्हणतो; तिसरा तें बिलकूल राजद्रोहात्मक नाहीं, असें म्हणतो; आणि चौथा तर यांत कांहींच हंशील नाहीं, हा सगळा पोरखेळ आहे, असें म्हणतो. ह्याच चार इसमांना एकाद्या झाडापुढें उभें केलें आणि हें झाड आहे किंवा काय आहे असें विचारलें, तर तेथें चौघांचीं चार मतें कधींही पडावयाचीं नाहींत. तेथें एकच मत पडलें पाहिजे. तशी राजद्रोहाची गोष्ट नाहीं. ह्यावरून तात्पर्य एवढेंच घ्यावयाचें कीं, राजद्रोह ही गोष्ट सर्वस्वीं सरकारच्या मर्जीवर अवलंबून आहे. अशा प्रकारची जी गोष्ट सर्वस्वी सरकारच्या मर्जीवर अवलंबून असणार, तिच्याबद्दल सरकारपाशीं वाद घालून काय हंशील आहे? असल्या बाबतींत आमचें सरकारला हेंच म्हणणें आहे कीं, आम्ही सर्व नेटिव पत्रें राजनिष्ठापूर्वकच लिहीत असतों. परंतु जेथें तेवढी राजनिष्ठा पुरेशी नाहीं असें आपल्याला वाटत असेल, तेथें जास्त राजनिष्ठा घालण्याविषयीं सांगावें, म्हणजे आम्ही जास्त घालीत जाऊं. राजनिष्ठा हें जें आपलें एक कर्तव्यकर्मच आहे, त्यांत कमी आणि जास्ती याच्याबद्दल तक्रार कशाला पाहिजे? उभयतांच्या सलोख्यानें जेथें एकाद्या गोष्टीचा उलगडा होण्यासारखा आहे, तेथें वादाचें कारण नाहीं, हा सरळ मार्ग आहे. हा मार्ग सरकारला पसंत नसेल, तर आम्ही हल्लीं हिंदुस्थानांतील ज्या तुरुंगांत रहात आहों, तेथून काढून आम्हांला दुसऱ्या कोठल्या तुरुंगांत ठेवण्याची सरकारची इच्छा असली, तर त्या कामींही त्यांच्याशीं वादविवाद

करीत बसण्याची आमची इच्छा नाहीं !

कारण, सरकारापाशीं राजद्रोहाच्या कामांत भांडावयाचें कसलें ? रामभाऊंनीं गोविंदरावांचे पैसे फेडले नसले, तर त्याबद्दल रामभाऊंनीं आणि गोविंदरावांनीं आपली तक्रार सरकारापुढें नेणें हें उचित आहे. पण सरकारच्या विरुद्ध एखाद्यानें राजद्रोह केला कीं नाहीं, याच्या न्यायाकरितां जेव्हां सरकारच्या एखाद्या न्यायाधीशापुढें [ म्हणजे अप्रत्यक्ष रीतीनें सरकारच्यापुढें ] जावयाचें असतें, तेव्हां तेथें पुरावा कसला आला आहे ? आम्हांला हें कबूल आहे कीं, हल्लीं ज्या राजकीय पद्धति जगांत सगळीकडे अस्तित्वांत आहेत, त्या पद्धतीप्रमाणें वर दर्शविलेला दोष हा अपरिहार्य आहे. तरी पण तात्त्विक दृष्टीनें विचार करून पाहतां हा दोष आहे हें कोणींही कबूल केलें पाहिजे. अशा स्थितीमध्यें राजद्रोहासारख्या बाबतींत सरकारला आणि लोकांना उभयतांनाही हेंच श्रेयस्कर आहे कीं, असले वाद उभयपक्षांनीं सलोख्यानें मिटवावे. जेथें राजनिष्ठा मुळींच दाखवावयाची नाहीं असें असेल, तेथील गोष्ट वेगळी. अशी वेळ म्हणजे प्रत्यक्ष लढाईचीच वेळ होय. परंतु राजनिष्ठेचें प्रमाण कमी आहे किंवा अधिक पाहिजे, एवढाच जेथें वाद आहे, तेथें तो वाद सामोपचारानेंच मिटविणें श्रेयस्कर आहे यांत शंका नाहीं. आम्ही आमच्या संबंधानें हें असें म्हणतों असें नव्हे. आमचें काय ? आम्हीं ज्या घरांत रहात आहों, तेथून उठून आम्ही सरकार दाखवील त्या घरांत जाऊन बसूं, व तेथें सुखानें काळक्रमणा करूं. कारण, जो परमेश्वर येथें आहे, तो तेथेंही असणारच ! जेथें हिंदुस्थानांत दर वर्षी सुमारें दहा लक्ष लोक कैदेंत जातात, तेथें या वर्षी आणखी एक जास्त जाईल ! याच्यापेक्षां कांहीं मोठासा फरक होईल असें नाहीं. परंतु आम्ही प्रतिपादन करितों हें तत्त्व जर सरकार लक्षांत घेईल, तर मात्र एक मोठा फरक झाल्यासारखें होईल, यांत शंका नाहीं.

राजकीय विषयांत राजनिष्ठा आणि देशभक्ति हीं दोन अंगें प्रधान असतात म्हणून आम्हीं वर सांगितलेंच आहे. त्यांपैकीं देशभक्ति आमच्याजवळ आहे तितकी आम्ही आपल्या पत्रांत घालीत जाऊंच व सरकारला जितक्या भरपूर प्रमाणानें राजनिष्ठा पाहिजे असेल तितक्या प्रमाणानें तीही आम्ही मोठ्या आनंदानें घालीत जाऊं. त्यांत आमचें कांहीं खर्च होत नाहीं, व लोकांचेंही कांहीं खर्च होतें असें आम्हांस वाटत नाहीं. परंतु कित्येक लोकांची अशी एक

कल्पना दिसते की, असें कांहीं कमीजास्त झालें, म्हणजे रावणाप्रमाणें दहा तोंडांनीं ओरडत सुटलें पाहिजे. परंतु असेंच अवश्य आहे असें नाहीं. शांतपणानें तीच गोष्ट करतां येणें अशक्य नाहीं. टाइम्सनें प्रथम आमच्या-विरुद्ध लेख लिहिला त्याबरोबर कित्येकांच्या मतें आम्हींही त्यांच्याविरुद्ध त्याच वेळीं कांहीं तरी तितकाच प्रचंड लेख लिहावयास पाहिजे होता. परंतु तसें करणें आम्हांस श्रेयस्कर वाटलें नाहीं. त्या दिवशींचा टाइम्स म्हणजे तीन फूट लांबीचा आणि दोन फूट रुंदीचा चिंध्यांनीं बनविलेला एक कागद नव्हे. त्या कागदाच्या आड कोणी तरी असलें पाहिजे, हें ज्यांच्या लक्षांत आलें नसेल किंवा ज्यांना लक्षांत घ्यावयाचें नसेल, त्यांनीं फिरून विचार करणें जरूर आहे. टाइम्सनें भाषांतरें देण्याच्या आधीं असें एक वाक्य लिहिलें आहे कीं, We have been at some trouble to procure translations of these articles. परंतु हीं भाषांतरें मिळविण्याला टाइम्सला काय त्रास घ्यावा लागला, हें कोठें सांगितलें नाहीं. त्यांना काय मुंबईंत फिरावें लागलें, किंवा पुण्याकडे यावें लागलें किंवा दुसऱ्या कोठल्या शहरीं जाणें भाग पडलें, किंवा कोणी नेटिव सभ्य गृहस्थापाशीं बोलण्याचालण्यांत वेळ दवडावा लागला, किंवा दुसरें कांहीं करावें लागलें, याच्याबद्दल खुलासा कांहींच नाहीं. हल्लींच्या प्रकरणासंबंधानें लिहितांना कलकत्त्याच्या बेंगाली पत्रानें मात्र आपल्या २९ सप्टेंबरच्या अंकांत असें म्हटलें आहे कीं, अठराशें सत्त्याण्णव सालचीं टाइम्सचीं भाषांतरें आणि पुढें खटल्यांत आलेलीं सरकारी भाषांतरें यांच्यामध्यें पुष्कळ साम्य दिसून येत होतें. टाइम्सनें मराठी पत्रांचीं भाषांतरें करण्यासाठीं एखादें ऑफिस ठेविलें आहे असें नाहीं. असें असून टाइम्सनें कांहीं श्रमानें भाषांतरें मिळविलीं, त्यावरून टाइम्सच्या सहा चौरसफूट कागदाच्या मागें कोण कोण आहेत, याच्याबद्दल अनुमान करण्याला कोणासही फारसें जड जाईल असें नाहीं. सरकार किंवा सरकारचे पोलिस आणि इतर अधिकारी पुढें न येतां टाइम्सच्या मार्फतच विषयाचा उपक्रम करण्यांत आलेला असल्यामुळें, व वर निर्दिष्ट केलेल्या अनेक कारणांनीं त्याच वेळीं त्या लेखाला सविस्तर उत्तर देणें श्रेयस्कर नसल्यामुळें प्रतिपक्षाची जशी कृति होती, तशाच बेताचें थोडेसें उत्तर त्या वेळीं देऊन ठेवणें हेंच हितकारक होतें. सरकार प्रत्यक्ष पुढें आलेलें नसल्यामुळें आमच्याही उत्तरांत सरकारचा प्रत्यक्ष उल्लेख करणें

वाजवी नव्हतें. पुढें आलेले टाइम्सकार युरोपियन व पुढें न आलेलें सरकारही युरोपियनच तेव्हां त्या दोघांचाही जशा रीतीनें समावेश होईल तशा रीतीनेंच लिहिणें जरूर होतें. प्रत्येक युरोपियनाच्या मर्जी-प्रमाणें वर्तमानपत्र चालविणें हें गैर आहे, हें सांगण्याला येथील शुक्रवार पेठेंतील मंडळी पाहिजे होती, किंवा साताऱ्याहून शहाणपण आणावयाला पाहिजे होतें असें नाहीं. स्वदेशभक्ति पूर्वीप्रमाणेंच कायम ठेवून सरकारला आमच्या लेखांमध्यें जितकी राजनिष्ठा पाहिजे असेल तितक्याप्रमाणें ती आम्ही घालीत जाऊं. आम्ही आजपर्यंत आमच्या सरकारला परिणामीं हित-कारक अशाच गोष्टी लिहीत आलों आहों. त्या राजद्रोहात्मक बुद्धीनें लिहिलेल्या नाहींत. परंतु त्यांत जास्त राजनिष्ठा पाहिजे असेल, तर तीही आम्ही घालीत जाऊं. असें करणें हें जरूरच आहे व कर्तव्यही आहे. शिवाय असें कोणीं केलें नाहीं ? सर्वजण याच मार्गानें आलेले आहेत. राजनिष्ठेचें अधिक प्रमाण हा वादाचा विषयच नाहीं. सरकारनें आपल्या संदिग्ध कायद्या-वर अवलंबून न राहतां अमुक अंशापर्यंत राजनिष्ठा पाहिजे म्हणून सांगावें, म्हणजे त्याप्रमाणें आम्हांलाच काय, परंतु इतर देशी पत्रकारांनाही, ती गोष्ट फार सुलभ होणार आहे. मात्र तें प्रमाण योग्य मर्यादेंत असलें पाहिजे; आणि आमचे सरकार आपल्या राजनिष्ठेच्या प्रमाणाला अयोग्य मर्यादेपर्यंत कधींही जाऊं देणार नाहीं, अशी आमची खात्री आहे. ऑस्ट्रियाचा स्वित्झरलंडमधील प्रतिनिधि जो जेस्लर त्यानें आपली टोपी एका निशाणाच्या काठीवर उभी करून ठेविली होती, व त्या टोपीला सलाम करणें ही राजनिष्ठेची खूण म्हणून त्यानें ठरविलें होतें ! असली टोपीला सलाम करण्याची राजनिष्ठा आमचे राजे कधींही सांगणार नाहींत, अशी आमची खात्री आहे, व त्यांच्याबद्दल योग्य राजनिष्ठा दाखविण्याला आमच्याकडून कधीं कसूर होणार नाहीं, अशी त्यांनींही खात्री बाळगिली पाहिजे. सारांश, हेंच आमचें राजनिष्ठेचें आजपर्यंतचें धोरण होतें व याच धोरणावर यापुढेंही चालणें वाजवी आहे. आमच्या पत्राच्या धोरणासंबंधानें सरकारला आणि लोकांना अशा दोघांनाही कांहीं शंका उत्पन्न झाल्या आहेत असें दिसतें. त्याबद्दलही येथें असें स्पष्ट सांगणें जरूर आहे कीं, स्वदेशभक्तीचा अंश कमी होणें कधींच शक्य नाहीं. तो कांकणभर जास्तच वाढेल व त्याला

सरकारचीही हरकत नाहीं. कारण, खुद्द सरकार देखील हिंदुस्थानासंबंधानें देशाभिमानीच आहे. आतां राजनिष्ठेसंबंधानें सरकारला योग्य राजनिष्ठा जितक्या प्रमाणानें जास्त पाहिजे असेल तितकी आम्ही घालूं. अशा प्रकारचें काळाचें धोरण राहील. हें धोरण सरकारला पसंत नसेल तर सरकारनें आमचें पत्र बंद करावें, व लोकांना पसंत नसेल तर लोकांनींही तें खुशाल बंद करावें. हल्लींच्या सारख्या स्थितीमध्यें वर्तमानपत्र चालविण्यापासून कांहीं मोक्ष आहे असें नाहीं. तेव्हां सरकारनें आम्हांला आपलें पत्र उघड रीतीनें किंवा पर्यायानें बंद करावयाला लाविलें, तरीही त्यांत आम्हांला मोठेसें दुःख वाटणार नाहीं. काळानें आज सहा वर्षें यथाशक्ति जी अल्प देशसेवा अत्यंत नम्रपणानें केलेली आहे, तिच्यापेक्षां जास्त देशसेवा आतां वर्तमानपत्राच्या द्वारें विशेष करतां येण्यासारखी आहे असें नाहीं. रुसो–जपानी युद्धाच्या बातम्या आणि स्वदेशांतील आपल्या रोजच्या रडकथा प्रत्येक आठवड्याला गात बसणें म्हणजे खरोखर अतिशय कंटाळवाणें काम आहे. येथें पांच इंच पाऊस पडला आणि ठाणें जिल्ह्यांत धान्याचे रोपे सहा इंच वाढले आहेत, हेंच बहुतेक छापण्याकरितां मुद्रणस्वातंत्र्य आहे, तेथें तसलें मुद्रण न झालें आणि एखादें वर्तमानपत्र बंद पडलें, म्हणूनही आम्हांला त्यांत मोठीशी फिकीर वाटत नाहीं. काळ हें वर्तमानपत्र चालविण्यामध्यें आमचा एक मुख्य हेतु हा कीं, युरोपियन भाषांमधून जे कांहीं उत्तम उत्तम विचार आहेत ते आपल्या देशबांधवांना कळावे. आमच्यामध्यें महाभारत, रामायण इत्यादि चांगले ग्रंथ आहेतच. परंतु ग्रीस, रोम, इंग्लंड, स्पेन, फ्रान्स, जर्मनी, इटली, रशिया इत्यादि देशांतील ग्रंथसमुच्चयामध्यें एक प्रकारचा अलौकिक सांठा भरलेला आहे. त्यांतील रसांचा आपण आस्वाद घेत असतां आपल्या आंग्लभाषानभिज्ञ देशबंधूंची आठवण झाली, म्हणजे आपण आपल-पोटेपणानें सगळा रसास्वाद एकटेच घेतों, आणि आपल्या देशबांधवांना आपण उपाशी ठेवितों, याबद्दल खेद वाटतो व त्यांनाही त्या विचारांचा रसास्वाद घेतां येण्यासाठीं आपल्या हातून कांहीं होण्यासारखें असेल तर करावें अशी इच्छा मनामध्यें उत्पन्न होते. हिंदुस्थानांत दुष्काळ पुष्कळ वेळां पडतात; परंतु जेव्हां असल्या उत्तम विचारांचा आपल्या देशबांधवांना रसास्वाद घेतां येत नाहीं ही गोष्ट मनांत येते, तेव्हां मात्र हिंदुस्थानांत खरा दुष्काळ आहे,

असें वाटूं लागतें. अन्नाचे आणि पाण्याचे दुष्काळ सरकार दूर करील, परंतु हिंदुस्थानांतील उत्तम विचारांचे दुष्काळ कोणीही साहेब दूर करूं शकणार नाहींत. ते आपणच दूर केले पाहिजेत ! असें आपलें कर्तव्य दृष्टीपुढें उभें राहूं लागतें. परदेशांतून हल्लीं जशीं निरानिराळ्या जिनसा तयार करण्याचीं यांत्रिक साधनें आणलीं जातात, तशाच प्रकारचीं तिकडून उत्तम उत्तम विचारसाधनें आपल्या देशबांधवांकरितां आणण्याचा हा प्रयत्न आहे. एखादा भाऊ कोठें बाहेर गेला आणि तेथें त्याला एखादी उत्तम वस्तु आढळली, तर ही आपल्या धाकट्या भावाकरितां आपण घेऊन जावी अशी बुद्धि उत्पन्न होऊन तो ती वस्तु घरीं आणितो, त्याप्रमाणें कोठेंही एखादा उत्तम विचार आढळला, म्हणजे तो आपण आपल्या देशबांधवांना नेऊन देऊं, अशा बुद्धीनें अनेक विचार आजपर्यंत त्यांच्यापुढें मांडण्याचा प्रयत्न अंतःकरणपूर्वक आणि बंधुवात्सल्यानें करण्यांत आला. आजपर्यंत ही वेडी वांकडी सेवा स्वदेशबंधूंनीं गोड करून घेतली, याबद्दल त्यांचे आम्ही फार आभारी आहों. यापुढें ज्यांना ती रुचत नसेल, त्यांनीं तिचा खुशाल अनंगीकार करावा. सरकारलाही आमचें हेंच म्हणणें आहे कीं, अशा दिशेचा हा एक अल्प प्रयत्न आहे. हा एखाद्या राज्याविरुद्ध प्रयत्न नव्हे. एखाद्या पत्रांतील लिहिण्यानें ब्रिटिश साम्राज्यासारख्या सामर्थ्याचा एक केसही वाकडा व्हावयाचा नाहीं, हें आम्हांला सांगण्याला सुधारक नकोत. दुसऱ्यांनाही थोडेंबहुत समजत असतें. आमच्या फटाक्यांनीं कांहीं व्हावयाचें नाहीं इतकेंच आम्हांला माहीत आहे असें नव्हे, तर रामेश्वराजवळच्या दररोज सकाळीं उडणाऱ्या बिनदारूच्या नेमस्त फुसनळ्यांनींही कांहीं व्हावयाचें नाहीं हें सुद्धां आम्हांला माहीत आहे ! परंतु अशा बाबतींत सरकारचेंच वर्तन थोडेंसें चमत्कारिक होतें. सगळेजण सगळीकडे लिहीत असतात. एकच विचाराचा ओघ सगळ्यांकडून एकसारखा वहात येत असतो आणि त्यांतून सरकार मध्येंच कोणाला तरी म्हणतें कीं, 'तुम्ही असें कां लिहिलें ?' प्रत्येक लेखक हा त्याच्याभोंवतीं वाहत असलेल्या विचारांच्या ओघामध्यें थोड्याबहुत प्रमाणानें सांपडलेला असतो. तो ओघ बंद करण्याचें जर सरकारला सामर्थ्य नसेल, तर त्या ओघांतील एखादाच जलबिंदु उचलून काढून घेतल्यानें सरकारचा इष्ट हेतु कधींही सिद्धीस जाणार नाहीं. मि. दादाभाई नौरोजी हे हिंदुस्थानाकरितां ॲमस्टरडॅम

येथें काय बोलले ? कॉटनसाहेब 'न्यू इंडिया' मध्यें काय बोलत आहेत ? नामदार फेरोजशहा मेथा यांनीं कार्पोरेशनमध्यें कर्झन साहेबांच्या मानपत्राच्या वाटाघाटीच्या वेळीं गव्हर्नरजनरल आणि व्हाइसरॉय यांच्यामधील क्लिष्ट भेद काढला, यांतील इंगित काय ? इत्यादि प्रश्नांचा आणि प्रचंड वाहत असलेल्या ओघाचा सरकारनें विचार केला पाहिजे. एकट्या काळावर कटाक्ष ठेवून काय होणार आहे ? काळ हें पत्र यदाकदाचित् बंद पाडलें गेलें, तरी त्यापासून काय होणार आहे ? काळ हें प्रसिद्ध होणारें एक पत्र आहे, परंतु प्रसिद्ध न होणारीं अशीं हिंदुस्थानामध्यें तीस कोटी वर्तमानपत्रें आहेत, त्यांची सरकार काय वाट लावणार ? आम्ही वर्तमानपत्र लिहितों असें मुळींच नाहीं. आम्ही काय करतों, तर हीं तीस कोटी प्रसिद्ध न होणारीं वर्तमानपत्रें प्रत्येक आठवड्याला अत्यंत काळजीपूर्वक रीतीनें आम्ही फक्त वाचून पाहतों. लोकांचे खरे विचार आम्ही खऱ्या शब्दांनीं लिहितों. असलेंही एखादें वर्तमानपत्र सरकारच्या राज्यांत असलें म्हणून मोठेसें बिघडणार आहे असें नाहीं. प्रसंगीं खरा उपयोगी आमचाच उपदेश पडेल. बाकी टाइम्सनें 'छू' म्हटल्याबरोबर भुंकूं लागणारी मंडळी आणि ताज्या घोड्यावरच्या गोमाश्या जिकडे तिकडे भरलेल्या आहेतच. शिवाय राज्यांत कोठें कांहीं जर बिघडलें असेल, तर तें सुधारण्याचें काम सरकारचें आहे. तें कार्य एकाद्या पत्रावर फिर्याद करून कधींही साध्य होणें शक्य नाहीं. परंतु याही उपर सरकारला फिर्याद करणें अवश्यच वाटत असेल, तर सरकारपाशीं आमची एवढीच विनंति आहे कीं, त्या गोष्टीबद्दलही आमच्याकडून तक्रार नाहीं. दोन लाखांहून अधिक सैन्याच्या मालकापाशीं एका मनुष्याचा वाग्विवाद कसला आला आहे ? सरकार सांगेल त्या ठिकाणीं आम्ही आपण होऊनही जाऊन बसूं व या कामीं सरकारचे वकील, सॉलिसिटर, बॅरिस्टर, ॲडव्होकेट वगैरे मंडळींच्या पायीं आमच्याच लोकांचा जो पैसा खर्च होणार तो आमच्या उपाशी मरणाऱ्या देशबांधवांना वांटावा; म्हणजे या निमित्तानें तरी त्या बिचाऱ्यांना कांहीं दिवस पोटभर अन्न खावयाला मिळेल !

प्रस्तुत प्रसंगीं टाइम्सनें लेख लिहिल्यानंतर आमच्या कित्येक व्यवसायबंधूंनीं मात्र टाइम्सच्या इच्छेप्रमाणें अगदीं बिनमोल कामगिरी बजाविली आहे. ती पाहून सरकार परकीय असूनही खरोखर विचारी आणि दयाळू

आहे असेंच म्हणावें लागतें. सरकारनें अजून कांहीं एक केलें नाहीं, किंवा कांहीं करावयाचें आहे किंवा नाहीं हेंही उघड केलें नाहीं. पण उथळ-पण्यांनीं मात्र आपल्या खळाळीनें सर्व वातावरण दुमदुमून सोडलें आहे. सरकारच्या कोर्टांत फिर्याद व्हावयाची किंवा न व्हावयाची हें अजून बाहेर पडावयाचें आहे. परंतु टाइम्सनें 'छू' म्हटल्याबरोबर आमच्या बहुतेक समंजस व्यवसायबंधूंनीं आपलें अनधिकारी कोर्ट भरवून आपला फैसला देऊन टाकला आहे व त्यांच्यापाशीं जर एखादा तुरुंग असता तर त्यांनीं त्यांत आम्हांला एव्हांना कोंडूनही टाकलें असतें. ही आपल्या पत्रांची स्थिति पाहून आमच्या एका मित्राच्या मनांत वर्तमानपत्रकारांकरितां एक वर्तमानपत्र काढण्याची कल्पना आली आहे व मराठी बाजूच्या संपादकत्वाकरितां येथील शुक्रवार पेठेंतील कित्येक मंडळींना त्यांनीं विचारूनही ठेविलें आहे. सरकारचे अधिकारी टाइम्सच्या आड उभे राहून असल्या ह्या ताज्या घोड्यांच्या गोमाश्यांचीं मतें काय आहेत तें पाहत आहेत! ज्यांना तोंडपुजेपणाशिवाय दुसरी भाषाच माहीत नाहीं त्यांच्याकडून दुसरें मत काय यावयाचें आहे? तरी पण या प्रसंगीं इंदुप्रकाश, गुजराथी, वगैरे पत्रांनीं जी विचाराची दिशा दाखविली आहे, ती खरोखरच सर्वांनीं लक्षांत बाळगण्यासारखी आहे व पुढें दुसऱ्या कोणावर प्रसंग आला, तर त्या वेळीं तरी त्यांनीं फसले जाऊं नये. आमच्या बाबतींत असा प्रकार झाला म्हणून कांहीं मोठेसें नाहीं. आमचें पत्रें तें काय? आणि तें बुडलें काय, आणि तरलें काय? तो एक अल्पसा प्रयत्न आहे! ती एक गाजराची पुंगी आहे! वाजेल तोंपर्यंत वाजवूं नाहीं त्या दिवशीं गाजर खाऊन टाकूं! आमचा बाणा असा कांहींच नाहीं. गरिबाला कसला बाणा आला आहे! साताऱ्च्या एका पत्राला आणि खेळाडू क्लबाच्या कांहीं मंडळीला एक दिवस कोणीं अशी बातमी सांगितली कीं आम्ही लोकमान्य टिळक होऊं पहात आहों! ही बातमी त्यांना कोणीं सांगितली असेल कोण जाणे! वास्तविक तसें कांहीं नाहीं! मी एक पूर्वी त्यांच्या शाळेंतील नम्र शिष्य होतों व हल्लींही मी त्यांच्या शाळेंतच आहे! व त्यांपासून मी अजून ज्ञान संपादन करून घेत आहे! तरी पण त्यांत एककल्लीपणा कोठून तरी शिरत आहे असें मात्र आतां दृष्टोत्पत्तीस येऊं लागलें आहे. त्याबद्दलही सुधारणा करण्याचा आम्ही प्रयत्न करूं! आमचा

हा आपला एक पोटाचा प्रयत्न आहे ! निष्काम बुद्धीचे आणि देशहिताचे खरे प्रयत्न शाहूनगरामधून उगम पावत आहेत हें आम्ही जाणून आहों ! तेथील सार्वजनिक हिताासाठीं वर्तमानपत्रद्वारें चाललेले प्रयत्न पोटासाठीं बिलकूल नाहींत ! कारण, जेथें वकिलीवर पोट गडगंज भरत आहे, तेथील वर्तमानपत्र पोटासाठीं आहे, असें म्हणण्याला कोण धजणार आहे ? आणि जें पत्र पोटासाठीं नाहीं, तें अर्थात् स्वदेशासाठींच असलें पाहिजे आणि तें त्याप्रमाणें कोणत्या तरी रीतीनें स्वदेशासाठीं आहेही. निदान स्वदेशी व्यापारासाठीं तरी तें आहेच. कारण तें पत्र जेव्हां आस्तित्वांत असतें, तेव्हां हिंग, जिरे, वगैरे स्वदेशी जिनसांच्या पुड्या बांधण्याच्या कामीं रात्रंदिवस खपत असतें, अशाबद्दल साताऱ्च्या कित्येक वाण्यांकडून विश्वसनीय पत्रें आलेलीं आहेत ! आमच्या पत्रांतील दुसरा एक दोष असा आहे कीं, आठवड्यांतून सारें एकदांच दिसणारें आमचें पांच सहा वर्षांचें कालचें टारगें पत्र, म्हातारे पेन्शनर व शाळांतील तरुण मुलें, सरकारी नोकरींत गुरफटलेले व वकील, व्यापारी, वगैरे स्वतंत्र धंदा करणारे सर्व लोक मिटक्या मारीत वाचतात ! परंतु त्याला आम्हीं काय करावें ! साठीची वेळ जवळ येण्याला फक्त तीन वर्षांची अवधि राहिली असल्यामुळें जशी इतरांची बुद्धि हळूहळू नष्ट होऊं लागली आहे, तशी आमची होत नाहीं ही ईश्वराची आमच्यावर अवकृपा आहे ! तसेंच शंभर रुपये पगार घेऊन रोजच्या रोज कांहीं तरी बेचव आणि पानचट विषय लिहून, किंवा सारजाबाईच्या चटणी–कोशिंबिरीच्या गोष्टी लिहून आपलें पत्र व मित्राचें मासिक सरकारप्रिय आणि महिलाप्रिय करून सोडण्याची बेमालुम हातोटी आमच्यामध्यें नाहीं, त्याला काय करावयाचें ? जे गुण आपल्याला देवानें दिलेलेच नाहींत, त्यांच्याबद्दल हळहळून काय उपयोग ! कित्येक मंडळींनीं आम्हांला शिव्या देऊन, काल्पानिक ठरवून, अगर वेडेपणांत ढकलून आमचें संरक्षण करण्याचा आव घातला आहे. परंतु त्यांना आमची एवढीच विनंति आहे कीं, आपल्या शिव्यांनीं आमचें संरक्षण करण्याची अजब युक्ति काढून आपण जी तसदी घेतली आहे, ती आपण विनाकारण घेतली ! कारण, असलें संरक्षण काळाला नको आहे. कारण, हा Killing with kindness चाच एक प्रकार आहे. तरीपण आमच्या व्यवसायबंधूंनीं प्रस्तुत प्रसंगीं सरकारची जी एक मनीषा तृप्त करून दिलेली

आहे, तिच्याबद्दल त्यांचें अभिनंदन करणें फार जरूर आहे. सरकारचा नियम असा आहे कीं, कोणीही बदमाश आणि वाईट मनुष्य झाल्याशिवाय ते त्याला कांहीं एक करीत नाहींत व कोणी तसा नसेल, तर आधीं ते त्याला तसा करवितात आणि मग त्याबद्दल काय करावयाचें तें करतात. त्याप्रमाणें आपण सर्वांनीं आपल्या एका व्यवसायबंधूला वाईट ठरवून सरकारचे हातीं दिलें आहे व सरकारचें भावी कठीण काम आपण सोपें करून दिलें आहे, ही आपली कामगिरी कांहीं लहानसहान नाहीं. आतां पुढें सरकार कांहीं करो किंवा न करो, आपण आपल्या ऋणांतून पूर्णपणें मोकळे झालां आहां यांत शंका नाहीं ! असें जरी कित्येकांच्या हातून वर्तन झालें आहे, तरी याला अपवादभूत अशींही कित्येक पत्रें आहेत हें कबूल केलें पाहिजे. परंतु आपल्यापैकीं एखाद्या प्रसंगीं कोणीं कसेंही वर्तन केलें तरी तो प्रसंगाचा दोष आहे. वास्तविक पाहतां सर्व अंतःकरणें एकच आहेत. ज्या ज्या अंतःकरणांमध्यें म्हणून हिंदुस्थानचें हित वास्तव्य करीत आहे, तीं तीं सर्व अंतःकरणें वस्तुतः एकच आहेत !

आतां आम्हीं आजपर्यंत काळाच्या द्वारें जीं मतें लोकांपुढें मांडीत आलों, तीं दुसरे वर्तमानपत्रकार प्रसंगीं उचलून धरतील अशा अंदाजावर मांडण्याला आम्हीं बिलकुल प्रवृत्त झालों नाहीं. त्या मतांना दुसरें कोणी उघड रीतीनें आधार देवोत किंवा न देवोत; दुसऱ्यांच्या जोराच्या अपेक्षेवर तीं मतें पुढें आलेलीं नाहींत; तीं स्वतःच्या जोरावर पुढें आलेलीं आहेत. तीं सत्याच्या पायावर उभारलेलीं आहेत आणि खुद्द निसर्गदेवता प्रत्येक अंतःकरणामध्यें त्या मताची जोपासना अत्यंत काळजीपूर्वक रीतीनें करीत आहे ! असलीं हीं आपल्या देशाला परम पावन आणि अत्यंत आवश्यक अशीं सत्य मतें प्रतिपादन करतांना आम्हीं कोणत्याही मानवी साहाय्याची आशा धरलेली नाहीं ! या सत्यमतप्रसाराच्या कामीं आमच्यावर लहान–मोठीं, बरीं–वाईट कोणतींही संकटें आलीं, तरी त्यांतून आम्हांला सोडविणारा आमचा परमेश्वर पूर्ण समर्थ आहे ! आमचा वकील परमेश्वर ! आमची फी परमेश्वर ! आमचा जामीन परमेश्वर आणि आम्हांला संकटांतून सोडविणाराही परमेश्वरच ! अशा त्या सर्वशक्तिमान् परमेश्वराचें चिंतन करीत आम्ही हा लेख संपवितों.

# दगडी कोळसा : : : १७

आज दगडी कोळशावर निबंध लिहिण्याचें आम्हीं योजिलें आहे. हा निबंध जितका बेचव होईल तितका करण्याविषयीं आम्ही अंतःकरणापासून प्रयत्न केला आहे. ह्या निबंधाची एक कच्ची प्रत लिहून ती एका पोक्त, नेमस्त, वयोवृद्ध, पेन्शनदार आणि सरकारी नोकरींत असल्यापासून चोरून वर्तमानपत्रांत बेचव लेख लिहिण्यांत हातखंडा असलेल्या अशा अरसिक सद्गृहस्थाला दाखवून त्यांत कोठें कांहीं चुकून राहिलेला चवदारपणा त्यांचे-कडून दुरुस्त करून घेऊन त्यांच्या संमतीनें हा निबंध पसंत करून घेतलेला आहे. तो निबंध तपासतेवेळीं त्यांनीं एकंदर निबंधलेखासंबंधानें ज्या कित्येक सूचना केल्या, त्या फारच उपयुक्त आहेत. त्यांचें अगदीं ठाम मत असें आहे कीं, निबंध लिहावा तर असा कीं, तो वाचल्यापासून वाचणाराच्या मनावर कोणत्याही प्रकारचा मनोविकार उमटूं नये. निबंध वाचण्यापूर्वी वाचणाराचें मन ज्या निर्विकार आणि निर्विकल्प स्थितीमध्यें असेल, त्याच स्थिती-मध्यें जर तें वाचल्यानंतर राहिलें, तर तो निबंध उत्तम म्हणून खुशाल म्हणावें ! असलेच निबंध लोकांना आवडतात. असलेच निबंध आजकाल आपल्याला अत्यंत उपयोगी आहेत, आणि असल्याच निबंधांना बक्षिसें मिळत असतात. निबंधाची लांबी रुंदी किती असावी, याच्याबद्दल या गृहस्थांनीं शिष्ट लोकांचें मत जें सांगितलें तें असें आहे कीं, वर्तमानपत्रांतील निबंधांना रुंदीच्या संबंधानें कांहींएक नियम नाहीं. ज्या वर्तमानपत्रांत निबंध छापावयाचा असेल त्या वर्तमानपत्राच्या कालमाची जी रुंदी असेल, तीच त्या निबंधाची रुंदी होय. परंतु निबंधाच्या लांबी संबंधानें मात्र त्यांनीं अगदीं कडक नियम असल्याचें सांगितलें. ते म्हणाले कीं, पुष्कळ लेखक

आपल्या विषयाच्या महत्त्वावरून निबंधाची लांबी ठरवीत असतात; परंतु ही त्यांची अगदीं अक्षम्य चूक आहे. विषयाच्या महत्त्वाचा व निबंधाच्या लांबीचा कांहीं संबंध नाहीं. निबंधाची लांबी ठरवितांना टाइम्स वगैरे सारखीं नांवाजलेलीं आणि सुधारलेलीं पत्रें आपल्या निबंधाची किती लांबी ठेवितात या गोष्टीकडे आपण मुख्यत्वेंकरून लक्ष राखिलें पाहिजे. निबंधाची एक-दीड कॉलम लांबी म्हणजे फार झाली; अगदींच अपरिहार्य प्रसंग येईल तर दोन कॉलम लांबी असावी; म्हणजे तो निबंध नेमस्त होतो. निबंधलेखनाला विषयाची निवड करण्यासंबंधानें त्यांनीं जो मार्ग दाखविला तोहि फार उपयुक्त आहे. त्यांचें असें म्हणणें आहे कीं, आपल्या विषयांच्या निवडणुकीनें आपले वाचक अगदीं चकित होऊन जातील असे विषय आपण निवडले पाहिजेत. ज्या विषयांची आवश्यकता आपल्याला आहे असें निबंध वाचण्याच्या आधीं कोणालाही वाटत नाहीं, किंवा निबंध वाचून झाल्यानंतरही ज्या विषयाची आपल्याला अपेक्षा असल्याबद्दल कोणाला भास होत नाहीं, असे निरुपयोगी विषय निवडल्यावांचून कोणाही लेखकाला आपल्या वाचकांना चकित करून सोडतां येणार नाहीं. अशा रीतीनें वाचकवर्ग जसजसा जास्त चकित होत जाईल, तसतसें आपले विषय निवडण्याचें कौशल्य जास्त वाढत चाललें आहे, म्हणून पक्कें समजावें. 'आरोग्यखातें,' 'कालव्याचें पाणी,' 'खानेसुमारीवरून अनुमानें,' 'हरताळकेची कथा,' 'कादंबऱ्यांचा उपयोग,' 'रस्त्याच्या बाजूनें असणारीं गटारें' वगैरे त्यांनीं अनेक विषय सांगितले; व हे सर्व लोकांना चकित करून सोडणारे विषय आहेत असेंही त्यांनीं फिरून फिरून सांगितलें. व त्यांनीं वर्तमानपत्राच्या आणि त्यांतील निबंधाच्या भरभराटीच्या ज्या खुणा सांगितल्या त्याही विशेष लक्षांत ठेवण्यासारख्या आहेत. त्यांचा मुद्दा असा कीं, वर्तमानपत्रें हीं विद्याप्रसारासाठीं आहेत. तेव्हां त्यांचा प्रसार अशिक्षित लोकांमध्यें जितका होईल तितका झाला पाहिजे. परंतु अशिक्षित लोकांतसुद्धां दुकानदार लोक हे विद्यादेवीला अतिशय तुच्छ मानणारे असतात. कारण त्यांना आपण कांहीं एक न शिकतां पैसा मिळवूं शकतों, अशी घमेंड असते म्हणून असल्या दुकानदारांच्या हातीं आपलें पत्र गेल्यावांचून त्याची खरी भरभराट झाली, असें कधींहि म्हणतां यावयाचें नाहीं; व

तशी स्थिति प्राप्त होण्याला वरच्या सारखी विषययोजना आणि लेखनपद्धति याच्याशिवाय दुसरें सर्वोत्कृष्ट साधनच नाहीं. पत्र बाहेर पडलें कीं, दुकानदाराच्या हातीं, अशी स्थिति झाल्याविना विद्यादेवीचा उपमर्द करणाऱ्या या वर्गाची खोड मोडणार नाहीं व पत्राची भरभराटही होणार नाहीं. शिवाय या सद्गृहस्थांची अशी एक कल्पना आहे कीं, वर्तमानपत्र म्हणजे एक शाळेंतील शिक्षणाचा वर्गच होय. आणि ही उपमा त्यांनीं घेतलेली असल्यामुळें त्यांचें असें म्हणणें आहे कीं, शाळेंतील एखाद्या वर्गांत जितकीं थोडीं मुलें असतील तितकें तेथील शिक्षण चांगलें होतें, त्याप्रमाणें वर्तमानपत्राचे जितके वाचक थोडे, तितकें त्यांचें शिक्षण चांगलें होणार ! व ह्यामुळें वर्तमानपत्राचे जितके वर्गणीदार थोडे थोडे होत जातील, तितकी तितकी त्याची जास्त भरभराट होत चालली आहे, आणि त्याचें शिक्षण चांगलें चाललें आहे, असें खुशाल समजावें, असा त्यांनीं सिद्धांत बांधून ठेवलेला आहे ! हे त्यांचे सिद्धांत आणि ह्या त्यांच्या सूचना किती महत्त्वाच्या आहेत, हें कोणालाही शब्दानें व्यक्त करून दाखवितां येण्यासारखें नाहीं. ह्या त्यांच्या सगळ्या सूचना प्रत्येकानें लक्षांत बाळगण्यासारख्या आहेत ! व त्या लक्षांत बाळगूनच आम्हीं 'दगडी कोळशा'वर एक लहानसा निबंध लिहिण्याचा प्रयत्न केला आहे. ह्या निबंधावर वरील सद्गृहस्थ फारच खूष झाले आहेत, एवढें येथें सांगितल्यानंतर सदर निबंधाच्या शिफारशीसाठीं दुसरा निराळा प्रयत्न अनवश्यक होय, हें पूर्णपणें जाणून त्या निबंधांतील कांहीं भाग आम्हीं आपल्या वाचकांकरितां येथें देतों:—"लांकूड जाळून विझविलें असतां त्यापासून कोळसा होतो. कोळशाचा रंग काळा असतो. काळा रंग म्हणजे जो पांढरा नाहीं तो. कोळशांमध्यें दोन जाती असतात. एक विलायती कोळसा आणि दुसरा गांवठी कोळसा. गांवठी कोळशाबद्दलची माहिती आपल्या इकडील बहुतेक लोकांना असेलच, अशी आम्हांला आशा आहे. परंतु जर ती कोणाला नसेल; तर हल्लींच्या वस्तुदर्शनपाठाच्या कोणत्याही मराठी शाळेमध्यें तो इसम गेल्यास गांवठी कोळशाबद्दलही सारी माहिती त्याला तेथें मिळेल, अशी आम्हांला पूर्ण खात्री आहे. आतां आपण विलायती कोळशाकडे वळूं. विलायती कोळशालाच दगडी कोळसा असें म्हणतात. हा दगडासारखा कठीण असतो, म्हणून याला दगडी कोळसा असें म्हणतात।

अशी एक कल्पना आहे कीं, पूर्वी कित्येक मोठमोठालीं अरण्यें कांहीं कारणानें पृथ्वीच्याखालीं गडप झालीं, आणि अनेक शतकांच्या परिणामानें त्या अरण्यांचे पृथ्वीच्या पोटामध्यें कोळसे बनले, ते हे दगडी कोळसे होत. इतकी माहिती तूर्त नेटिव लोकांकरितां बस्स आहे. याच्यापुढील कामें, म्हणजे खाणी कोठें आहेत हें कसें समजावें, त्या खणवाव्या कशा, तेथें व्यवस्था ठेवावी कशी वगैरे बाबतींमध्यें जी कांहीं शास्त्रीय माहिती जरूर असते, ती युरोपियन लोकांना आहे. व त्याप्रमाणें ते खाणी उकरून आपल्याला कोळसा काढून देत आहेत. तेव्हां त्या पुढच्या भानगडींत आपल्याला पडण्याचें कांहीं एक कारण नाहीं." प्रस्तुतच्या निबंधांत दुसऱ्या पुष्कळ खोगीरभरतीच्या गोष्टी आहेत. परंतु त्या सगळ्यांतील अतिशय चटकदार, अतिशय माहितीनें भरलेलीं, आणि अतिशय मनोरंजक अशीं वाक्यें तेवढीं निवडून काढून येथें सकलजनमनरंजनासाठीं दिलीं आहेत ! हा निबंध वरील सद्गृहस्थांना दाखविल्यानंतर 'असले निबंध वर्तमानपत्रांना फार योग्य ! असलेच निबंध वर्तमानपत्रांतून आले पाहिजेत ! हाच निबंध तुम्ही अवश्य घाला !' असा त्यांनीं आग्रह धरिला. तेव्हां "धडा १ ला, दगडी कोळसा." असें या निबंधाला हेडिंग दिलें तर तें विशेष चांगलें खुलेल असें वाटल्यावरून ती कल्पना त्या सद्गृहस्थांच्या पुढें ठेवण्यांत आली. त्याबरोबर ते रागानें उसळून म्हणाले:—"वा: ! ही थट्टा आहे कीं काय ! हें वर्तमानपत्राचें पवित्र काम आहे ! वर्तमानपत्र म्हणजे कांहीं पहिलें किंवा दुसरें क्रमिक पुस्तक नव्हे, किंवा वर्तमानपत्राचे वाचक म्हणजे कांहीं शाळेंतील पोरें नव्हत. ह्याकरितां क्रमिक पुस्तकांतल्याप्रमाणें वर्तमानपत्रामध्यें अगदीं साधे विषय आणि त्यांवर अगदीं साधे विचारच आले पाहिजेत हें जरी अगदीं जरूर आहे, तरी त्यावर 'धडा १ ला' असें शाळेंतल्या पुस्तकांसारखें हेडिंग कधींही देतां कामा नये. कारण, क्रमिक पुस्तक आणि नेमस्त, बेचव, वजनदार व चांगलें वर्तमानपत्र यांच्यामध्यें मुख्य भेद काय तो हेडिंगाचाच असतो." असें त्यांनीं निक्षून सांगितलें, तेव्हां 'धडा १ ला' हें हेडिंग देण्याची कल्पना निरुपायास्तव सोडून देणें भाग पडलें ! त्याचवेळीं सदर गृहस्थांनीं पत्राच्या वजनदारपणाबद्दलचे आपले कित्येक अनुभवशीर अभिप्राय सांगितले. त्या सगळ्यांतील त्यांचा मुख्य भावार्थ असा कीं, वर्तमानपत्राचा

वजनदारपणा हा मुख्यत्वेंकरून त्याला जितके जाड कागद घालावे त्यावर अवलंबून असतो. कांहीं दिवसांपूर्वी वर्तमानपत्राच्या वजनदारपणाची इयत्ता चार तोळ्यांपर्यंतच होती. परंतु पोष्ट खात्यानें मेहेरबान होऊन आपल्या पत्रांच्या वजनदारपणाची मर्यादा आणखी दोन तोळ्यांनीं वाढविली आहे. हल्लीं आपले पत्रांस सहा तोळेपर्यंत वजनदार होतां येतें, ही एक अभिनंदन करण्यासारखी गोष्ट आहे ! पत्रांच्या वजनदारीसंबंधानें हे आपले विचार प्रकट केल्यानंतर त्यांनीं ' दगडी कोळसा ' या प्रस्तुतच्या विषयासंबंधानें आणखी एकवार असें सांगितलें कीं, ' हा विषय मला फार आवडला. या ' दगडी कोळशा ' पासून कांहीं एक बिघण्याची भीति नाहीं. मनें बिघडण्याविषयीं तर शंकासुद्धां घ्यावयाला नको. कदाचित् कपडे बिघडतील; पण ते देखील प्रत्यक्ष कोळशानें. कोळशांवरील निबंधानें कांहीं एक परिणाम घडून यावयाचा नाहीं, याबद्दल कोणालाही खात्री वाटणें फारसें कठीण नाहीं. याकरितां असले विषय फार लोकोपयोगी होत !' असे त्यांचे एक का दोन अनेक उपयुक्त विचार बाहेर पडले ! परंतु त्या सगळ्यांना आमच्यापाशीं जागा नाहीं, याबद्दल दिलगिरी वाटते ! असो. कोळसा जितका उगळावा तितका काळा ! ह्याकरितां तो आणखी उगाळीत बसण्यांत काय अर्थ आहे !

परंतु ह्या दगडी कोळशांच्या प्रश्नालाही एक प्रकारचें विशेष महत्त्व आहे. व त्या संबंधानें लंडन टाइम्समध्यें त्या प्रश्नाचा एका लेखांत हिंदुस्थानच्या दृष्टीनें विचार केलेला आहे. लंडन ही इंग्लड देशाची राजधानी हें जुन्या भूगोलांतील मत होय. वास्तविक हल्लींच्या दृष्टीनें पाहतां लंडन ही फक्त इंग्लंडचीच राजधानी नसून सर्व ब्रिटिश साम्राज्याची राजधानी आहे. त्या ठिकाणीं प्रसिद्ध होणारें लंडन टाइम्ससारखें जें पत्र, त्यामध्यें ब्रिटिश साम्राज्यांतील सर्व ठिकाणच्या महत्त्वाच्या विषयावर लेख येणें, हेंच उचित आहे. परंतु पूर्वीची व्यवस्था तशी नव्हती. विशेष प्रसंगाशिवाय हिंदुस्थानासंबंधींच्या विषयांना त्यामध्यें जागा मिळत नसे. परंतु हें धोरण बदलून हल्लीं प्रत्येक आठवड्याला हिंदुस्थानासंबंधानें सदर पत्रामध्यें कांहीं तरी लेख आलाच पाहिजे, अशासारखा एक निर्बंध ठरविण्यांत आलेला आहे. व हा निर्बंध झाल्याची बातमी जेव्हां बाहेर पडली, तेव्हां लंडन टाइम्समधून हिंदुस्थानासंबंधींच्या विषयांवर लेख येत जाणार, म्हणून हिंदुस्थानांतील

कित्येक वर्तमानपत्रांतून आनंदातिरेकही प्रदर्शित करण्यांत आलेला होता. आपल्या इकडील विषय लंडन टाइम्सच्या द्वारें सर्व इंग्लिश लोकांच्या पुढें मांडले जावे, आणि त्या विषयांची आपल्या राज्यकर्त्यांच्या जातभाईंना माहिती व्हावी, आणि त्या योगानें आपली दाद लागून आपलें दुःख निवारण व्हावें, ही खरोखर आनंद मानण्यासारखी गोष्ट आहे, यांत कांहीं शंका नाहीं. परंतु नुसते लंडन टाइम्समध्यें हिंदुस्थानासंबंधानें लेख येतात, एवढ्यावरच आपण उड्या मारीत सुटण्यांत कांहीं हंशील नाहीं. त्या लेखांच्या धोरणाचा आपल्यावर काय परिणाम होणार, याचा मुख्यत्वेंकरून विचार केला पाहिजे. मागील एका आठवड्यांतील लेखांत डिस्ट्रिक्ट जज्जाच्या दुःखावस्थेबद्दल वर्णन केलेलें होतें. 'डिस्ट्रिक्ट जज्जांची दुःखावस्था' हा शब्दसमुच्चय पाहिला म्हणजे आपल्या इकडील लोक आश्चर्यानें चकित होऊन जातील ! ज्यांना दोन हजारांपासून अडीच हजारांपर्यंत दरमहा पगार मिळतो, त्यांच्यावर हिंदुस्थानांत दुःखाचे कोणते डोंगर कोसळतात, हें इंडियन लोकांना कळणें खरोखरच फार कठीण आहे ! परंतु सदर लेखामध्यें त्यांचें एक मुख्य दुःख जें सांगण्यांत आलें आहे तें हें कीं, त्यांना जें काम पडतें त्या मानानें त्यांचा पगार फार कमी असतो. एवढ्या लेखावरूनच त्यांचा कोणी पगार वाढवीत आहे, असें नाहीं. तरी पण असल्या सूचनांचा सरकारच्या मनावर कांहींच परिणाम व्हावयाचा नाहीं, असें नाहीं. वस्तुतः सरकार हें स्वतः सदोदित निरपेक्ष असतें. त्यांना हिंदुस्थानापासून कांहीं घ्यावयाचें नसतें, किंवा युरोपियन लोकांना कांहीं जास्त द्यावयाचें नसतें. जें वाजवी दिसेल तें करावयाचें. हेंच सरकारचें ब्रीद होय, हें आम्हांला कबूल आहे. परंतु वाजवी कोणतें, हें दाखविण्याचे प्रयत्न होत असतात, तेव्हां दुसऱ्या बाजूनेंही थोडेसें बोलणें भाग पडतें. वर्षांतून तीन चार महिन्यांच्या सुट्या, आणि बाकी राहिलेल्या दिवसांत सरासरीनें दररोज फार झालें तर पांच तास काम, इतक्या श्रमाला हिंदुस्थानासारख्या गरीब होत चाललेल्या देशांतून दरमहा दोन अडीच हजार रुपये मुशाहिरा मिळत गेला, तर तो थोडा आहे, असें वाजवी रीतीनें पाहिलें असतां कोणालाही म्हणतां यावयाचें नाहीं. अशी वास्तविक स्थिति असतां, डिस्ट्रिक्ट जज्जांचे पगार वाढविण्यासारख्या इंडियन विषयांवर लंडन टाइम्समध्यें लेख येण्यापासून आपल्या

तादृश फायदा होण्याचा कांहींएक संबंध नाहीं. उलट प्रसंगविशेषी नुकसा-नच होण्याची भीति आहे. लंडन टाइम्ससारख्या वजनदार पत्रामध्यें डि. जज्जांचा पगार वाढवावा असें म्हटल्यावर एखादे दिवशीं त्यांच्या जास्त खर्चाचा बोजा हिंदुस्थानाच्या डोक्यावर हळूच येऊन बसणें फारसें अशक्य आहे, असें नाहीं. दगडी कोळशाच्या संबधानें वर निर्दिष्ट केलेल्या टाइम्स-मधील लेखांत ज्या कित्येक सूचना केलेल्या आहेत, त्याही अशाच प्रका-रच्या आहेत. त्या काय आहेत, हें प्रत्यक्ष पाहिल्यावांचून त्यांचें खरें स्वरूप कळावयाचें नाहीं, म्हणून आपण त्यांच्याकडेच वळूं.

ह्या लेखांतील लेखकाचें म्हणणें असें आहे कीं, हिंदुस्थानांत कोळशाचा जितका फैलाव होईल तितका करण्याविषयीं प्रयत्न झाले पाहिजेत. हल्लीं हिंदुस्थानांत जाळण्याचें मुख्य साधन म्हटलें म्हणजे गोंवऱ्या व लांकडे हें होय. परंतु यांच्यावर सदर लेखकाचा असा कटाक्ष आहे कीं, ही इंधनें हिंदुस्थानाचा फार नाश करीत आहेत. विस्तवाच्या कामीं गोंवऱ्यांचा उपयोग होत असल्यामुळें देशांतील तितकें खत कमी होतें. व जें शेण स्वदेशांतील जमीन सुपीक करण्याचें कामीं खर्च व्हावयाचें तें विनाकारण आगीच्या भक्ष्यस्थानीं पडून जळून खाक होत आहे. यासाठीं गोंवऱ्या बंद झाल्या पाहिजेत. तसेंच लाकडें जाळण्याची पद्धतही चांगली नाहीं. लांकडें जाळणें म्हणजे पर्यायानें हिंदुस्थानांतील जंगलें जाळण्यासारखेंच आहे. आणि जंगलें तर पावसासाठीं फारच जरूरीचीं आहेत. आणि पावसाची हल्लींच्या दिव-सांत किती गरज आहे, हें कोणाला सांगितलें पाहिजे असें नाहीं. पूर्वीच्या रियासतींतून कदाचित् एक दोन आवर्षणें पडलीं, तरी लोक आपल्या जवळ असलेल्या पैशांतून कसे तरी दिवस कंठीत असत. परंतु अलीकडे पाऊस हा इंग्रजी राज्याचा एक जिवश्च कंठश्च स्नेही होऊन बसला आहे. पावसावर सर्व कांहीं अवलंबून असतें- पाऊस चांगला पडला- कीं, एक वर्षभर कांहीं भीति नाहीं. जिकडे तिकडे सुबत्ता होऊन जाते. परंतु वेळेवर पाऊस न पडला तर राजवाड्यापासून झोंपडीपर्यंत जिकडे तिकडे गडबड उडून जाते, व दुष्काळाचीं दुःखें भासूं लागतात. तेव्हां अशा स्थितींत सुबत्तेसाठीं पाऊस, पावसासाठीं जंगलें आणि जंगलांसाठीं लांकडें न जाळणें याची किती आव-श्यकता आहे, हें कोणाच्याही लक्षांत येईल. सारांश, वरील कारणपरंपरेसाठीं

लांकडें न जाळणें हें अत्यंत अगत्याचें आहे. शिवाय पूर्वी जंगलेंही फार होतीं. परंतु आतां तीं तशीं नाहींत. जिकडे तिकडे शेतकी करण्याची हाव जास्त वाढत चालल्यामुळें लोक जंगलांतील जमिनीही लागवडीस आणूं लागले आहेत. परंतु तीं जंगलें गेलीं तर त्यांच्या मोबदला शेतसारा तरी जास्त वाढत आहे. त्यामुळें जंगलाचा नाश एका दृष्टीनें क्षम्य तरी आहे. परंतु पावसाच्या कामीं अत्यंत उपयोगी अशा जंगलांचा कांहीं एक किफायत न होतां निव्वळ जळण्यासाठीं दुरुपयोग व्हावा, ही फार शोचनीय गोष्ट आहे. ह्याकरितां गोंवऱ्या आणि लांकडें यांचा उपयोग कमी करून दगडी कोळशाचा उपयोग जितका जास्त फैलावेल तितका तो फैलावूं द्यावा, अशी सूचना करण्यांत आली आहे.

सदर लेखकाचें असें म्हणणें आहे कीं, हिंदुस्थान देशांतील सर्व गोष्टी आपण स्वतः करावयाच्या, इतर नेटिव लोकांना मध्यें लुडबूड करूं द्यावयाची नाहीं, असें सरकारचें पूर्वीचें धोरण होतें. परंतु हल्लीं तसें नाहीं. निरनिराळ्या प्रकारच्या व्यापाराच्या आभिवृद्धीच्या गोष्टी लोकांवर सोंपवून त्या कामीं त्यांना लागेल ती मदत करण्याचा हल्लीं सरकारचा कल आहे. अशी जर खरोखरच स्थिति असेल, तर ही एक अभिनंदनीय गोष्ट आहे, असें म्हटलें पाहिजे. व्यापाराची वृद्धि करण्याकरितां सरकार हिंदुस्थानामध्यें एक नवीन खातें काढणार आहे, हेंही वरील गोष्टीचें एक द्योतक आहे, असें सदर लेखकाचें मत आहे; व त्याची अशीही सूचना आहे कीं सदर खात्यावरील मुख्य अधिकाऱ्यानें हिंदुस्थानामध्यें कोळशाचा जिकडे तिकडे फैलाव होईल अशी जरूर तजवीज करावी. चहाचे मळेवाले हिंदुस्थानांतील चहा परदेशांत खपविण्यासाठीं धडपडत होते. परंतु हिंदुस्थानांतच चहाचा जास्त फैलाव करण्याची कल्पना प्रथमतः त्यांच्या डोक्यांत आली नव्हती. परंतु चहाच्या लहान लहान पुड्या करून जिकडे तिकडे विकण्याची त्यांनीं सोय केल्यापासून चहावाल्यांचा किती तरी फायदा झाला आहे! तशीच कांहींतरी तजवीज कोळशांच्या खाणीं संबंधानें केली पाहिजे. या कामीं मुख्य अडचण म्हटली म्हणजे ही होय कीं, गोंवऱ्या आणि लांकडें यांच्यापेक्षां कोळसा हल्लीं फार महाग पडतो. बंगाल्यांत जेथें कोळशांच्या खाणी आहेत, तेथून तो सर्व हिंदुस्थानावर पसरविण्याला आगगाडीचें भाडेंच अतिशय पडतें,

आणि त्यामुळें कोळसा स्वस्त पडूं शकत नाहीं. त्यासाठीं सरकारानें आग-गाड्यांचे दर कमी केलें पाहिजेत. हल्लीं बंगाल्यांतील कोळसा बंगाल–नागपूर रेल्वेनें कलकत्यास जातो. आणि तेथून आगबोटीनें मुंबईकडे येतो. इतका द्राविडी प्राणायाम करावा लागतो व या कामीं अनेक ठिकाणीं उचला-उचल करावी लागल्यामुळें पुष्कळ कोळशाचें पीठ होऊन तो निरुपयोगी होतो. याकरितां रेल्वेचे दर कमी केल्याशिवाय कोळशाचा प्रसार फारसा होणें शक्य नाहीं. यासाठीं आगगाडीचे दर आर्धी कमी झाले पाहिजेत आणि हिंदुस्थानांतील व्यापाराच्या अभिवृद्धीसाठीं सरकारनें असें केलें तर त्यांत कांहीं मोठेसें गैर होणार आहे, असें नाहीं. शिवाय कोळसा स्वस्त झाल्यापासून हिंदुस्थानांत कोळशाचा एक नवीन व्यापार वाढेल इतकेंच नव्हे, तर त्यापासून दुसरेही अनेक फायदे होणार आहेत. कलकत्यास कोळसा स्वस्त असल्यामुळें तेथें इलेक्ट्रिक ट्रामवे माणसांना शहरांतून इकडून तिकडे नेत आहे, धुराचे दिवे रात्रीं रस्त्यावर उजेड पाडीत आहेत, उन्हाळ्याकरिता बर्फाचे कारखाने गार पाण्याची तरतूद करीत आहेत, व विजेचे पंखे काम करणाऱ्या लोकांचे घर्मबिंदु हरण करीत आहेत. अशाच प्रकारचे अनेक फायदे कोळशाच्या स्वस्ताईपासून इतर ठिकाणच्या लोका-नाही होण्याचा संभव आहे. इंडियन लोकांना होणारे सगळे फायदे सांगि-तल्यानंतर सदर लेखक मोठ्या नाखुषीनें आणि किंचित् कष्टानेंही आपल्या गोऱ्या बांधवांना होणाऱ्या फायद्यांकडे क्षणभर वळले आहेत. व तसें कर-तांना त्यांनीं पुढील लक्षांत ठेवण्यासारखें वाक्य उपयोगांत आणिलें आहे, तें येणेंप्रमाणें:—In Indian questions the comfort and well-being of our own countrymen usually take a second place. ह्या वाक्याचा अर्थ असा आहे कीं, हिंदुस्थानासंबंधानें जेव्हां एखादा प्रश्न असेल, तेव्हां त्या बाबतींत गोऱ्या लोकांचें सुख आणि कल्याण ह्या गोष्टी अर्थात्च दुसऱ्या प्रतीच्या होत; म्हणजे असल्या बाबतींत हिंदुस्थानांतील लोकांच्या सुखाकडे आणि कल्याणाकडे प्रथम लक्ष दिलें पाहिजे, आणि तें साध्य झाल्यानंतर मग गोऱ्या लोकांचें सुख आणि कल्याण हें साधलें पाहिजे. असलें तत्त्व नुसत्या शब्दांनीं प्रतिपादिलेलेंही पाहण्यांत विरळा येतें; मग कृतीमध्यें तें सांपडणें किती कठीण आहे, हें सांगावयाला नकोच. अशा

रीतीनें हें तत्त्व अलीकडे मरूप्रदेशांतील पाण्याप्रमाणें अतिशय दुर्मिळ झालेलें आम्ही मुद्दाम आपल्या वाचकांपुढें ठेविलें आहे. परंतु या उत्तम तत्त्वाकडे काळ्या लोकांपेक्षां गोऱ्या लोकांचेंच लक्ष जास्त लागलें पाहिजे. आधीं इंडियन लोकांचें सुख आणि मग अँग्लोइंडियन लोकांचें सुख असा क्रम जर सर्व बाबतींत पाळला गेला, तर मग हिंदुस्थानांतील लोकांना नाखुष होण्याचें काय कारण राहणार आहे ? परंतु हा उत्कृष्ट नियम क्वचितच पाळला जातो. सरकारी खात्यांतून कांहीं राजकीय कारणासाठीं इंडियनांपेक्षां अँग्लोइंडिनांना जास्त पगाराच्या आणि जास्त सुखाच्या जागा देणें कदाचित् जरूर असेल. पण रेल्वेसारख्या सार्वजनिक वाहनांच्या बाबतींतसुद्धां अँग्लोइंडियनांचें सुख आधीं आणि मग इंडियनाला सुख असलें तर असलें आणि नसलें तर नसलें, अशी जेथें स्थिति आहे, तेथें वर दिलेल्या प्रकारचीं तत्त्वें ही मान्य करण्यापेक्षां भग्न करण्याकरितांच जास्त उपयोगी आहेत, असें म्हणणें भाग पडतें. असो. कोळशांच्या संबंधानें सदर लेखकाचें असें म्हणणें आहे कीं, कोळसे स्वस्त होऊन इंडियन लोकांच्या गरजा भागल्या, म्हणजे मग बाकी उरलेल्या शक्तीनें छावणींतील सोजिरांचें पंखे हलविले गेले, तर तोही एक मोठा फायदा होणार आहे. असे अनेक फायदे दाखविण्यांत आलेले आहेत.

तरी पण यांत वास्तविक फायदा अखेरीस कोणाचा व्हावयाचा आहे, याचा थोडासा विचार करणें जरूर आहे. आजपर्यंत हिंदुस्थानांत पुष्कळ सुबत्ता होती व ती सुबत्ता जमिनीचें खत आणि पावसाचें साधन जाळूनही कायम राहिलेली होती. आतां जर सुबत्ता डळमळूं लागली असेल, तर गोंवऱ्यांची आणि लांकडांची राख हें त्याचें खरें कारण नव्हे. हिंदुस्थानांतून दरसाल पंचेचाळीस कोटी रुपये बाहेर जात आहेत, ह्या ज्या हिंदुस्थानच्या शरिराला, मि. दादाभाईच्या भाषेमध्यें भयंकर तुमड्या लागलेल्या आहेत, त्यांच्यामध्यें या क्षीणतेचें कारण शोधलें पाहिजे. शेणाचीं खतें आणि लांकडांचीं जंगलें ही कितीही सांचविलीं, तरी त्यांची मात्रा ह्या क्षीणतेवर लागू पडावयाची नाहीं, हें निर्विवाद आहे. परंतु ती लागू पडेल अशा बुद्धीनें आपण लांकडें व गोंवऱ्या न जाळतां कोळसा जाळूं लागलों, तर त्याचे काय परिणाम होतील, हें आपण पाहूं. कोळसा स्वस्त

करण्यासाठीं रेल्वेचेही दर कमी करण्यांत येतील. परंतु त्यापासून अखेरीस रेल्वे कंपन्यांचाच फायदा होईल. शिवाय जळाऊ लांकडांचा वगैरे आपल्या लोकांचा एक धंदा नाहींसा होऊन आपल्या भातभाजीचें शिजवणेंसुद्धां परकीय लोकांच्या कंपन्यांवर हल्लींच्या रॉकेलप्रमाणें अवलंबून राहूं लागेल. शिवाय, दुसरी एक गोष्ट अशी आहे कीं, हिंदुस्थानांत हल्लीं सुमारें ३५-४० हजार चौरस मैल क्षेत्रफळाच्या कोळशाच्या खाणी आहेत. परंतु ग्रेट ब्रिटनमधील खाणींच्या एकषष्ठांशच फक्त कोळसा हिंदुस्थानांतील खाणांतून एकंदरींत निघूं शकेल, असा शास्त्रज्ञ लोकांचा अंदाज आहे व हा कोळसा फार तर सुमारें ऐंशीं वर्षेंपर्यंत पुरेल अशी अटकळ आहे. अजून कोळसा स्वस्त झाला नाहीं व सार्वजनिक उपयोगाकरितां अजून त्याचा फैलावही झाला नाहीं. परंतु अशी जर व्यवस्था होईल, तर मग येथील कोळसा जास्तच लवकर संपून जाण्याचा संभव आहे. हल्लींच हिंदुस्थानांत सुमारें अर्धकोटी रुपयांचा कोळसा बाहेरून येत आहे व येथील लोकांना कोळसा जाळण्याची संवय लागली तर दुसरें कांहींएक न होतां परदेशी मालाचा खप मात्र जास्त वाढत जाईल, व हिंदुस्थानांतील व्यापार वाढविण्यासाठीं केलेल्या प्रयत्नांनीं परदेशाचा व्यापार मात्र वाढविल्यासारखें होईल. हिंदुस्थानांत कोळशाचा खप वाढवावयाला पाहिजे आहे, हें आम्हांलाही कबूल आहे. परंतु तो कोणत्या कामासाठीं? खताचें शेण आणि जंगलचीं लांकडें वांचविण्यासाठीं तो खात्रीनें नको आहे. तर येथें अनेक प्रकारचे निरनिराळे यांत्रिक कारखाने निघून त्यामध्यें हजारो टन कोळसा जळाला पाहिजे; म्हणजे त्यापासून हिंदुस्थानचें खरें हित आहे. जेथें आमचा भात लांकडें आणि गोंवऱ्या यांच्यावर शिजत आहे, तेथें तो विलायती कोळशांवर शिजला, म्हणून देशाच्या सांपत्तिक स्थितीमध्यें कांहीं मोठासा फेरबदल होणार आहे असें नाहीं. शिवाय ही सूचना करणाराला इंडियन लोकांच्या गृहस्थितीचें पूर्ण अज्ञान असलें पाहिजे, असें स्पष्ट दिसत आहे. इंग्लिशांना आमचें खरें कल्याण करण्याची प्रथम इच्छा असली पाहिजे. परंतु ती खरी इच्छा असल्यानंतर आमच्या खऱ्या गरजांचेंही त्यांना ज्ञान असलें पाहिजे. तें ज्ञान नसल्यामुळें त्यांच्या कित्येक सदिच्छाही विफल होतात.

आतां हिंदुस्थानांत कोळशाचा फैलाव करून पुढेंमागें त्या द्वारानें आप-

त्याकडील कोळशाचा तेथें जास्त शिरकाव करावा, अशी ज्या कोणा इंग्लिशांची इच्छा असेल, त्यांच्यापाशीं त्यांच्या इंग्लंड देशांत या दगडी कोळशाचा किती पुरवठा आहे, हें आपण पाहूं. या बाबतींत इंग्लंडची स्थिति अशी कांहीं बिलक्षण झालेली आहे कीं, तेथील दोन तृतीयांश लोकांचा उदर-निर्वाह केवळ यांत्रिक कारखान्यांवर चाललेला आहे. आणि हे सर्व कारखाने सर्वस्वी कोळशावर अवलंबून आहेत. जेव्हां हा कोळसा संपत आल्यामुळें महाग होईल किंवा अजिबातच संपेल, तेव्हां या लोकांचे हाल कुत्रादेखील खाणार नाहीं. हे सर्व जगांतील बलाढ्य लोक त्या वेळीं सर्वांहून कमकुवत होऊन बसतील, व काम नसल्यामुळें मजुरी नाहीं, आणि मजुरी नसल्यामुळें पोटाला नाहीं, ही अनर्थपरंपरा कितीतरी दूरवर जाईल, याचा कांहीं अंदाज नाहीं. इंग्लंडमधील कोळसा दिवसेंदिवस जास्त खपत चालला आहे. आणि शिवाय कोळशाच्या खाणी जसजशा जास्त खोल चालल्या आहेत तसतसे त्यांतून कोळसा काढण्याचे श्रम जास्त वाढूं लागले आहेत. दुसरी एक गोष्ट अशी लक्षांत बाळगिली पाहिजे कीं, कोळसा ही कांहीं धान्यासारखी वस्तु नाहीं. एकदां जमिनींतून धान्य काढून घेतलें आणि फिरून तेथें बीं पेरलें, तर फिरून धान्य उगवतें. तशी कोळशाची स्थिति नाहीं. कोळशाचें नियमित परिमाणच पृथ्वीच्या पोटामध्यें आहे. आणि तेवढें एकदां खलास झालें, म्हणजे मग खांका वर करून बसण्याशिवाय दुसरा उपाय नाहीं. शिवाय, इतर देशांतून कोळशांच्या खाणी पाठीमागून सांपडलेल्या आहेत. त्यामुळें इंग्लिशांच्या खाणी संपत येतील अशा वेळीं इतर देशांतील खाणींना सुरवात होईल, व त्या योगानें दोहोंच्या परिस्थितीमध्यें एकदम विलक्षण फरक पडेल, अशीही पुष्कळांना भीति आहे. इंग्लंडमधील वेल्स हा प्रांत कोळशासाठीं फार प्रख्यात आहे. तेथील टेकड्यांमधून हजारों टन कोळसा आगगाड्यांतून भरून समुद्रकांठीं उभ्या राहिलेल्या आगबोटींमधून दररोज ओतला जात आहे. परंतु हा रोजगार फार दिवस टिकणार नाहीं, अशी खुद्द इंग्लंडमधीलही पुष्कळ लोकांना भीति वाटत आहे; व ह्या आपण कोळशाच्या खाणी पोखरीत नसून आपल्या प्रत्यक्ष अस्तित्वाचा पाया आपण पोखरून पोकळ करीत आहों, अशी त्यांची कल्पना होत चालली आहे. अशी ज्यांची स्वतःची स्थिति आहे, त्यांनीं आपला कोळसा हिंदुस्थानांत

जास्त खपण्यासाठीं येथील लोकांना कोळसा जाळण्याची चटक लावावी, हें थोडेसें विपरीत दिसतें.

शिवाय इंग्लिशांनीं आपल्या साम्राज्याचा जो चोहोंकडे विस्तार केला आहे, त्याच्या संरक्षणाला कोळशाची अतिशय आवश्यकता आहे. इंग्लिशांचे आजकाल मुख्य वर्चस्व म्हटलें म्हणजे समुद्रावरचें होय व हें वर्चस्व त्यांना फक्त आपल्या लढाऊ आणि व्यापारी आगबोटींनीच कायम राखतां येत आहे. आणि ह्या सगळ्या प्रकारच्या आगबोटींचें मुख्य जीवन कोळशांवर आहे. जगाच्या नकाशाकडे थोडीशी दृष्टी टाकली असतां आपल्याला असें आढळून येईल कीं, कानडा, जमेका वगैरे खेरीज करून दक्षिण आफ्रिका, इजिप्त, हिंदुस्थान, आस्ट्रेलिया वगैरे इंग्लंडचीं प्रत्यक्ष आणि अप्रत्यक्ष राज्यें बहुतेक पूर्वेच्या बाजूला हिंदी महासागराच्या कांठीं आहेत. ह्या दूरदूरच्या प्रदेशांवर इंग्लंडनें आपलें वर्चस्व कायम राखिलें आहे. याला मुख्य मदत कोळशाची आहे. युरोपांतील भूमध्य समुद्र हें जसें पूर्वीं कित्येक लोकांनीं आपलें एक सरोवर केलें होतें, त्याप्रमाणें हिंदी महासागर हें एक हल्लीं इंग्लिशांचें बहुतेक खासगी सरोवर होऊन बसलें आहे. सगळ्या हिंदी महासागरामध्यें केप कॉलनीच्या टोंकापासून तों आस्ट्रेलियाच्या टोंकापर्यंत टेबलबे, दरबान, मॉरिशस, एडन, कराची, मुंबई, मद्रास, कलकत्ता, सिंगापूर, हाँगकाँग, ब्रिसबेन, मेलबोर्न वगैरे ब्रिटिशसाम्राज्याचीं कोळसे ठेवण्याचीं अनेक स्टेशन्स आहेत. व एवढ्या सगळ्या प्रदेशांत फक्त फ्रेंचांचींच काय ती पश्चिम आफ्रिकेच्या बाजूला दोन कोलिंग स्टेशन्स आहेत. ' फार ईस्ट ' म्हणजे अतिशय पूर्वेकडील बाजू म्हणजे चीन, जपान वगैरेंकडील पॅसिफिक समुद्राची जी बाजू, तिकडे जर्मन, रशियन, फ्रेंच, अमेरिकन, जपानीज वगैरे लोकांचीं कोलिंग स्टेशन्स कांहीं असलीं, तरी हिंदीमहासागर हें विस्तृत नांव ज्या इंग्लिश सरोवराला हल्लीं देण्यांत येऊं लागलें आहे, त्यांमध्यें इंग्लिशांशिवाय दुसऱ्या कोणाचेंही वर्चस्व नाहीं. ह्या सरोवरांत सिलोन, ट्रिंकोमाली, जावा, मॉरिशस, इजिप्त वगैरे ठिकाणें फ्रेंच, डच, वगैरे लोकांच्या हातीं पूर्वीं एकदां होतीं. परंतु इंग्लिशांनीं या सगळ्यांना तेथून हळूंहळूं हुसकून लावून ह्या सर्व हिंदी महासागराच्या सरोवराबर आपलें बहुतेक एकछत्री वर्चस्व करून ठेविलें आहे. अशा स्वरूपाच्या

ह्या हिंदी महासागराच्या सरोवराचें चित्र डोळयापुढें आणिलें म्हणजे इराणच्या आखातांतील कारस्थानाला हल्लीं इतकें महत्त्व कां आलें आहे, याबद्दलची थोडी तरी कल्पना वाचकांच्या मनामध्यें आल्यावांचून राहणार नाहीं. ह्या एकछत्री झालेल्या इंग्रजी सरोवरामध्यें रशिया आणि जर्मनी हे दोन बलाढ्य शत्रू डोकावूं पाहात आहेत. इराणमध्यें वर्चस्व स्थापन करित करित व आगगाडीचा मार्ग बांधीत बांधीत बंदर आब्बास जवळ येऊन रशिया ह्या निर्वेध बनलेल्या इंग्रजी सरोवरामध्यें आपल्या आगबोटी ढकलूं इच्छित आहे. तसेंच बगदादची रेल्वे बांधून व तिचा कोविट येथें टर्मिनस करून तेथून इराणच्या आखातांतून ह्या खाजगी इंग्लिशसरोवरामध्यें आपला चंचुप्रवेश करण्याचा जर्मनीचाही डाव चालू आहे. परंतु इराणच्या आखातामध्यें बंदर आब्बास आणि कोविट हीं रशियन आणि जर्मन बंदरें, आणि त्यांच्या पाठीमागें रशिया आणि जर्मनी यांचीं प्रचंड सामर्थ्यें आणि तीं सामर्थ्यें पाहिजे तेव्हां समुद्रकांठीं येण्याला त्या त्या बंदरांपर्यंत त्यांच्या आगगाड्या, ही स्थिति हिंदीमहासागराच्या सरोवरावर आपलें एकतंत्री साम्राज्य चालवूं इच्छिणारे इंग्लिश कधींही शक्य होऊं देणार नाहींत. आज इतर सर्व युरोपियन राष्ट्रांची अशी स्थिति आहे कीं, त्यांना जर पूर्वेकडे यावयाचें असेल तर त्यांना इंग्लिशांच्या दारांतूनच किंवा केप ऑफ गुड होपाला वळसा घालूनच आलें पाहिजे व दुसऱ्यांची जीं कोलिंग स्टेशन्स आहेत तेथूनच त्यांना कोळशाचा पुरवठा करून घेतला पाहिजे. इतकें परस्वाधीन झाल्यावांचून त्यांना दुसरी सोयच नाहीं. याकारितांच जर्मनी बगदाद रेल्वेनें दुसरी वाट काढूं इच्छित आहे. आणि रशियानें पोर्ट-आर्थरकडून काढलेली वाट जरी डळमळूं लागली आहे, तरी इराणांमधून डोकीं देऊन बाहेर पडण्याचा त्याचा यत्न चालूं आहे. परंतु हे यत्न इंग्लिश सफल होऊं देणार नाहींत. रशियाला त्यांनीं काळ्या समुद्रामध्यें अडविलें आहेच. पॅसिफिक समुद्रांतील पोर्ट आर्थरच्या बंदरांत त्यांना इंग्लिशांनीं जपानी लोकांकडून अडविलें आहे; आणि इराणाच्या आखातामध्यें त्यांना अडविण्याचें इंग्लिशांचे स्वतःचे प्रयत्न हल्लीं जारीनें सुरू आहेत. सारांश या सगळ्या हिंदी महासागराच्या सरोवरावर आपलें वर्चस्व कायम ठेवण्याचा इंग्लिशांचा इरादा आहे आणि त्यासाठीं त्यांची खटपट चालू

आहे. परंतु हे सगळे खेळ कोळशाचे आणि वाफेचे आहेत. आगबोटीवर कोळसे भरण्याचीं ठाणीं एकमेकांच्या जवळ जवळ नसतील, तर हिंदी-महासागराच्या इतक्या मोठ्या सरोवरावर अबाधित वर्चस्व कायम राखणें कोणालाही शक्य होणार नाहीं. आगबोटींतून कोळसे ठेवण्याची जागा नियमित असते. व कोणत्या जातीचा कोळसा वापरला असतां किती मजल मारली जाईल, याबद्दलही हिशेब अगदीं कायम ठरलेले असतात. वेल्स-मधील कार्डिफचा कोळसा हा सर्वांत उत्तम होय. व हा कोळसा जाळणाऱ्या आगबोटीचा वेग इतर कोळसा जाळणाऱ्या आगबोटींच्या वेगाहून पुष्कळ कमी असतो. हा कार्डिफचा कोळसाच बहुतेक लढाऊ गलबतें वापरतात. जपानच्या स्वतःच्याच कोळशाच्या खाणी जपानमध्यें आहेत. आणि रशियाला सायबेरियामधून कोळसा मिळण्यासारखा आहे. परंतु हे सर्व कोळसे कमी प्रतीचेच होत. त्यामुळें बहुतेकांना कार्डिफच्या कोळशावरच अवलंबून रहावें लागतें. फ्रान्स देश समुद्रावरील लढाईत इंग्लंडशीं टक्कर देण्याला बऱ्याच अंशीं बरोबरीचा आहे. तरी तो फ्रान्स देशसुद्धां दररोज इंग्लंड पासून कार्डिफचा सहा आगबोटी कोळसा विकत घेत असतो. आफ्रिका, हिंदुस्थान, आस्ट्रेलिया वगैरे ठिकाणीं स्थानिक कोळसा थोडा-बहुत सांपडतो; परंतु तो अगदीं हलक्या प्रतीचा असतो. म्हणून इंग्लि-शांनाही मुख्यत्वेंकरून कार्डिफचाच कोळसा सर्व ठिकाणीं वापरणें भाग पडतें.

इतका ज्या कोळशाचा चोहोंकडून खप चालला आहे, तो लवकरच संपेल अशी पुष्कळ भूगर्भशास्त्रवेत्त्यांना भीति वाटत आहे. परंतु हल्लीं पाश्चियात्य देशांतून नवीन नवीन शास्त्रीय शोधांची माहिती लागत चाल-लेली आहे, त्यामुळें हल्लीं जीं कोळशानें कामें होत आहेत तीं पुढेंमागें तिकडील लोक विद्युच्छक्तीनें करूं लागतील, असा शास्त्रज्ञांचा एक अद-मास आहे. परतु तूर्त तरी निदान सर्व पाश्चिमात्य सुधारणा कोळशावर अव-लंबून आहे. तरी पण चमत्कार असा आहे कीं, हा कोळसा ज्या लोकांपासून बाकीच्यांना प्राप्त होतो, त्या खाणींतील मजुरदार लोकांबद्दल कोणीही फारशी पर्वा करीत नाहींत. खाणींतून कोळसा काढण्याचें काम कष्टाचें, धोक्याचें .आणि घाणेरडें असतें. अमेरिकेमध्यें सेंट लुई येथें कांहीं थोड्या

दिवसांपूर्वी जें एक जंगी प्रदर्शन उघडण्यांत आलें, त्या प्रदर्शनामध्यें पृथ्वीच्या पाठीवर ज्या ज्या कांहीं वस्तु आहेत त्या त्या सर्व तेथें एकत्र दाखविण्याचा प्रयत्न करण्यांत आलेला आहे. त्यामुळें तेथें अर्थात् कोळशाच्या खाणींच्या प्रदर्शनालाही जागा मिळालेली आहे. या खाणींच्या प्रदर्शनाकरितां १७५० फूट लांबीची जागा व्यापण्यांत आलली आहे. खाणींतून कोळसे वाहण्याकरितां ज्या गाड्या असतात, तशा प्रकारच्या गाड्या त्या प्रदर्शनामध्यें केलेल्या असून त्यांत बसून प्रेक्षकांना खाणींतील सर्व प्रकारचे चमत्कार आणि तेथील मजुरीचे काबाडकष्ट पहावयाला सांपडतात. कोळसा खणला कसा जातो, नंतर त्याच्या प्रती कशा लावल्या जातात, तो गाडींत कसा भरला जातो, हवा येण्याकरितां खाणीमध्यें द्वारें कशीं असतात, खाणीच्या खोल खोल पोटांतून कोळसे भरून गाड्या कशा बाहेर पडत असतात, खाणीचा एखादा भाग कोसळला तर त्याच्याखालीं मजूर लोक कसे गाडून जातात, खाणींत पाणी शिरलें असतां तेथील मजूर लोकांची पळतां पळतां कशी त्रेधा होते, आणि खाणीमध्यें विषारी हवा उत्पन्न होऊन तिच्यापासून आपोआप भयंकर सुरुंगाप्रमाणें मोठमोठे आगीचे भडके कसे उडतात, या सगळ्यांचें अगदीं हुबेहुब चित्र सेंट लुई येथील प्रदर्शनामध्यें पाहावयास मिळतें. मजूर लोकाच्याबद्दल तिकडे हल्लीं मोठे वादग्रस्त प्रश्न उत्पन्न झाले आहेत. तेव्हां त्यांची भयंकर स्थिती अशा ठिकाणीं पुष्कळ लोकांना प्रत्यक्ष पहावयाला मिळाल्यानें लोकमतामध्यें कदाचित् फरक पडण्याचा संभव आहे

सारांश, या कोळशाच्या कामांत मजूर लोक अगदीं जिकीरीस आलेले आहेत व जमिनीच्या पोटांतील कोळशाचा सांठाही केव्हां तरीं संपल्यावांचून रहावयाचा नाहीं. तरी पण या गोष्टीचा विचार न करितां त्या कोळशाच्या जिवावर पाश्चिमात्य जगाच्या सर्व उड्या चाललेल्या आहेत. व असें म्हटलें तरीही अतिशयोक्ति होणार नाहीं कीं, हल्लींची रूसो-ज्पानी लढाई हीसुद्धां कोळशांवरच चाललेली आहे. समुद्रांवरील लढाई म्हटली म्हणजे त्यामध्यें कोळसा हें प्रधान अंग असलेंच पाहिजे. पोर्ट आर्थरला वेढा पडलेला असल्यामुळें तेथें इतर जिन्नसांप्रमाणें कोळशाचीही तूट पडूं लागली आहे, अशी कांहीं दिवसांपूर्वी एक तार होती. कोळसा हें लढाईचें हल्लीं जीवित होऊन बसलें आहे. तो कोळसा पोर्ट आर्थर येथील लोकांना पोंहोच-

विण्यासाठीं कित्येक गलबतें भरून जात आहेत अशी बातमी लागल्यावरून तीं पकडण्यासाठीं जपानी लोक पोर्ट आर्थरच्या तोंडाशीं टपून बसलेले आहेत, अशीही एक तार प्रसिद्ध झालेली आहे. जपानी लोकांनीं रशियन लोकांवर इतर ठिकाणीं जितक्या सुलभ रीतीनें विजय मिळविले तितक्या सुलभ रीतीनें त्यांना पोर्ट आर्थर येथें यश येईल असें दिसत नाहीं. पोर्ट आर्थरला वेढा पडून आज कित्येक महिने होत आले, तरी पण तें ठिकाण अद्यापि जपानी लोकांच्या हस्तगत झालें नाहीं व याच्यापुढेंही तें लवकर होईल अशीं चिन्हें दिसत नाहींत. त्याप्रमाणें जपानी लोकांचा जमिनी-वरील जय तरी कायम टिकेल किंवा नाहीं, याच्याबद्दलही आतां थोडी-बहुत शंका उत्पन्न होऊं लागली आहे. रशियन लोकांची फिरून जारीनें तयारी चालली आहे. बाल्टिक समुद्रांतील रशियाचें आरमार स्वस्थ बसून नाहीं. त्याच्या हालचाली सुरू होऊन तें आरमार पूर्वेकडे येण्याकरितां निघालेंही आहे. ह्या आरमारामध्यें बेचाळीस लढाऊ गलबतें पूर्वेकडे पाठ-विण्याची योजना झालेली आहे व त्या गलबतांकरितां आफ्रिकेच्या पश्चिम किनाऱ्यावर पुष्कळ कोळसा सांठवून ठेवण्यांत आला आहे. रशिया आणि जपान यांची लढाई चालली आहे खरी, परंतु त्या लढाईपासून इंग्लंडची तूर्त चंगळ उडाली आहे. हीं दोन्हीही लढणारीं गिऱ्हाइकें इंग्लंडापासून कोळसा विकत घेत आहेत. फक्त एका कार्डिफहून प्रत्येक महिन्याला पंधरा हजार टन कोळसा ह्या लढाईकरितां पाठविला जात आहे. शिवाय इतर बंदरांतून कोळसा जात आहे तो निराळाच. इतका कोळशाचा पुरवठा करून जें लढाऊ आरमार पूर्वेकडे निघालें आहे, त्यानें जपानची स्थिति बरीच अवघड होईल यांत शंका नाहीं. ज० क्युरोपॅटकीन यांनींही फिरून एक जाहिरनामा प्रसिद्ध करून आपल्या सैन्याला उत्तेजन दिलें आहे व अखेरीस आपण विजय मिळविल्यावांचून रहावयाचें नाहीं असें जाहीर केलें आहे. हे मध्यंतरीचे पावसाचे व हिंवाळ्याचे कांहीं दिवस गेले, म्हणजे समुद्रांमध्यें तें बेचाळीस गलबतांचें आरमार व जमिनीवर नवीन सैन्याची कुमक आल्यानंतर जी लढाई होईल, त्यांत रशियाला जय मिळेल अशी रशियन पत्रांना आशा आहे. जपानी बादशाहानेंही एक जाहिरनामा काढून लोकांना असें सांगितलें कीं, आतांपर्यंत जरी आपल्यास जय मिळाला,

तरी अजून लढाईचा शेवट फार दूर आहे; तेथपर्यंत तुम्हीं सर्वांनीं धीर धरून नेटानें लढाई चालविली पाहिजे. अशा दृढनिश्चयाच्यां जपानी लोकांना परमेश्वर अखेरीस यशस्वी करो !

---

## धर्मांतील लॉर्ड क्लाइव्ह : : : १८

इंग्लिश लोक आपल्याला इतिहास शिकवितात हे त्यांचे आपल्यावर एक उपकारच आहेत. ते देखील आपल्याला सर्वच इतिहास शिकवितात असें नाहीं. कांहीं चांगले इतिहास, खरे इतिहास, हिंदुस्थानच्या सद्यःस्थितीला उपयोगी इतिहास, आणि हिंदुस्थानच्या भावी उत्कर्षाला कारणीभूत होणारे इतिहास शिकवीत नाहींतच. ग्रीस, रोम वगैरे देशांचे अभिमानजनक इतिहास शाळांतून पूर्वी चालू असलेले त्यांनीं बंद केले आहेत. आता आपल्याला इंग्रजी वाचतां येऊं लागल्यानंतर आपण तेही इतिहास वाचतो ही गोष्ट वेगळी. परंतु त्यांच्या प्रयत्नावरून आपल्या मुलांनीं कोणते इतिहास वाचावे याबद्दल त्यांची जी कांहीं इच्छा आहे ती स्पष्टपणें व्यक्त होत आहे. परंतु कांहीं राजकीय हेतूनें ग्रीसचे आणि रोमचे इतिहास आपल्या इकडे बंद करण्यांत आले असतील, तर त्या मानानें हिंदुस्थानच्या इतिहासाचे परिशीलन हिंदुस्थानांत

बंद करण्याला जास्त कारणें आहेत, असे कोणालाही कबूल करावें लागेल. कारण हिंदुस्थानांतील लोकांचीं मनें स्वदेशासंबंधानें उद्दीपित करण्याला हिंदुस्थानच्या इतिहासामध्यें जशीं अनेक स्थळें आहेत तशीं तीं दुसऱ्या कोणत्या इतिहासामध्यें मिळणार आहेत ? ग्रीसच्या आणि रोमच्या इतिहासामध्यें काय आहे ? आणि ते आम्ही वाचले किंवा न वाचले, म्हणून तरी काय होणार आहे ? हिंदुस्थान देश हा पूर्वी कोणाचा होता हें काय ग्रीसच्या इतिहासामध्यें सांगितलें आहे ? किंवा त्यावर आपल्यापैकीं कोणकोणत्या राजांनीं कसकशीं राज्यें केलीं याबद्दलची हकीकत काय रोमच्या इतिहासामध्यें सांपडणार आहे ? प्लासीची लढाई, श्रीरंगपट्टणचा वेढा, वसईचा तह, डलहौसी साहेबांची कारकीर्द वगैरेंबद्दलची माहीती ग्रीस देशाच्या किंवा रोमन साम्राज्याच्या इतिहासांमध्यें काय सांपडणार आहे ? वास्तविक इंग्लिशांनीं हिंदुस्थानच्या इतिहासांतील याच हकीकतींना जास्त भ्यावयाला पाहिजे होतें. यांच्यासारखे मन उद्विग्न करून सोडणारे तेज ग्रीसच्या आणि रोमच्या इतिहासांत काय आहे ? तरी पण सरकारनें असलाही हिंदुस्थानचा इतिहास आपल्यामध्यें चालू ठेविला आहे. ह्यावरून दुसरे इतिहास बंद करण्यामध्यें सरकारचा कांहीं राजकीय हेतु असला पाहिजे ही जी कित्येकांची एक कल्पना आहे, ती खोटी ठरते. सरकार उदार अंतःकरणाचें आहे आणि त्यांना असल्या बारीक सारीक गोष्टींचीं बिलकूल दिक्कत वाटत नाहीं अशी वरील गोष्टीवरून कोणाचीही खात्री होईल. त्यांना जर कांहीं दिक्कत असती तर त्यांनी हिंदुस्थानचा इतिहास हिंदुस्थानांतील शाळांतून खात्रीनें सुरू ठेविला नसता. निदान त्यांना तो इतिहास सुरू ठेवावयाचाच असता तर वेदकाळापासून औरंगजेबाच्या कारकीर्दीच्या अखेरींपर्यंत सर्व इत्थंभूत हकीकत देऊन तेथून १८५८ च्या राणीसाहेबांच्या जाहीरनाम्याच्या मध्यंतरीच्या अवधीबद्दल कांहीं एक अवाक्षरही न लिहितां अठराशें अठ्ठावनापासून पुढचा हिंदुस्थानच्या इतिहासाचा भाग लिहून तीं पुस्तकें त्यांनीं हल्लींच्या 'सिटिझन ऑफ इंडिया' ह्या पुस्तकाप्रमाणें हिंदुस्थानांतील मुलांच्या हातांत दिलीं असतीं. सतराव्या शतकाच्या आरंभापासून एकोणिसाव्या शतकाच्या मध्यापर्यंत हिंदुस्थानांत काय काय झालें आणि कसें कसें झालें याच्याबद्दल आपले स्वतःचे इतिहास लिहून न ठेवणाऱ्या आम्हां

हिंदुस्थानांतील लोकांना इंग्लिशांनीं त्याबद्दल माहिती दिली नसती तर आज आपणांस काय माहित असतें ? अशी वास्तविक स्थिती असतां मध्यंतरीचा दोन अडीचशें वर्षांचा इतिहास आपण स्वतः लिहून इंग्लिश लोक आम्हांला वाचावयास देत आहेत हे त्यांचे आपण उपकारच मानले पाहिजेत. क्लाइव्ह साहेबांनीं उमीचंदाच्या तोंडाला कशीं पानें पुसलीं, हेस्टिंग्ज् साहेबांनीं काशीचा राजा व अयोध्येच्या बेगम यांच्यावर कसे जुलूम केले आणि डलहौसी साहेबांनीं सातारा, नागपूर, अयोध्या, पंजाब या प्रांताची कोणत्या तऱ्हेनें विल्हेवाट लाविली याबद्दलची माहिती इंग्लिशांनींच आम्हास सांगितली नसती, तर ती आम्हांला कळण्याचें कांहीं साधन नव्हतें. क्लाइव्ह साहेबांनी बनावट कागद केले, हेस्टिंग्जसाहेबांनी जुलूम केले, आणि डलहौसी साहेबांनीं राज्यें बुडविलीं हें इंग्लिशांनीं सांगितलें नसतें, तर इतर इंडियन लोकांनीं बाकीच्या साहेबांप्रमाणें या तिघा साहेबांनाहि देवच मानिलें असतें. परंतु या तिघांच्या हातून अशीं अशीं कृत्यें झालेलीं आहेत, असें इंग्लिश लोकच सांगतात, तेव्हां स्वाभाविकपणेंच ऐकणाराचें लक्ष त्या तीन साहेबांच्या थोड्या गौण वर्तनापेक्षां सर्व साहेबांच्या उदात्त अंतःकरणवृत्तींकडेच जास्त वेधलें जातें. असो. अशा उदार अंतःकरणाच्या वृत्तीनें इंग्लिशांनी हिंदुस्थानचे जे इतिहास लिहिलेलें आहेत त्यांमधून आपल्याला अनेक प्रकारची माहिती मिळते. इंग्रजी व्यापाराच्या जिनसा हिंदुस्थानांत पुष्कळ खपाव्या म्हणून कित्येक कारखान्यांतील रहस्य इंग्लिश लोक आपल्याला सांगत नाहींत, त्याप्रमाणें इंग्लिशांचें राज्य येथें कायम टिकावें म्हणून त्यांनीं ह्या गेल्या दोनअडीचशें वर्षांतील इतिहासाचीं रहस्यें आपल्याला सांगितलीं नसतीं तर आपण काय करणार होतों? सारांश इंग्लिश लोक आपल्याला आपला मागचा इतिहास वाचूं देत आहेत, हे त्यांचे आपल्यावर खरोखर उपकार आहेत, असेंच म्हटलें पाहिजे. !

त्या इंग्लिशांनीं लिहिलेल्या इतिहासांतील लॉर्ड क्लाइव्ह यांचें चरित्र बहुतेकांना माहीत असेलच. हे लॉर्ड क्लाईव्ह म्हणजे राजकीय कामांतील होत. परंतु युरोपखंड जेव्हां सुवर्णभूमीच्या शोधासाठीं वखवखून हिंदुस्थानांत ठेचाळत येऊन पडूं लागलें, तेव्हां हिंदुस्थानांत फक्त राजकीय क्लाइव्ह साहेबच आले असें नाहीं; तर हिंदुस्थानला धार्मिक क्लाइव्ह साहे-

बहि लाधलेले आहेत. या धार्मिक कामांतील क्लाइव्ह साहेबांची थोडीशी हकीकत देण्याचें आम्ही आज योजिलें आहे. राजकीय क्लाईव्ह साहेब हिंदुस्थानांतील आबालवृद्धांना माहीत झालेले आहेत. इतकी प्रसिद्धि धार्मिक क्लाइव्ह साहेबांची नाहीं. या धार्मिक क्लाईव्ह साहेबांच्या हकीगती पूर्वीपासून थोड्याबहुत निरनिराळ्या ठिकाणीं उपलब्ध होत्या. परंतु त्यांचें संकलित चरित्र एके ठिकाणीं नव्हतें, तें 'ईस्ट अँड वेस्ट' च्या चालू महिन्याच्या अंकांत डॉ. जॅप यांनीं देऊन युरोपियन कृष्णकारस्थानाविषयीं अनभिज्ञ असलेल्या हिंदुस्थानांतील लोकांना आपले ऋणी करून ठेविलें आहे. सतराव्या शतकाच्या प्रारंभीं हिंदुस्थान देश म्हणजे बिनकुंपण घातलेलें एक शेत होतें असें म्हणण्यास हरकत नाहीं. पाहिजे त्यानें यावें आणि येथें खुशाल चरावें, अशी त्यावेळीं स्थिति होती. त्यामुळें हिंदुस्थानावर अनुग्रह करण्याकरितां सर्वच प्रकारचे युरोपियन लोक पुढें सरसावले; व युरोपियन धर्म, युरोपियन व्यापार आणि त्यांच्या पाठीमागून युरोपियन राज्य यांचा चोहोंकडे भराभर फैलाव होऊं लागला. हल्लीं हिंदुस्थानावर इंग्लिशांचें एकच राजकीय साम्राज्य आहे, असें पुष्कळ लोक समजतात. परंतु वस्तुस्थिति केवळ तशीच नसून, हिंदुस्थानावर खिस्ती धर्माचें आणि इंग्रजी व्यापाऱ्यांचेंहि साम्राज्य स्थापन झालेलें आहे. ह्यांपैकीं इंग्लिश राजकीय साम्राज्याच्या संस्थापनेमध्यें आपल्या अंगचे अलौकिक खोडसाळ गुण उपयोगांत आणल्यामुळें क्लाइव्ह साहेब जसे प्रसिद्धीस आलेले आहेत, तसें धार्मिक साम्राज्याच्या उभारणीच्या कामीं आपल्या अंगच्या खोडसाळपणानें अतिशय उपयोगी पडलेले क्लाइव्ह साहेब म्हटले म्हणजे रॉबर्ट डि नोबिली हे होत. या धर्मपुरुषाचें जें चरित्र आम्ही देत आहों, त्यावरून त्यांना धर्मांतील लॉर्ड क्लाइव्ह असें आम्ही कां म्हणत आहों, हें वाचकांच्या लक्षांत येईल.

रॉबर्ट डि नोबिल हा इसम इ. स. १५७७ या वर्षी जन्मास आला. त्या वेळीं युरोपखंडामध्यें रोमन क्याथॉलिक धर्माचें अतिशय वर्चस्व होतें. व खिस्ती धर्म सर्व ठिकाणीं पसरविण्याचें वेड या धर्माच्या अनुयायी लोकांच्या मनामध्यें मुसलमानांपेक्षां कांहीं कमी होतें असें नाहीं. परंतु मुसलमानांपेक्षां यांच्यामध्यें लबाडी मात्र जास्त होती. पण त्यांतल्या त्यांतसुद्धां ह्या

लबाडीच्या गुणामध्यें सर्व खिस्ती लोकांमध्यें जेसूइट पंथाचें लोक फार वाकबगार होते. या जेसूइट लोकांच्या अंगांत पुष्कळ चांगलें गुण होते, याबद्दल शंका नाहीं. परंतु त्यांच्या आचरणामध्यें जितका सत्यपणा आणि सरळपणा धार्मिक पेशाला जरूर असावा तितका नव्हता, ही मोठ्या दुःखाची गोष्ट आहे. रॉबर्ट डि नोबिली हा या जेसूइट पंथापैकीं एक होता, व तो अगदीं सतराव्या शतकाच्या प्रारंभीं हिंदुस्थानामध्यें आला. हल्लीं हिंदुस्थानावर इंग्लिशांचें राज्य आहे, ह्मणून खिस्ती धर्माची वाढ चालली आहे, असें कोणी म्हटलें असतां हल्लींचे खिस्ती मिशनरी लोक आणि त्यांच्या मोहांत सापडणारे आमच्यांतील कित्येक लोक असें म्हणत असतात कीं, ‘ असें मुळींच नाहीं. खिस्ती धर्म आपल्या अंतर्गत चांगलेपणावर वाढत आहे. तो इंग्रजी राज्याच्या आश्रयावर अवलंबून नाहीं. ’ तसेंच धर्माची वृद्धि करण्याकरितां जर कोणी तरवारीचा प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष उपयोग केला असेल, तर तो फक्त मुसलमानांनींच केलेला आहे. खिस्ती लोकांनीं या कामीं तरवारीच्या भीतीचा कधींच उपयोग केलेला नाहीं, अशी एक समजूत आहे. अशीं मतें पुढें आलीं म्हणजे बहुतेक वेळीं गप्पच बसावें लागतें. परंतु एखादेवेळीं ह्या मतांच्या विरुद्धही पुरावा सांपडतो. डॉ. जॅप यांनी रॉबर्ट डि नोबिली यांच्या वेळीं खिस्ती धर्माची येथें कशी स्थिति होती, याबद्दल जें वर्णन केलें आहे त्यामध्यें यावरील मतांना थोडेंसें प्रत्युत्तर सांपडण्यासारखें आहे. इंग्लिशांच्या हिंदुस्थानांतील राज्यावरच हल्लींची येथील खिस्तीधर्माची वाढ अवलंबून आहे. ही व्याप्ति खरी करून दाखविण्याला कोणालाही झालें तरी अन्वयव्यतिरेकाचाच आश्रय केला पाहिजे. त्यांपैकीं अन्वयव्याप्ति तर हल्लीं आहेच. कारण, हल्लीं इंग्रजी राज्य आहे ! म्हणून खिस्ती धर्माची वाढ आहे ! आतां यांचें व्यतिरेकस्थळ म्हणजे इंग्रजी राज्य नाहीं म्हणून खिस्ती धर्माची वाढ नाहीं. अशीं स्थिति दाखविणें शक्य नाहीं. तरी पण दुसऱ्या उदाहरणामध्यें हा व्यतिरेक खरा असल्याचें दाखविता येण्यासारखें आहे. रॉबर्ट डि नोबिली हा हिंदुस्थानांत आला त्यावेळीं येथील खिस्तीधर्मप्रसार फारसा जोरांत नव्हता, व त्याचीं कारणें डॉ. जॅप यांनीं पुढीलप्रमाणें दिलीं आहेत:—‘The military power of Portugal, on which the success of Christian Missions had hitherto depended, was now on the wane. The sword

which had proved the most active agency of conversion in the hands of the Catholics, was now required to maintain their position against the Dutch, वरील इंग्रजी वाक्यांचा भावार्थ येणेंप्रमाणें आहे:—पोर्तुगाल देशाचें हिंदुस्थानामध्यें जें लष्करी वर्चस्व स्थापित झालेलें होतें, त्याजवर मुख्यत्वेंकरून इंडियांतील ख्रिस्ती मिशनांची भरभराट अवलंबून होती. परंतु तें पोर्तुगीज वर्चस्व हळुहळु कमी होत चाललें होतें. कॅथॉलिक लोकांनीं इतर लोकांना बाटविण्याच्या कामीं आपल्या तरवारीचाच मुख्यत्वेंकरून उपयोग केलेला होता. परंतु ती तरवार यापुढें ख्रिस्ती धर्माच्या प्रसारासाठीं उपयोगांत आणण्याला मुळींच सवड नव्हती. कारण, दुसरीकडे डच लोक प्रबळ होत चाललें होतें व त्यांचें प्राबल्य कमी करण्याकरितां त्या तरवारीचा उपयोग करणें जरूर होतें. अशा अर्थाचा वर जो इंग्रजी उतारा दिला आहे, त्यावरून हें कोणाच्याही लक्षांत येईल कीं, हिंदुस्थानांतील ख्रिस्तीधर्म म्हणजे अगदीच कांहीं सोंवळा नाहीं. हिंदुस्थानांत बहुतेक मुसलमानी धर्मासारखींच त्या धर्माची स्थिति आहे. हिंदुस्थानांत ख्रिस्ती धर्म हा ख्रिस्ती राजाच्या जोरावरच मागें वाढला व आतांही वाढत आहे, याबद्दल बिलकूल शंका नाहीं, व तो नुसत्या मोघम राजांच्या आश्रयावरच वाढलेला आहे, असें नसून त्या राज्यांतील तरवारीच्या धाराही येशूचा पवित्र धर्म वाढविण्याला कारणीभूत झालेल्या आहेत, असें डॉ. जॅपसारखे लोकच आपल्याला सांगत आहेत. सोळाव्या शतकाच्या प्रारंभीं वर वर्णन केल्याप्रमाणें ख्रिस्ती धर्माची स्थिति होती. राजाश्रय थकत चालल्यामुळें ख्रिस्ती धर्माची उदात्त आणि ईश्वरप्रणित तत्त्वें थंडगार पडलीं होतीं. जेथें सेंट झेविअर सारख्यांनीं दररोज हजारों माणसें बाटवावीं, तेथें एकही माणूस बाटुं नये अशी स्थिति प्राप्त झाली होती. मद्रास इलाख्यांत मदुरा हें जें हिंदुधर्माचें अतिशय पवित्र ठिकाण आहे आणि ज्या ठिकाणीं रॉबर्ट डि नोबिली यानें आपल्या कपटनाटकाचे खेळ पुढें करून दाखविले त्या ठिकाणीं फरनँडिझ या नांवाचा एक पाद्री बारा वर्षेपर्यंत आपलें दुकान उघडून बसला होता. तरी त्याच्या जाळ्यामध्यें एकही सावज सापडलें नाहीं, अशी त्यावेळीं ख्रिस्ती धर्माच्या भरभराटीची स्थिति होती ! अशा स्थितींत रॉबर्ट डि नोबिली हा मदुरा येथें आला व तेथें त्यानें आपल्या मजर-

बंदीच्या खेळाला सुरवात केली. आपण लबाडी करणार आहों, हें ह्या धार्मिक बाबतींतील क्लाईव्हसाहेबांना माहीत होतें. ह्याकरितां त्यांनीं आपल्याहून श्रेष्ठ अशा गोव्यांतील मुख्य धर्माधिकाऱ्यांचा हुकूम घेऊन ठेविला होता. कारण, पवित्र अधिकाऱ्यांच्या हुकमानें लबाडी केली तर ती लबाडी नव्हे ! परंतु चांगली लबाडी करण्यालाही पुष्कळ परिश्रम करावे लागतात ! लबाडी हें कांहीं सोपें काम नव्हे ! इ. स. १६०६ मध्यें डि नोबिली हा मदुरेमध्यें आला तेव्हां तेथील पहिले पाद्री फरनँडिझ आणि हे नवीन आलेले डि नोबिली या दोघांचा हेतु आणि कावा जरी एकच होता, तरी जणुकाय त्यांची आणि आपली ओळखसुद्धां नाहीं, अशा तऱ्हेचे वर्तन ठेवण्याला डि नोबिलीनें सुरवात केली. नंतर डि नोबिलीनें संन्याशासारखी भगव्या रंगाची कफनी करून गळ्यांत घातली. त्यानें ब्राह्मणाच्या प्रमाणें गळ्यामध्यें जानवेंही घातलें. परंतु आपला खिस्तीपणा नष्ट होऊं नये म्हणून त्या जानव्याच्या टोंकाशीं त्यानें एक क्रॉसही आडकविला होता. परंतु तो कोणाच्या दृष्टीस पडूं नये म्हणून तो फार काळजी घेत असे. तो त्रिकाळ स्नान करीत असे, व कंबरभर पाण्यांत उभा राहून आपण जप करीत आहो असें तो लोकांना दाखवित असे. तो सर्व उपवास करीत असे आणि नेहमींच्या जेवणांत त्यानें मद्यमांस वगैरे वर्ज्य केलें होतें. तो पायांत खडावा घालीत होता, व त्यानें आपली दाढीही वाढविली होती. त्यानें एकांतांत राहून संस्कृत व तामिळ या भाषांचें चांगलें अध्ययन केलें, व हिंदूंचीं वेदवेदांतादिक सर्व शास्त्रें त्यानें चांगली समजून घेतली. अशा रीतीनें त्याचा चांगला अभ्यास झाल्यानंतर तो हळुहळु वरच्या दर्जाच्या ब्राम्हण लोकांपुढें येऊं लागला. मदुरेच्या ब्राम्हण लोकांत प्रथमतः त्याच्या जातीसंबंधानें प्रश्न निघाला, तेव्हां नोबिली यानें सांगितलें कीं, 'मी फिरंगी नाहीं. मी रोममधून आलेला आहे. रोम हा देश फार दूर आहे. त्या रोमन देशांतील मी ब्राह्मण होय.' मदुरेच्या ब्राम्हणांना जगाची फार माहिती ! त्यांना रोम शहरांत आपल्या सारखेच ब्राम्हण असतात, ही गोष्ट खरी वाटली व ते नोबिलीच्या पंक्तीला जेवण्याला तयार झाले. पुढें हळु-हळु रॉबर्ट डि नोबिली हे एक हिंदुधर्मांतील प्रतिष्ठित स्वामी बनले व त्यांनीं आपल्याला तत्त्वबोधक स्वामी असें नांव ठेवून घेतलें. नंतर हे तत्त्वबोधक

स्वामी हळुहळु मदुरेच्या दुधखुळ्या ब्राम्हणांना आपल्या तत्त्वाचा बोध करू लागले. रोममध्यें ब्राम्हणांची वस्ती आहे व ते ब्राम्हण तुमच्यापेक्षां फार जुने आणि श्रेष्ठ आहेत, असें या तत्त्वबोधकाचार्यांनीं लोकांना अगींच सांगून ठेविलेलें होतें. त्या रोममधील ब्राम्हणांची मतें म्हणून हे स्वामी आपल्या खिरस्ती धर्माची एकेक मतें हिंदुधर्माच्या पांघरुणाखालीं पुढें सोडूं लागले. हिंदुस्थानांतील लोक जातीचेच गचाळ आहेत. त्यांना वाटेल त्यानें फसवावें. इंग्लिशांचा इतका परिचय झाला असूनही हल्लींचे लोक असे आहेत, तर मग दोन तीन शतकांपूर्वीचे लोक किती भोळसर, वेडगळ, अजागळ आणि दुधखुळे असतील हें कोणालाही समजण्यासारखें आहे ! ह्या तत्त्वबोधकाचार्यांच्या साऱ्या थापा त्यांना खऱ्या वाटूं लागल्या. ह्या पश्चिमेकडून आलेल्या स्वामींची कीर्ति जिकडे तिकडे पसरली आणि त्यांच्या मतांचा सर्वत्र फैलाव होऊं लागला. जसे त्या वेळचे हिंदुस्थानांतील लोक भोळे तसे राजेही भोळेच ! अक्कल आणि धूर्तपणा यांच्यासंबंधानें दोन्ही ठिकाणीं आवळ्याएवढें पूज्य ! आणि असले राजे परकीयांना त्यावेळीं हिंदुस्थानांत सांपडले म्हणूनच आज हिंदुस्थानाला खिरस्ती धर्म आणि राज्य याचा सुखानुभव घ्यावयाला सांपडत आहे ! मदुरेच्या अजागळ राजेसाहेबांना असें वाटूं लागलें की आपल्या शहरामध्यें जे तत्त्वबोधकाचार्य आलेले आहेत, त्यांचें पाय जर आपल्या मस्तकावर पडले नाहींत, तर आपल्याला स्वर्गलोकांमध्यें कोण विचारतो ! तेव्हां एकदां दर्शन देण्याकरीतां येण्याची मेहेरबानी करावी, अशी मदुरेच्या राजाधिराजांनी त्यांना विनंति केली. परंतु नोबिली हा पक्का लबाड होता. असली संधी आलेली तो कशी फुकट दवडील ! त्यानें मी येत नाहीं, म्हणून जबाब पाठविला ! तेव्हां राजाच्या आमंत्रणालाही तुच्छ मानणाऱ्या साधूचा जास्तच नांवलौकिक झाला ! हिंदुस्थानांतील सर्व ठिकाणचे आणि जातीचे निरनिराळे धर्मगुरू आणि राजेरजवाडे हे त्या तत्त्वबोधकाचार्यांच्या शिष्यशाखेमध्यें मोडूं लागले व मोठमोठे धर्माचार्य आपल्या हत्तीवर बसून आपल्या शेंकडों अनुयायांसह स्वामींच्या दर्शनाला येऊं लागले. त्यामुळें तर या बोक्यासंन्याशाची फारच प्रख्याति झाली. लोकांवर इतकें वजन बसल्यानंतर डी नोबिली यानें खिस्तीधर्माचें घोडें जास्त पुढें ढकलण्याला सुरवात केली. ज्याला आपल्या शिष्यशाखेमध्यें

यांवयाचें असेल त्यानें बाप्तिस्मा घेतला पाहिजे, हें एक नवीन कलम हळूच बाहेर पडलें. कॅथॉलिक लोकांच्या धर्मसंस्कारामध्यें ज्या कांहीं पार्थना आहेत, त्यांचीं संस्कृत भाषेमध्यें भाषांतरें करून ते मंत्र तो आपल्या शिष्यांकडून म्हणवून घेऊं लागला. तसेंच क्रॉसची खूण करण्याची पद्धत तो त्यांच्यामध्यें शिरकवूं लागला. अशी साधारण प्रकारची लोकांच्या मनाची तयारी केल्यानंतर डी नोबिली हा आपलें जें अट्टल वस्तादगिरीचें काम, जें क्राइव्हपण, तें करण्याला प्रवृत्त झाला! हल्लींचे मिशनरी लोक हिंदुधर्माची निंदा करून खिस्ती धर्माचें वर्चस्व स्थापन करण्याचा प्रयत्न करीत असतात. परंतु रॉबर्ट डी नोबिली यांची लढाई करण्याची रीत अगदीं निराळी होती. ते हिंदुधर्माला आणि त्यांतील तत्त्वांना अतिशय मान देत असत! हिंदूंचे चार वेद हेहि त्यांना मान्य होते! परंतु त्यांचें एवढेंच म्हणणें होतें कीं, हे चार वेद गौण असून यांच्यावरचा आणि यांच्याहून श्रेष्ठ असा पांचवा एक वेद आहे व त्या वेदाचें मला ज्ञान असून प्रत्यक्ष ब्रम्हदेवानें आविर्भूत होऊन तो वेद माझे हातीं दिला आहे! असें सांगत सांगत हळूच एके दिवशीं त्या तत्त्वबोधकाचार्यांनीं ब्रम्हदेवानें दिलेला एसुर्वेद या नांवाचा एक पांचवा वेद बाहेर काढला! या पांचव्या वेदामध्यें खिस्तीधर्माच्या मुख्य तत्त्वांचा अडून अडून उल्लेख केलेला होता व त्यांच्या आधारावरून खिस्ती धर्माचीं स्पष्ट तत्त्वें तोंडीं सांगावयाचीं असा डी नोबिली यांचा बेत होता. भाषा, विचारसरणी, लिहिण्याची पद्धत, वगैरे बाबतींत पाहिलें तर एसुर्वेद हा बाकीच्या वेदांपासून यत्किंचित्‌हि ओळखतां येण्यासारखा नव्हता. तरी मदुरेच्या ब्राह्मणांनीं हा वेद आपजन्मीं कधीं ऐकला नव्हता, म्हणून त्यांना शंका आली! परंतु अजागळांच्या शंकेचें निरसनहि लवकर होतें! डी नोबिली यानें सर्वांसमक्ष शपथ घेऊन असें सांगितलें कीं, खुद्द ब्रह्मदेवानें हा पंचमवेद माझ्या हातीं दिला, तेव्हां ब्राम्हणांचें समाधान झालें! जो प्रत्यक्ष खोटा वेद करण्याला प्रवृत्त झाला, तो खोटी शपथ वाहण्याला मागें सरणार नाहीं आणि जो देवाला फसविण्याला उद्युक्त झाला, तो भोळ्या माणसांना फसविण्यास कचरणार नाहीं, ही गोष्ट त्या ब्राह्मणांपैकीं एकाच्याहीं ध्यानांत आली नाहीं! एकदा एसुर्वेद हा ब्रह्मदेवानें दिला असें ठरल्यानंतर मग काय उशीर! त्यांतील तत्त्वें हळू

हळू सर्वत्र पसरली. सर्व धर्मांपेक्षां ख्रिस्ती धर्म श्रेष्ठ आहे आणि हिंदुधर्मां-तील छपन्न हजार दगडी देवतांपेक्षां ख्रिस्ती धर्मांतील फादर, सन आणि होली घोस्ट, ही त्रिमूर्तिच जास्त श्रेष्ठ आहे, असें ते तत्त्वबोधकाचार्य प्रतिपादन करूं लागले. येशूख्रिस्तावर विश्वास, चर्चमधील सॅक्रेमेंट घेणें, क्रॉसची खूण करणें, आणि मूर्तींची पूजा बंद करणें, हीं सगळीं तत्त्वें त्या पांचव्या वेदांतून हळूहळू बाहेर पडूं लागलीं. या तत्त्वबोधकाचार्यांनीं हिंदुधर्म कायम ठेवून त्या धर्माच्या डोक्यावर ख्रिस्ती धर्माची टोपी घातली. बाटलेल्या लोकांनां हिंदुधर्माप्रमाणें वागण्याला कांहीं हरकत नव्हती; परंतु त्यांनीं ख्रिस्ती धर्माची कांहीं तरी वर्चस्वाची खूण राखिली पाहिजे एवढीच काय ती अट होती. बाटलेल्या हिंदु लोकांनीं आपल्या देवांना रथांत घालून मिरवणूक काढिली तरी हरकत नाहीं, परंतु त्या रथाच्या शिरोभागीं एखाद्या कोना-ड्यांत मेरीची मूर्ति असली म्हणजे झालें, असा मिसळलेला धर्म सुरू झाला. डी नोबिलीच्या ह्या युक्तीनें त्याला पुष्कळ यश आलें, व जेथें बारा वर्षांमध्यें एकही मनुष्य बाटला नव्हता, तेथें हा पंचमवेद प्रसिद्ध झाल्यापासून थोड्याशा महिन्यांमध्यें दहाबारा हजार ब्राह्मण लोक बाटून ख्रिस्ती झाले. एसुर्वेदाच्या प्रती जिकडे तिकडे फैलावल्या व जो तो ब्राम्हण आपल्या मानेला हिसके देत ब्रह्मदेवानें डी नोबिलीच्या हातीं दिलेल्या त्या पंचमवेदाच्या दररोज गुंडिका करूं लागले. ह्या धर्मांतील क्लाईव्ह साहेबांनीं मदुरेच्या उमीचंदांना अशा रीतीनें सोळा आणे फसाविल्यानंतर त्यांना शाबासकी मिळण्याला काय तोटा ! गोव्याचे आर्चबिशप आणि तेथील जेसूटपंथाचे मुख्य धर्माधिकारी यांच्याकडून डी नोबिलीवर स्तुतिपाठाचे वर्षाव होऊं लागले व ज्याप्रमाणें क्लाईव्ह साहेबांची हिंदुस्थानांतील लबाडीकरितां विलायतेसही तारीफ झाली, त्याप्रमाणें डी नोबिली यानें केलेल्या लबाड्यांबद्दल त्याचीही रोम शहरांतील पवित्र पोपच्या दरबारी फार वाहवा झाली ! आणि इतका लबाड मनुष्य आपल्यामध्यें निघाल्याबद्दल सर्वांना अतिशय कृतार्थता वाटूं लागली. इकडे हिंदुस्थानांतील लोकांना बाटविण्याचें कामही झपाट्यानें चालू होतें व थोड्या वेळांत दक्षिण हिंदुस्थानांतील सर्व ब्राम्हण बाटून जाणार ही गोष्ट अगदीं ठरल्यासारखी झाली होती. बाटून जाणार याबद्दल प्रश्न नव्हता. किती वेळांत बाटून जाणार, एवढाच काय तो प्रश्न उरला होता. मध्यंतरीं

हिंदुधर्माचा संरक्षक परमेश्वर धांवून आला नसता तर त्याचे खरे चार वेद लयाला जाऊन डी नोबिलीचा पांचवा वेदच सर्व हिंदुस्थानभर पसरला असता!

परंतु परमेश्वराला हिंदुधर्माची करुणा आली. आणि त्यानें पाद्री फरनँडिझ याच्या मनामध्यें हेवा आणि मत्सर उत्पन्न केले. फरनँडिझ हा बारा वर्षें मदुरेमध्यें रखडत बसला होताच. आपल्या चर्चमधील रिकाम्या बाकांपुढें तो रोज आपला घसा कोरडा करून घेत होता, तरी एकही मनुष्य बाटला नाहीं आणि डी नोबिली यानें थोड्याशा महिन्यांमध्यें हजारों ब्राम्हणलोक बाटविले, हें वैषम्य सहन करण्याला फार अवघड होतें. फरनँडिझनें गोंव्याच्या आर्चबिशपकडे तक्रारी चालविल्या. आर्चबिशपला डी नोबिलीच्या लबाड्या ठाऊक होत्या इतकेंच नव्हे, तर त्या करण्याबद्दल डी नोबिलीला आर्चबिपकडून हुकुमही मिळालेला होता. आपल्या धर्माची इतकी मोठी वृद्धि ज्या लबाड्यांच्या योगानें होत आहे, त्या लबाड्यांकडे केवळ धर्मासाठीं कानाडोळा करणें अवश्य आहे, असेंही आर्चबिशपसाहेबांचें मत झालेलें होतें. परंतु ख्रिस्ती धर्माच्या निरनिराळ्या शाखांकडून तक्रारी आल्यामुळें आर्चबिशपांना यापुढें स्वस्थ बसतां येईना. तो प्रकार बंद करण्याविषयीं त्यांना डि नोबिलीना हुकूम सोडणें भाग पडले. परंतु डी नोबिलीनें त्याविरुद्ध खुद्द रोम शहरांत पोपकडे खटपट चालविली. मध्यंतरी डी नोबिलीच्या जातीच्या ख्रिस्ती लोकांनीं त्याच्या अनुयायीं ब्राम्हण लोकांना येऊन सांगितलें कीं, 'तुम्ही फसत आहां! हा तत्त्वाबोधकाचार्य ब्राम्हण नसून म्लेंच्छ आहे. हा गोमांस खाणारा आणि समुद्रयान करणारा, याच्याशीं तुम्ही पंक्तिव्यवहार केल्यानें ब्राम्हणत्वापासून च्युत झालां आहां, व बाप्तिस्मा आणि होली कम्युनियन हे विधि तुम्ही केलेले असल्यामुळें तुम्ही आणि फिरंगी यांच्यामध्यें कांहीं अंतर राहिलेलें नाहीं.' खुद्द ख्रिस्ती लोकांनीं असें सांगितलें तरी त्या मदुरेच्या ब्राम्हणांची खात्री होईना. त्यांना ते तत्त्वबोधकाचार्य हे ब्राम्हणच वाटत होते. डी नोबिली यानेंही फिरून ब्राम्हणांच्यापुढें शपथ वाहून सांगितलें कीं, मी फिंरगी नाहीं. मग त्याच्या ब्राम्हणत्वाविषयीं मदुरेच्या ब्राम्हणांना आणखी काय पुरावा पाहिजे! इकडे डी नोबिलीचें प्रकरण पोपकडे गेलेलें होतें. क्लाईव्ह साहेबांच्या हिंदुस्थानांतील लबाड्या व हेस्टिंग्ज साहेबांचे हिंदुस्थानांतील जुलूम यांच्याबद्दल विलायतेस जसा गवगवा आणि

न्याय झाला, तसाच बहुतेक प्रकार रोम शहरामध्येंही झाला. ज्यांनीं हिंदुस्थानांत राजकीय साम्राज्याचे कशा तरी रीतीनें कां होईना पण पाये घातले, त्या क्लाईव्ह आणि हेस्तिंग्ज साहेबांना सर्वथैव दोषी ठरविणें जसे इंग्लिश लोकांचे जिवावर आलेलें होतें, तशीच बहुतेक मनोवस्था या वेळीं रोममध्येंही उत्पन्न झालेली होती. त्यामुळें खुद्द पोपनेंही धरसोडीचेच हुकूम सोडले. पोपच्या निकालांत असें लिहून आलें कीं, बाटलेल्या ब्राह्मण लोकांनीं त्यांच्या धर्मांत सांगितल्याप्रमाणें रोज स्नान करावें, परंतु तो एक धर्माचा विधि आहे असें मानून स्नान करूं नये. त्यांनीं पाहिजे तर भस्म लावावें, परंतु तें गोवऱ्यांचें नसतां चंदनाच्या लांकडांचें असावें. त्यांनीं पाहिजे तर जानवें घालावें, पण तें जानवे कॅथॉलिक धर्माच्या पाद्र्यानें आपल्या मंत्रानें आणि पवित्र पाण्यानें मंत्रवून दिलेलें पाहिजे. तसेंच त्यांनीं आपल्या शेंडीला गांठ मारावी, परंतु तें हिंदुधर्मातील एक अवश्य कृत्य म्हणून त्यांनीं कधींही करितां कामा नये. अशा रीतीचा धरसोडीचा हुकूम पाहून खिस्ती धर्माच्या आदि पीठमध्यें किती सत्यता राहिलेली होती याची कोणालाही कल्पना करितां येईल. डी नोबिली याला एवढा अर्धवट हुकूम पुरे होता. त्यानें त्याच्या जोरावर हिंदुलोकांना बाटविण्याचें काम तसेंच पुढें चालविलें. त्यानें एकंदर सुमारें एक लाख लोकांना बाटविलें असावें असा अजमास आहे. अशा प्रकारची या तत्त्वबोधकाचार्यांची हकीकत आहे.

नदीचें मूळ आणि ऋषीचें कुळ शोधीत बसूं नये अशी आपल्यामध्यें एक म्हण आहे, त्या म्हणीमध्यें हिंदुस्थानांतील इंग्रजी राज्य आणि खिस्ती धर्म यांचें मूळ व तत्त्वबोधकाचार्यांचें कुळही शोधीत बसूं नये. असाही एक उल्लेख करणें जरूर आहे ! क्लाईव्ह साहेब आणि डी नोबिली हे एकाच वेळीं हिंदुस्थानांत लबाड्या करीत होते, आणि हल्लींचे पवित्र राज्य आणि धर्म यांच्या पायाचे दगड बसवीत होते ! त्या वेळची हिंदुस्थानांतील लोकस्थिति फारच वाईट प्रकारची झालेली होती. हिंदुस्थानांतील राजे आणि त्यांची राजकीय प्रजा ही मंडळी किती कमकुवत आणि बेवकूब झालेली होती, हें राजकीय इतिहासावरून दिसून येत आहे व धर्माच्या कामामध्यें इकडील ब्राह्मण किती अजागळ आणि दुबळे झाले होते हें वर दिलेल्या

तत्त्वबोधकाचार्यांच्या हकीकतीवरून कळण्यासारखें आहे. अशी लोकस्थिति झालेली असल्यामुळें क्लाइव्ह आणि डी नोबिली यांच्यासारख्या बनावट दस्तऐवज करणाऱ्या लोकांचें फावलें होतें. क्लाईव्ह साहेबांनीं फक्त एकच बनावट रोखा केला, परंतु डी नोबिलीं यांनीं संबंध वेद बनावट तयार केला ! अशा महापुरुषाला धर्मांतील क्लाईव्ह असें म्हणणे म्हणजे खरोखर त्याच्या लबाडीची योग्यता कमी करण्यासारखें होत आहे. परंतु डी नोबिलीनें धर्मामध्यें जितके महत्त्वाचे बनावट कागद केले; तितके राजकीय प्रकरणामध्यें कोणी केले असल्याचें अद्यापि उघडकीस आलेलें नाहीं ! कारण, अजून पुष्कळ दप्तरें छापलीं जावयाचीं आहेत व शिवाय कोणी शांही राज्यें घेण्यासाठीं तहाच्या यादी किंवा कलमें फिरविलीं असलीं किंवा बनावट केलीं असलीं, तरी इंग्रजी इतिहासांत त्याबद्दल कोणी स्पष्ट उल्लेख केल्यावांचून एखाद्या मराठी वर्तमानपत्रानें त्याबद्दल निर्देश कसा करावा ?

असो. मागें झालें तें झालें. परंतु मागच्याचा पुढच्यासाठीं कांहीं तरी उपयोग व्हावा हें इष्ट आहे. आम्हांला कोणत्याही व्यक्तीच्या किंवा त्या व्यक्तीनें काढलेल्या पंथाच्या विरुद्ध लिहिण्याची इच्छा नाहीं. तरी पण सर्वांनी मागच्या उदाहरणावरून मुरवतीसाठीं तरी निदान थोडेंबहुत सावध असावें हें बरें. ॲनी बीझंटबाई आणि अशाच तऱ्हेची दुसरी मंडळी यांच्यापासून आमचें अगदींच हित होत नाहीं असें कोणाचेंही म्हणणें नाहीं. परंतु त्या हिताबद्दल जबर किंमत द्यावी लागणार आहे कीं काय, याबद्दल थोडासा विचार प्रत्येकानें केला पाहिजे. रुद्राक्षाच्या माळा गंधाचे टिळे, जटांचे भार, रेशमी कफन्या, चंदनाच्या खडावा, आणि वेदाचीं वाक्यें हीं जेव्हां युरोपियन जातीच्या मनुष्याशीं संयुक्त झालेली दृष्टीस पडतात, तेव्हां तत्त्वबोधकाचार्य डी नोबिली आणि त्यांचे ते अनुयायी ब्राह्मण ह्यांची आठवण होते ! ॲनीबीझंटबाई या अमुक प्रकारच्या असतील किंवा तमुक प्रकारच्या असतील ह्याबद्दल आम्हांला कांहीं मत देतां येत नाहीं. कारण, त्या सोंवळें कसें नेसतात, पोथी अशी वाचतात, आणि जेवतांना काय काय खातात, हें जसें कित्येकांनीं पाहिलें आहे, तसें पहाण्याची संधि दुर्दैवानें आम्हांला मिळालेली नाहीं. तसेंच त्यांचें ग्रंथही आम्ही वाचलेले नाहींत. कारण त्या जर आमच्या वेदवेदांतादिकांतीलच मतें सांगत असतात, आणि

ती जर आम्हांला आमच्या धर्मपुस्तकांतून वाचतां येतात, तर मग त्यांच्याच ग्रंथांत निराळें काय असणार ? इत्यादि कारणामुळें या थिऑसफीच्या नवीन मतांबद्दल किंवा त्यांच्या उत्पादकांबद्दल आम्ही कांहींही मत देऊं इच्छित नाहीं. परंतु डी नोबिलीचें चरित्र वाचल्यानंतर त्यापासून जर कांहीं प्रकृतोपयोगी बोध घ्यावयाचा असेल, तर तो काय घ्यावा, हा एक विचार करण्यासारखा प्रश्न आहे. हिंदुधर्मवाल्यांनीं सावधपणानें रहावें; गाफील असूं नये, एवढातरी निदान बोध घेणें अवश्य आहे, असें आम्हांला वाटतें. मदुरेला जो प्रकार झाला, त्याची पुनरावृत्ति काशीमध्यें होऊं नये, अशी कोणाची इच्छा असणार नाहीं ? थिऑसफीसंबंधानें अगदीं एक साधा युक्तिवाद सामान्य व्यवहाराला लोकांना बरस होण्यासारखा आहे. तो असा कीं, थिऑसफीमध्यें नवीन मतें आहेत किंवा जुनींच मतें आहेत ? हिंदूधर्माहून कांहीं नवीन मतें त्यांत असतील, तर तो पंथ हिंदुधर्मानुयायी लोकांना अर्थात्‌च अग्राह्य आहे. बरें जर त्यांत सर्व जुनींच मतें असतील तर तीं मतें आपल्या ज्या ज्या उपनिषदादि जुन्या ग्रंथांतून लिहिलेली आहेत, ते ग्रंथ वाचले म्हणजे या नवीन पंथाची अवश्कयता उरत नाहीं. एवंच कोणत्याही दृष्टीनें पाहिलें तरी हा नवीन पंथ अनवश्यक ठरतो. तरीही आपल्या कांहीं वेदांतमतांचे उपोद्बलक या दृष्टीनें त्या पंथांतील चांगले ग्रंथ कोणी वाचले किंवा त्याचें परिशीलन केलें, म्हणून त्यांत मोठेंसें बिघडतें आहे, असें नाहीं. सगळ्यांतील सारांश एवढा घ्यावयाचा कीं, असल्या प्रसंगीं सर्वांनीं जरा जास्त सावधपणानें वागावें म्हणजें झालें. याच्यापेक्षां जास्त या धर्मांतील क्लाईव्ह साहेबांबद्दल आम्ही कांहीं लिहूं इच्छीत नाहीं.

---

# पतितपरावर्तनांतील एक भाग : : १

ख्रिस्ती मिशनरी लोक अनेक ढोंगाच्या पांघरुणाखालीं आपल्या लोकांना बाटवीत आहेत. आणि त्या बाबतींत आपण अतिशय उदासीन आहों, बऱ्याच नेटाचे प्रयत्न व्हावयाला पाहिजे आहेत, परंतु दुर्दैवानें तसे प्रयत्न होण्याची चिन्हें दिसत नाहींत. आणि आपण असेच उदासीन रहात गेलों, तर आपल्या धर्मांतील लोकांची संख्या उत्तरोत्तर कमी होत जाऊन, कित्येक जुने धर्म नामशेष झाले आहेत, तशी आपल्या धर्मावर पाळी येण्याचा संभव आहे. आपल्या हिंदुधर्मांतील अचाट सामर्थ्याबद्दल आणि अद्भुत तेजस्वितेबद्दल आपण पुष्कळ गोष्टी ऐकिलेल्या आहेत. परंतु तें सामर्थ्य आणि ती तेजस्विता हल्लीं कोठेंही दृष्टोत्पत्तीस येत नाहीं; आणि शिवाय ही एक गोष्ट आपण सर्वांनीं लक्षांत ठेविली पाहिजे कीं, एखाद्या धर्मांतील सामर्थ्य आणि तेज-ह्या गोष्टी वास्तविक त्या धर्मावर अवलंबून नसून त्या धर्माचे जे अनुयायी त्यांच्यावर अवलंबून असतात. त्याप्रमाणें पाहिलें असतां आपला धर्म किंवा त्याचे अनुयायीं यापैकीं कोठेंच सामर्थ्य आणि तेजस्विता दिसून येत नाहीं. अशा स्थितींत आपला धर्म पांच हजार वर्षे टिकला आणि दहा हजार वर्षे टिकला, अशी घमेंड मारीत बसण्यांत काहीं अर्थ नाहीं. इतकीं वर्षे जर आपला धर्म टिकला असला, तर त्याचीं दोन मुख्य कारणें आहेत, तीं हीं कीं, तो धर्म टिकविणारे लोक पूर्वी पुष्कळ होते आणि बुडविणारे लोक थोडे होते. परंतु हल्लींची स्थिति यांच्या अगदीं विपरित आहे. हल्लीं आपला धर्म बुडविणारे लोक पुष्कळ झाले आहेत, आणि टिकविणारे लोक थोडे आहेत. अशा स्थितींत हिंदुधर्म टिकणें दुरापास्त आहे, म्हणून आपण त्या धर्माच्या अनुयायांनीं जारीनें प्रयत्न करणें अत्यंत अवश्यक आहे.

ख्रिस्ती मिशनऱ्यांच्या उपद्रवापासून आपल्या धर्माचें संरक्षण करण्यासाठीं

जे प्रयत्न करावयाचे ते मुख्यत्वेंकरून दोन प्रकारचे आहेत. एक आपल्या धर्मांतील लोक बाटूं द्यावयाचे नाहींत आणि दुसरा प्रयत्न असा की जे बाटलेले असतील त्यांना आपल्या धर्मामध्यें परत घेण्याची आपल्या शास्त्र मर्यादेप्रमाणें जेवढी शक्य तेवढी तजवीज करणें. धर्मभ्रष्ट झालेला मनुष्य आपल्या धर्मांत परत घेण्याला फार अडचणी आहेत हें लक्षांत आणून आपल्या समाजानें पाहिल्याच प्रकारच्या प्रयत्नावर विशेष भिस्त ठेविली पाहिजे. कारण चिखल धूत बसण्यापेक्षां तो आपल्या अंगावर उडूं न देणें हेच जास्त श्रेयस्कर होय हे कोणीही कबूल केल्यानंतर जे बाटलेले आहेत त्यांच्याबद्दलही प्रस्तुतच्या स्थितीमध्यें कांहीं तरी तजवीज करणें आवश्यक आहे. बाटलेल्या लोकांमध्यें दोन भेद आहेत. बाटल्यानंतर जे खिस्ती धर्मां-तच राहूं इच्छितात ते आणि जे आपल्या धर्मांतच परत येऊं इच्छितात ते. यांपैकीं फक्त दुसऱ्या वर्गातील लोकांसंबंधानें आपल्याला विचार करणें शक्य आहे. स्वधर्मांत परत येऊं इच्छिणारे लोक बाटलेले असतात त्यांच्यांत फिरून दोन प्रकार आहेत. एक अज्ञानावस्थेंत बाटलेले आणि दुसरे सज्ञानावस्थेंत बाटलेले आहेत त्यांच्याबद्दल विचाराची गोष्ट आपल्या समाजानें पाहिजे तर क्षणभर बाजूला ठेवावी. परंतु अज्ञानावस्थेंत बाटून पुढें खरी स्थिती समजल्या नंतर जे आपल्या धर्मामध्यें परत येऊं इच्छितात त्यांची गोष्ट अगदीं निराळी आहे. अज्ञानावस्थेंत धर्मभ्रष्ट झालेल्या अर्भकांबद्दल आणि वाघाच्या वाटेनें चाललेल्या वासरांबद्दल निष्ठुर होण्याइतकी बरूरता कोणत्याही अंतःकरणामध्यें नसेल. परंतु या अर्भकांना शुद्ध करून घेण्यासंबंधानेंही कित्येक आक्षेप येणें साहजिक आहे. याकरितां अज्ञान मुलगा बाटून खिस्ती होतो, म्हणजे होतें तरी काय, त्याला बाटविण्यासाठीं काय केलें जातें आणि त्यामुळें तो बाटून कसा पतित होतो, हें आपण पाहूं. परंतु हें आपल्याला समजण्याला लहान मुलांना बाटवितांना मिशनरी लोक काय विधि करितात आणि काय मंत्र म्हणतात हें पाहणें जरूर आहे. त्यासंबंधीचें समग्र अनुष्ठान हा एक ह्या वादांतील अत्यंत महत्त्वाचा दस्तऐवज असल्यामुळें तो या खटल्यांत दाखल होऊन राहण्यासाठीं त्याचा समग्र उतारा सोबत जोडला आहे. तो येणेंप्रमाणें:—

**"बालकांचा बाप्तिस्मा"**

याचें अनुष्ठान, जें देवालयांत करावयाचें तें.

आदित्यवार आणि इतर सण या दिवशीं विशेषेंकरून लोक जमतात, म्हणून त्या दिवशीं बालकांचा बाप्तिस्मा करणें हें अधिक योग्य आहे अशी सूचना लोकांत द्यावी; याचा उद्देश हाच कीं, त्यांचा बाप्तिस्मा होऊन त्यांस ख्रिस्ताच्या एक्क्लेसियेच्या संख्येंत घेतलें अशी जमलेल्या मंडळीनें साक्ष द्यावी; आणखी बालकांचा बाप्तिस्मा पाहून प्रत्येक मनुष्याला आपल्या बाप्तिस्म्यांत देवासमोर आपण केलेला पतकर याचें स्मरण व्हावें. याच कारणास्तव बाप्तिस्म्याचें अनुष्ठान देशभाषेंत करणें योग्य आहे. तथापि अगत्य असल्यास इतर कोणत्याही दिवशीं बालकांचा बाप्तिस्मा करण्यास प्रतिबंध नाहीं.

ज्या प्रत्येक मुलाचा बाप्तिस्मा करावयाचा आहे, त्याला दोन धर्मबाप व एक धर्मआई पाहिजे; आणि प्रत्येक मुलीला एक धर्मबाप व दोन धर्मआया पाहिजेत. हें ध्यानांत ठेवावें.

जेव्हां बालकांचा बाप्तिस्मा करावयाचा आहे, तेव्हां तो करण्याच्या पूर्वसंध्याकाळीं अथवा त्याच दिवशीं सकाळच्या प्रार्थनेपूर्वी आईबापांनीं पालकाला याविषयीं सूचना द्यावी आणि तो करण्याच्या दिवशीं धर्मबापांनीं व धर्मआयांनीं आणि बालकांस घेऊन आलेल्या लोकांनीं, सकाळच्या किंवा पालकास योग्य दिसेल त्याप्रमाणें संध्याकाळच्या प्रार्थनेंतील दुसरा पाठ झाल्यावर लागलेच जलकुंडाजवळ येऊन सिद्ध असावें, आणि प्रेस्बुतरानें जलकुंडाजवळ यावें ( तें तर त्याच वेळेस निर्मळ पाण्यानें भरावें ) आणि तेथें उभे असतांना असें म्हणावें,

या बालकाचा बाप्तिस्मा यापूर्वी झाला आहे किंवा नाहीं ?

नाहीं असें त्यांनीं उत्तर दिल्यास, प्रेस्बुतरानें, पुढें लिहिल्याप्रमाणें बोलावें.

अति प्रियांनो, सर्व मनुष्यें पापांत गर्भगत होतात व जन्म पावतात; आणि आमचा तारणारा ख्रिस्त म्हणतो कीं, पुनर्जात झाल्यावांचून म्हणजे पाणी व पवित्र आत्मा यांच्या योगानें नवा जन्म पावल्यावांचून कोणाच्यानें देवाच्या राज्यांत प्रवेश करवत नाहीं; यास्तव मी तुम्हांस विनवितों कीं, तुम्ही आमच्या प्रभु येशूख्रिस्ताच्या द्वारें जो पिता त्याचा धांवा करा कीं, त्यानें आपल्या औदार्ययुक्त दयेनें या बालकाला, आपल्या जन्मस्वभावानें

जें प्राप्त करून घेववत नाहीं तें द्यावें; म्हणजे पाणी व पवित्र आत्मा ह्यांचा बाप्तिस्मा पावून ख्रिस्ताच्या पवित्र एक्क्लेसियेंत तें घेण्यांत यावें आणि जिवंत अवयव असें व्हावें.

नंतर प्रेस्बुतरानें म्हणावें, आपण प्रार्थना करूं.

हे सर्वसमर्थ व सनातन देवा, नोहा व त्याचें कुटुंब यांचा पाण्यानें नाश होऊं नये म्हणून त्यांस तूं आपल्या मोठ्या दयेनें तारवांत बांचविलें आणि आपलें इस्रायल लोक सूफ समुद्रांतून सांभाळून नेण्यानें तूं स्थापित केलेला पवित्र बाप्तिस्मा उपमेनें दर्शविला; आणि आपला अति प्रिय पुत्र येशूख्रिस्त याच्या यर्देन नदींत झालेल्या बाप्तिस्म्याकडून पापाच्या आत्मिक क्षालनाकरितां पाणी पवित्र केलें; आम्ही तुझ्या अनंत दयेस्तव तुला विनवितों कीं, हें बालक तुझ्या क्रोधापासून मुक्त होऊन ख्रिस्ताच्या एक्क्लेसियारूप नौकेंत घेण्यांत यावें; आणि विश्वासांत स्थिर, आशेनें आनंदित व प्रीतींत मुळावलेलें असतां यानें या दुःखमय भवसागराच्या लाटांतून निभावून शेवटीं सनातन जविनाच्या बंदरास पोहोंचावें आणि तेथें सदा सर्वकाळ तुजसहित राज्य करावें ह्मणून यावर दयादृष्टि करून याचें क्षालन कर आणि यास पवित्र आत्म्याकडून पवित्र कर; येशू ख्रिस्त आमचा प्रभू याच्या द्वारें आमेन.

हे सर्वसमर्थ आणि अमर देवा, सर्व अनाथांच्या नाथा, शरणागताच्या आश्रया, विश्वास्यांच्या जीवना आणि मेलेल्यांच्या पुनरुत्थाना, या बालकाकरितां आम्हीं तुझा धांवा करितों कीं, यानें तुझ्या पवित्र बाप्तिस्म्यास येऊन आत्मिक पुनर्जन्माकडून आपल्या पापांची क्षमा पावावी. हे प्रभू, तूं आपल्या प्रिय पुत्राकडून वचन दिलें आहे कीं, मागा म्हणजे तुम्हास मिळेल, शोधा म्हणजे तुम्हांस सांपडेल; ठोका, म्हणजे तुम्हांस उघडेल. त्याप्रमाणें या बालकास अंगीकारून घे, आणि आह्मां मागणाऱ्यांस दे, कीं आह्मां शोधणाऱ्यांस सांपडूं दे, आह्मां ठोकणाऱ्यांस दार उघड, यासाठीं यानें तुझ्या दिव्य क्षालनाचा सनातन आशीर्वाद भोगावा, आणि ख्रिस्त आमचा प्रभू याकडून तूं देऊं केलेल्या सनातन राज्याप्रत पोहोंचावें. आमेन.

नंतर सर्व लोकांनीं उभें राहावें आणि प्रेस्बुतरानें असें बोलावें.

पवित्र मार्कलिखित शुभवर्तमान यांतील १० व्या अध्यायाच्या १३ व्या ओंवीपासून जीं वचनें आहेत, तीं ऐका.

मग ख्रिस्ताकडे बालकांस आणलें, ह्यासाठीं कीं, त्यानें त्यांस स्पर्श करावा; परंतु शिष्यांनीं आणणाऱ्यांस दबाविलें. तें पाहून येशूला, फार वाईट वाटलें, आणि तो त्यांस म्हणाला, बालकांस माझ्याजवळ येऊं द्या, त्यांस मना करूं नका, कारण कीं देवाचे राज्य अशांचेंच आहे. मी तुम्हांस खचित सांगतों कीं, जो कोणी देवाचें राज्य बालकासारखा होऊन स्वीकारणार नाहीं त्याचा त्यांत प्रवेश होणार नाहीं. तेव्हां त्यानें त्यांस कवटाळून धरून त्यांवर हात ठेवून त्यांस आशीर्वाद दिला.

हें शुभवर्तमान वाचल्यावर त्यांतील वचनांवरून आचार्यांनें हा लहानसा बोध करावा.

प्रियांनो, आमचा तारणारा ख्रिस्त याचीं ह्या शुभवर्तमानांतील वचनें तुम्ही ऐकिलीं आहेत कीं, त्यानें आपणाजवळ बालकें आणावीं म्हणून आज्ञा दिली. जे त्यास त्याजवळ येऊं देत नव्हते, त्यांस शब्द लावला; आणि बालकांच्या निर्दोषतेस अनुसरायांस तो सर्वांस बोध करितो. तुम्ही पाहतां कीं, त्यानें आपल्या आविर्भावानें व कृतीनें आपला त्यावरील जिव्हाळा दाखविला; कां कीं त्यानें त्यांस आपल्या कवेंत घेऊन उराशीं धरिलें, त्यांवर त्यानें आपले हात ठेविले, आणि त्यांस आशीर्वाद दिला. यास्तव तुम्ही निःसंशय मनापासून विश्वास धरा कीं; हे बालकही तो प्रसादानें अंगीकारून घेईल; आपल्या दयेच्या कवेंत याला घेऊन आलिंगील; याला सनातन जीवनाचें उत्तम दान देईल; आणि आपल्या सनातन राज्याचे भागी करील. यास्तव आमच्या स्वर्गांतील पित्यानें आपला पुत्र येशुख्रिस्त याजकडून जो या बालकांचा जिव्हाळा दाखविला, त्याविषयीं आम्ही निश्चित असतां, आणि आम्ही या बालकाला त्याच्या पवित्र बाप्तिस्म्यास आणिलें, हें आमचें प्रीतीचें कृत्य तो कृपेनें मान्य करितो. याविषयीं आम्ही कांहीं संशय न धरितां विश्वासानें व भक्तिभावानें त्याची उपकारस्तुति करून आम्ही म्हणूं,

हे सर्वसमर्थ व सनातन देवा, स्वर्गांतील पित्या, तूं आम्हांला प्रसन्नतेनें आपल्या अनुग्रहाच्या ज्ञानांत व तुजविषयींच्या विश्वासांत बोलाविलें आहे, म्हणून आम्हीं नम्रतेनें तुझी उपकारस्तुति करितों; आमच्याठायीं सर्वदा ह्या

ज्ञानाची वृद्धि कर, आणि हा विश्वास दृढ कर. या बालकानें पुनः जन्मावें आणि सनातन तारणाचें वारीस व्हावें, म्हणून तूं आपला पवित्र आत्मा याला दे; आमचा प्रभु येशूख्रिस्त, जो तुजसहित व पवित्रात्म्यासहित आतां व सर्वकाल जिवंत राहतो व राज्य करितो त्याच्या द्वारें. आमेन.

तेव्हां धर्मबापास प्रेस्बुतरानें येणेंप्रमाणें बोलावें.

अति प्रियांनों, या बालकाचा बाप्तिस्मा व्हावा म्हणून याला तुम्ही एथें आणिलें आहे, आमच्या प्रभु येशूख्रिस्तानें प्रसन्न होऊन यास अंगीकारावें, पापमुक्त करावें, पवित्र आत्म्याकडून पवित्र करावें, आणि स्वर्गाचें राज्य व सनातन जीवन यास द्यावें म्हणून तुम्ही प्रार्थना केली आहे. आणखी हेंही तुम्ही ऐकिलें आहे कीं, जें तुम्ही प्रार्थना करून मागितलें तें सर्व द्यावयास आमचा प्रभु येशूख्रिस्त यानें आपल्या शुभवर्तमानांत वचन दिलें आहे; तें वचन तो तर निश्चयें राखील आणि खरें करील, यास्तव अगत्य आहे कीं, ख्रिस्तानें असें वचन दिलें असतां या बालकानेंही, ( हें प्रौढ होऊन आपल्या अंगावर घेईपर्यंत ) तुम्ही आपल्या जामिनांकडून विश्वासूपणें असें वचन द्यावें कीं, सैतान आणि त्याचीं सर्व कर्में यांचा मी त्याग करीन देवाच्या पवित्र वचनावर स्थिर विश्वास ठेवीन आणि त्याच्या आज्ञा मानून त्याप्रमाणें वर्तेन.

तर मी विचारतों,

तूं सैतान आणि त्याचीं सर्व कर्मे, जगाचा व्यर्थ डामडौल व वैभव व त्याच्या सर्व लोभिष्ट इच्छा आणि देहाच्या भ्रष्ट वासना यांस अनुसरणार नाहींस, आणि यांच्या आधीन होणार नाहींस असा यांचा तूं या बालकाच्या नामानें त्याग करितोस काय ?

उत्तर. मी त्या सर्वांचा त्याग करितों.

आचार्य,

सर्वसमर्थ देव जो पिता, आकाश व पृथ्वी यांचा उत्पन्न करणारा, त्याविषयीं विश्वास धरितोस काय ?

आणि येशू ख्रिस्त त्याचा एकुलता पुत्र आमचा प्रभु याविषयीं ? आणि तो पवित्र आत्म्याच्या योगानें गर्भरूप झाला; कुमारी मारीया इजपासून जन्मला; त्यानें पंत्य पीलाताच्या वेळेस दुःख भोगिलें, त्याला कूर्शी दिलें,

तो मरण पावला, व त्याला पुरिलें; तो अधोलोकांत उतरला, आणि तिसऱ्या दिवशीं मेलेल्यामधून पुनः उठला; स्वर्गात चढला, आणि सर्व शक्तिमान् देव जो पिता त्याच्या उजवीकडे बसला आहे; तेथून जिवंतांचा व मेलेल्यांचा न्याय करायला तो पुनः काळाच्या समाप्तीस येणार आहे, याविषयीं तूं विश्वास धरितोस काय ?

आणि पवित्र आत्मा; पवित्र कॅथोलिक एक्क्लेसिया; पवित्रांची सहभागिता; पापांची क्षमा; देहाचें पुनरुत्थान आणि मरणानंतरचें सनातन जीवन, यांविषयीं तूं विश्वास धरितोस काय ?

उत्तर. मी या सर्वांविषयीं स्थिर विश्वास धरितों.

आचार्य.

हाच विश्वास धरून तूं बाप्तिस्मा घेण्यास इच्छितोस काय ?

उत्तर. इच्छितों.

आचार्य.

तर तूं देवाची पवित्र इच्छा मानून त्याच्या आज्ञा पाळशील आणि त्याप्रमाणें आयुष्यभर वर्तशील काय ?

उत्तर. होय.

नंतर प्रेस्बुतरानें म्हणावें.

हे दयाळु देवा, या बालकांतला जुना आदाम असा पुरण्यांत यावा कीं, यांत नवा मनुष्य उठण्यांत यावा असें तूं कर आमेन.

यांत देहाच्या सर्व भ्रष्ट वासना मराव्या, आणि पवित्र आत्म्याचें जें कांहीं आहे तें यांत सजीव होत्सातें वाढावें, असें तुं कर आमेन.

यानें सैतानाला, जगाला, व देहाला जिंकून जयोत्साह करावा, म्हणून त्याला बल व सामर्थ्य दे. आमेन.

ज्या कोणास आह्मी येथें आपल्या अधिकारानें व आचार्यत्वानें तुला समर्पित करितों, तो दिव्य सद्गुणांनीं भूषित व्हावा आणि त्यास सर्वकालिक प्रतिफळ प्राप्त व्हावें, असें तूं दयेनें कर. हे धन्य प्रभू देवा; तूं युगानुयुग जिवंत राहतोस आणि सर्वांवर प्रभुत्व करितोस. आमेन.

हे सर्वसमर्थ सदाजीवि देवा, तुझा परमप्रिय पुत्र येशू ख्रिस्त, यानें आमच्या पापांच्या क्षमेसाठीं आपल्या अमुल्य कुशींतून पाणी व रक्तही पाडिलें; आणि

आपल्या शिष्यांस अशी आज्ञा दिली कीं, तुम्ही जाऊन सर्व देशांतील लोकांस शिष्य करा आणि पित्याच्या, पुत्राच्या, आणि पवित्र आत्म्याच्या नामांत त्यांचा बाप्तिस्मा करा. तुला आम्ही विनवितो कीं, तूं आपल्या मंडळींच्या विनंत्यांकडे लक्ष्य दे. पापांचें आत्मिक क्षालन करण्यासाठीं हें पाणी पवित्र कर; आणि ज्या बालकाचा बाप्तिस्मा यांत आतां होणार आहे, त्याला तुझा पूर्ण अनुग्रह प्राप्त व्हावा आणि तुझ्या विश्वासी व निवडलेल्या लेंकरांच्या संख्येंत हें सर्वदा रहावें, असें तूं कर. येशू ख्रिस्त आमचा प्रभू याच्या द्वारें. आमेन..

नंतर प्रेस्बुतरानें बालक हातावर घेऊन धर्मबापास व धर्मआयास म्हणावें तुम्ही या बालकाचे नांव ठेवा.

तेव्हां तदनुसार त्यानें बालकाचें नाम उच्चारावें आणि ( त्याच्यानें सोसवेल असे जर त्यास निश्चित करितील तर ) त्यानें सांभाळून त्यास पाण्यांत सावधपणें बुचकळतांना असें म्हणावें,

ना० पित्याच्या आणि पुत्राच्या आणि पवित्र आत्माच्या नामांत मी तुझा बाप्तिस्मा करितों. आमेन.

परंतु बालक अशक्त आहे असें जर निश्चित करतील, तर पूर्वोक्त शब्द म्हणत असता त्यावर पाणी ओतिलें म्हणजे पुरें.

ना० पित्याच्या आणि पुत्राच्या आणि पवित्र आत्याच्या नामांत मी तुझा बाप्तिस्मा करितों. आमेन.

तेव्हां प्रेस्बुतरानें म्हणावें.

हें बालक आम्ही ख्रिस्ताच्या कळपरूप मंडळींत घेतों आणि ( येथें प्रेस्बुतरानें बालकाच्या कपाळावर क्रूसाची आकृति काढावी. यास क्रूसच्या चिन्हानें अंकित करितों; हें या गोष्टीची खूण आहे कीं, आतांपासून हें बालक क्रुशीं दिलेल्या ख्रिस्तांचा विश्वास पत्करावयास लाजणार नाहीं. पण त्याच्या ध्वजाखालीं पाप, जग व सैतान, यांशीं शौर्यानें युद्ध करील आणि ख्रिस्ताचा विश्वासू सैनिक व सेवक आयुष्यभर टिकून राहील. आमेन. तेव्हां प्रेस्बुतरानें बोलावें.

अति प्रिय भावांनो, आतां हें बालक पुनर्जीत झालें आहे व हें ख्रिस्तांच्या एक्लेसियेच्या शरिरांत कलमरूपें लाविलें आहे, यास्तव आपण या

उपकारांमुळें सर्वसमर्थ देवाची उपकारस्तुति करूं आणि या बालकानें आपलें उरलेलें आयुष्य या प्रारंभाप्रमाणें घालवावें अशी एकचित्तानें त्याची प्रार्थना करूं.

नंतर सर्वांनीं गुडघे टेकलेले असतां म्हणावें,

हे आमच्या स्वर्गांतील बापा, तुझें नाम पवित्र मानलें जावो. तुझें राज्य येवो. जसें स्वर्गांत तसें पृथ्वीवरहि तुझ्या इच्छेप्रमाणें होवो. आमची प्रतिदिवसाची भाकर आज आम्हांस दे आणि जशी आम्ही आपल्या अपराधांची क्षमा करितों तशी तूं आमच्या अपराधांची क्षमा कर आणि आम्हांस परिक्षेंत आणूं नको; तर आम्हांस वाईटापासून सोडीव. आमेन.

नंतर प्रेस्बुतरानें म्हणावें,

हे परम दयाळू पित्या, तूं प्रसन्न होऊन आपल्या पवित्र आत्म्याच्या योगानें हें बालक पुनर्जीत केलें आहे, याला दत्तकपणें आपलें लेंकरूं करून अंगिकारलें आहे आणि आपल्या पवित्र एक्लेसियेचा अवयव केलें आहे, यावरून आम्ही मनापासून तुझी उपकारस्तुति करितों. आमची लीनतेची विनंति ऐकून असें कर कीं, हें पापास मेलेलें व पवित्रतेस जिवंत व ख्रिस्तासहित त्याच्या मरणांत पुरलेलें असतां, यानें जुनें मनुष्यत्व वधस्तंभीं खिळावें (?) आणि पापाचें सर्व शरीर समूळ नष्ट करावें आणि जसें हें तुझ्या पुत्राच्या मरणाचें भागी झालें आहे, तसें त्याच्या पुनरुत्थानाचेंहि भागी होऊन यानें शेवटीं तुझ्या वरकड पवित्र एक्लेसियेसहित, तुझ्या सनातन राज्याचें वारीस व्हावें; आमचा प्रभु ख्रिस्त याच्या द्वारें. आमेन;

नंतर सर्व उभे राहिले असतां प्रेस्बुतरानें धर्मबापांस व धर्मआयांस हा पुढील बोध करावा.

या बालकानें ज्यापक्षीं तुम्हांस आपल्या जामिनांकडून असें वचन दिलें आहे कीं, सैतानाचा व त्याच्या सर्व कर्मांचा मी त्याग करीन; देवाविषयीं विश्वास धरीन व त्याची सेवा करीन त्यापक्षीं तुम्ही अगत्य आठवण ठेवावी कीं, ह्या बालकानें येथें तुम्हांकडून केवढी भारी प्रतिज्ञा व अंगिकार केला आहे आणि केवढें गंभीर वचन दिलें आहे, हें यानें शिकण्याजोगें होतांच शिकावें, म्हणून जपणें तुमचें कर्तव्यकर्म होय आणि या गोष्टीनें यास अधिक चांगलें ज्ञान व्हावें म्हणून उपदेश ऐकाव-

यास यास उत्तेजन देत जा आणि हें बालक स्वभाषेंत सिद्धांतसंग्रह, प्रभूची प्रार्थना व दहा आज्ञा आणि आपल्या जीवात्म्याच्या तारणासाठीं ख्रिस्ती माणसाला ज्या इतर सर्व गोष्टींचें ज्ञान असतें व ज्या सर्वांवर विश्वास ठेवणें अवश्य आहे, त्या सर्व शिकेल, अशी व्यवस्था ठेवा. आणखी अशीहि व्यवस्था ठेवा कीं, धार्मिक व ख्रिस्ती आचरणानें चालण्यास या बालकास नीतिशिक्षण प्राप्त व्हावें आणि त्यानें नित्य स्मरावें कीं, बाप्तिस्मा आम्हांस आमचा पत्कर प्रदर्शित करितो; असा कीं, आमच्या तारणाऱ्या ख्रिस्ताच्या कित्यास आम्ही अनुसरावें आणि त्यासारिखें व्हावें; यासाठीं कीं, जसा तो आम्हांकरितां मेला व पुनः उठला, तसे जे आम्ही बाप्तिस्मा पावलों आहों, त्या आम्ही पापास मरावें व पवित्रतेस पुनः उठावें आणि निरंतर आपल्या दुष्ट व भ्रष्ट वासना मारून टाकीत असावें आणि सर्व सदाचरण व भक्तिशीलता यांत उत्तरोत्तर वाढत जावें.

नंतर त्यानें हेंहीं बोलावें,

या बालकांस स्वभाषेंत सिद्धांतसंग्रह, प्रभूची प्रार्थना, व दहा आज्ञा पाठ झाल्या आणखी एकक्लेसियेचो प्रश्नोत्तरावली जी याच उद्देशानें नेमिली आहे तींत अधिक शिक्षण प्राप्त झालें म्हणजे विलंब न करितां याने एपिस्कोपाच्या हातून दृढीकरण पावावें म्हणून तुम्ही काळजी बाळगावी.

जीं लेंकरें बाप्तिस्मा पावून स्वकृत पाप झाल्यापूर्वीं मरतात, तीं खचीत तारण पावतात. हें देवाच्या वचनावरून निश्चित आहे.

बाप्तिस्मा करण्याच्या वेळेस क्रुसाची आकृती काढण्याविषयीं कोणास कांक्षा न यावी म्हणून १६०४ त प्रथम प्रसिद्ध केलेल्या तिसाव्या कानोनांत या आकृतीचा अर्थ व ही रीत राखण्याची योग्य कारणें पाहावीं.

# पतितपरावर्तनांतील एक भाग : १०

[ २ ]

लहान मुलांना बाप्तिस्मा देण्यासंबंधाच्या अनुष्ठानाचा जो उतारा मागील लेखांत दिलेला आहे तो कांहींसा लांब झाला आहे खरा. परंतु जें धार्मिक अनुष्ठान आहे, तें व्यावहारिक सोयीसाठीं मधूनमधून छिन्नविच्छिन्न करून त्याचे तुकडेतुकडे करण्यापेक्षां तें समग्र रीतीनेंच वाचकांपुढें मांडणें अधिक चांगलें होय. शिवाय मागील लेखांत दिलेल्या उताऱ्यावरून ख्रिस्ती धर्मासंबंधानें, त्यांतील विधींसबंधानें आणि त्यांतील तत्त्वांसंबंधानें पुष्कळ मजेदार गोष्टी वाचकांच्या लक्षांत येण्याचा संभव आहे. येशू ख्रिस्त कुमारी मेरी हिज-पासून जन्मला व तो मेल्यानंतर तिसऱ्या दिवशीं मेलेल्यांमधून पुनः उठला, स्वर्गांत चढला, आणि सर्व शक्तिमान देव जो पिता, त्याच्या उज-वीकडे बसला आहे, आणि तेथून जिवंतांचा व मेलेल्यांचा न्याय कराव-याला तो पुन्हा कालाच्या समाप्तीच्या वेळीं येणार आहे, हीं ख्रिस्ती धर्मां-तील तत्त्वें तर्कशास्त्राला कितपत धरून आहेत, आणि दुसऱ्या धर्मांना "रानटी धर्म" असें म्हणणाऱ्या ख्रिस्ती लोकांना हीं तत्त्वें कितपत भूषणास्पद आहेत, याचाही विचार वाचकांच्या मनामध्यें येऊन गेले-लाच असेल.

आतां एक महत्त्वाची गोष्ट लक्षांत घेण्यासारखी आहे ती अशी कीं, मागील लेखांत दिलेल्या बाप्तिस्म्याच्या अनुष्ठानामध्यें पुष्कळ निरुपयोगी, असंबद्ध किंवा बादरायणसंबंधानें संबद्ध अशा मत्रांचा समावेश करण्यांत आलेला आहे. इतर धर्मांनीं सांगितलेल्या अनुष्ठानांतूनही असे प्रकार आहेत, हें मंत्रांचे अर्थ आणि त्यांचा विधींशीं विनियोग या गोष्टी पहाणारांच्या लक्षांत

येईल. परंतु ही रानटी धर्मांची गोष्ट झाली. खिस्ती धर्मासारख्या अतिशय सुधारलेल्या धर्मामध्यें असला असंबद्धपणा असावा हें मोठें आश्चर्यकारक आहे. अशा असंबद्धतेचें सदर अनुष्ठानांतील एक ठळक उदाहरण वाचकांच्या परिस्फुटतेकरितां आम्हीं पुढें देत आहों. बालकाला बाप्तिस्मा देऊन त्याजवर क्रुसाचें चिन्ह केल्यानंतर सर्वांनीं गुडघे टेकले असतां प्रेस्बुतराच्या तोंडामध्यें पुढील प्रार्थना घातलेली आहे, " हे आमच्या स्वर्गातील बापा, तुझें नांव पवित्र मानलें जावो. तुझें राज्य येवो. जसें स्वर्गांत तसें पृथ्वीवरही तुझ्या इच्छेप्रमाणें होवो. आमची प्रतिदिवसाची भाकर आज आम्हांस दे, आणि जशी आम्ही आपल्या अपराध्याची क्षमा करतों तशी तूं आमच्या अपराधांची क्षमा कर आणि आम्हांस परिक्षेंत आणूं नको; तर आम्हांस वाईटापासून सोडीव. आमेन." ह्या सामान्य प्रार्थनेची बाप्तिस्म्याच्या विशेष प्रसंगीं काय आवश्यकता होती? बाप्तिस्म्याच्या अनुष्ठानांच्या प्रसंगींचे इतर कित्येक मंत्रही असेच निरुपयोगी आणि असंबद्ध आहेत. परंतु निदान त्यांतून बाप्तिस्मा हा शब्द तरी आलेला आहे, किंवा एखाद्या दृष्टांतावरून त्या मंत्राचा बाप्तिस्म्याशीं ओढूनताणून कांहीं तरी संबंध जुळवितां येण्यासारखा आहे. परंतु वर दिलेल्या प्रार्थनेमध्यें तोही संबंध गैरहजर राहिलेला आहे. असली प्रार्थना बाप्तिस्म्याच्या अनुष्ठानामध्यें कशाला आली? रोजची भाकर मागण्याचा आणि बाप्तिस्म्याचा अर्थाअर्थी काय संबंध आहे? वरील प्रार्थना ही इतकी सामान्य आहे कीं, ती ज्या प्रमाणें बाप्तिस्म्याच्या वेळीं म्हटली जात आहे, त्याचप्रमाणें ती लग्नाच्या वेळीं किंवा और्ध्वदेहिकाच्याही वेळीं म्हटली तरी प्रत्यवाय येणार नाहीं. असल्या मोघम प्रार्थनेचें बाप्तिस्म्याच्या अनुष्ठानांत कां नियमन करण्यांत आलें हें एक सुधारलेल्या खिस्ती धर्मशास्त्रकारांनाच माहीत ! .

आतां एखाद्या अज्ञान मुलावर बाप्तिस्म्याचा प्रयोग केल्यापासून त्याच्या इतर धर्मसंबंधावर काय परिणाम होतात हें परधर्मीयांच्या दृष्टीनें पाहण्याच्या पूर्वी खुद्द खिस्त्यांचा मताप्रमाणें हें बाप्तिस्म्याचें थोतांड आलें कोठून, याला आधार काय आहे, व त्याचें निश्चयात्मक पारलौकिक फळ काय आहे याबद्दल आपण थोडासा विचार करून पाहूं. बाप्तिस्म्याबद्दलचें सर्व आधार आणि त्याच्यापासून होणारी फलश्रुति या सर्वोचें कथन अर्थातच बाप्ति-

स्म्याच्या अनुष्ठानामध्यें आलेलें असलें पाहिजे व त्याप्रमाणें मागील लेखांत दिलेल्या उतऱ्यामध्यें ते सर्व उल्लेख आलेले आहेत. त्यावरून पहातां या बाप्तिस्म्याच्या विधानाचा पाया अगदींच डळमळीत आणि लटपटीत दिसतो. सर्व जगभर पसरलेल्या ख्रिस्ती धर्माच्या अवाढव्य इमारतीचा बाप्तिस्मा हा मुख्य पाया होय. परंतु तत्संबंधींच्या विधानाला विशेषसा बळकट पुरावा असल्याचें सदर अनुष्ठानामध्यें कोठेंच नमूद केलेलें दिसत नाहीं. या बाप्तिस्म्याला जे कांहीं आधार आहेत ते प्रत्यक्ष नसून गौण आहेत. मागील लेखांत दिलेल्या अनुष्ठानांतच एके ठिकाणीं असा उल्लेख आहे कीं, " हे सर्वसमर्थ व सनातन देवा, नोव्हा व त्यांचें कुटुंब यांचा पाण्यानें नाश होऊं नये म्हणून त्यास तूं आपल्या मोठ्या दयेनें तारवांत वाचविलें आणि आपले इस्रायल लोक सूफ समुद्रांतून सांभाळून नेण्यानें तूं स्थापित केलेला पवित्र बाप्तिस्मा उपमेनें दर्शविला. " नोहा आणि त्यांच्या कुटुंबांतील माणसें पाण्यांत बुडूं नयेत म्हणून तारवांत बसलीं आणि इस्रायल लोक समुद्रांतून पार गेले, याचा आणि बाप्तिस्म्याचा काय संबंध ? शेंकडों लोक पाण्यांत बुडूं लागले असतां तारवांत बसतात आणि शेंकडों लोक समुद्रांतून सुरक्षितपणें पार पडतात; म्हणून त्यांच्याबरही बाप्तिस्म्याचा विधि अशा रीतीनें सिद्ध होऊं लागेल ! वस्तुतः बाप्तिस्म्याविषयीं प्रत्यक्ष विधान नसून त्याच्या आधारासाठीं उपमेवर भार ठेवावा लागतो हीच गोष्ट आधीं गौण आणि दोषास्पद आहे. परंतु ती उपमा तरी स्पष्ट आणि सत्यार्थमात्रनिदर्शक असावयाला पाहिजे होती. परंतु तीही तशी नाहीं. नोहाचीं माणसें बुडत होतीं तों तीं गलबतांत बसलीं आणि इस्रायल लोक समुद्रांतून पार गेले, म्हणून बाप्तिस्म्याचा विधि कसा सिद्ध झाला ? हजारों वर्षांपूर्वीं नोहाचीं मुलेंलेकरें वाहून चाललीं होतीं तीं एका होडग्यांत बसलीं आणि इस्रायल लोक जमिनीच्या एका भागावरून दुसऱ्या भागावर गेले, म्हणून हल्लीं जन्मास आलेल्या एखाद्या मुलाच्या डोसक्यावर थंड पाण्याचे थेंब कां शिंपडावे ? ह्या कथानकांत उपमान कोणतें, आणि उपमेनें कोणती गोष्ट कशी सिद्ध झाली, हें कोण सांगू शकणार आहे ? अथवा देवाच्या ( ख्रिस्ती देवाच्या ) सर्वच गोष्टी मनुष्यांना अगम्य आहेत ! नोहाचे लोक आणि इस्रायल लोक यांच्याशिवाय दुसरेही हजारों लोक गलबतांत बसले आहेत

आणि समुद्राच्या पैल थडीला गेलेले आहेत; परंतु तेवढ्यावरून पोरांच्या डोक्यावर पाणी शिंपडून बाप्तिस्मा करावा, असलीं खुळसट अनुमानें न योजिलेल्या, न अभिप्रेत असलेल्या आणि न गोचर होणाऱ्या उपमेच्या जोरावर कोणत्याही धर्मांतल्या लोकांनीं काढलेलीं नाहींत.

बाप्तिस्मा करावा असें देवानें प्रत्यक्ष सांगितलें नाहीं. तेव्हां देवानें तो उपमेनें दर्शविला आहे, असें मूळच्या कित्येक ख्रिस्ती लोकांनीं उठविलें आहे; आणि त्यांच्या मागून आलेले ख्रिस्ती लोक तें खरें आहे असें अंध परंपरेनें मानीत आले आहेत. परंतु ही बाप्तिस्म्याची कल्पना किती निराधार आहे, आणि त्यांतील उपमेची कोटी किती पोंचट आहे, हें वर दाखविलेंच आहे. तरी पण हा बाप्तिस्म्याचा विधि करावा असें क्षणभर गृहित धरून नंतर आपण तो कसा करावा या प्रश्नाकडे वळूं. सर्व बाप्तिस्मा पावलेल्या लोकांतील येशू ख्रिस्त हा पहिला होय. जॉन बॅप्टिस्ट यानें जीजस् ख्राईस्टला यार्डन नदींत उभें करून व तेथील पाणी शिंपडून बाप्तिस्मा दिला; ह्मणून डोक्यावर पाणी शिंपडून बाप्तिस्मा देण्याचा रिवाज पडलेला दिसतो. म्हणजे हा प्रकार केवळ घुणाक्षरन्यायाचा दिसतो. जॉन बॅप्टिस्ट यानें आपल्या शिष्याच्या कानांत फुंकर घातला असता, तर हे अंधपरंपरेनें जाणारे ख्रिस्ती लोक बाप्तिस्म्याचे वेळीं मुलांचे कानांत फुंकर घालते. जॉननें आम्हां ब्राह्मणाप्रमाणें आपल्या शिष्याला लंगोटी नेसविली असती, तर हे लंगोटी नेसवूं लागले असते, किंवा कदाचित् मुसलमानांप्रमाणें सुंताही करूं लागले असते. कां कीं, ख्रिस्ती लोकांच्या बाप्तिस्म्याच्या वेळच्या ह्या प्रकृतीला कारणांचा गंधसुद्धां नाहीं. एका जॉननें पाणी शिंपडलें म्हणून हल्लींचे सहस्रावधी भाडोत्री जॉनही ज्याच्या त्याच्या डोकीवर पाणी शिंपडीत सुटले आहेत. त्यानें पाणी कां शिंपडलें, आणि आपण पाणीच कां शिंपडलें पाहिजे, या विचाराचा कोठें मागमूसही नाहीं. वैश्वदेवाच्या वेळीं आंखूड पंचा नेसलेला आजोबाचा कच्छ मुक्त झाला म्हणून वंशपरंपरेनें कच्छ मुक्त करणारे सगळे बनले आहेत, आणि हे इतर लोकांना रानटी म्हणून हंसतात !

हल्लींच्या बाप्तिस्म्याचीं मुख्य दोन अंगें आहेत; एक डोक्यावर पाणी शिंपडणें आणि दुसरें कपाळावर क्रूसाची आकृति काढणें. यापैकीं पाणी

शिंपडण्याचा अनर्थकपणा वर दाखविलेलाच आहे. आतां क्रूसाचें चिन्ह करण्याचें जें दुसरें अंग त्याच्याविषयीं थोडासा विचार करूं. जॉन बॅप्टिस्ट पाण्यांत उभा होता, ही जशी पाणी शिंपडण्याच्या विधीची उपपत्ति तशी येशू ख्रिस्ताला क्रूसावर चढविलें म्हणून बाप्तिस्म्यांत क्रुसचें चिन्ह कपाळावर करावें, ही क्रूसाच्या चिन्हाची उपपत्ति होय. पहिली उपपत्ति जितकी लंगडी, तितकीच दुसरीही आहे. परंतु असल्या क्षुल्लक लंगडेपणाकडे दुर्लक्ष केलें, तरी या क्रूसाच्या चिन्हासंबंधानें दुसरी एक जबरदस्त शंका पुढें सरते. जीजस् ख्राइस्टचा बाप्तिस्मा परिपूर्ण झालेला होता, असें सर्वांचें मत आहे. तो अपरिपूर्ण राहिला असें कोणाच्यानेंही म्हणवणार नाहीं. परंतु पाणी शिंपडणें आणि क्रूसाचें चिन्ह करणें हीं तर बाप्तिझमचीं दोन आवश्यक अंगें आहेत, असें ख्रिस्ती लोक मानतात. पण वर सांगितलेंच आहे कीं, येशू ख्रिस्ताला सुळावर दिल्यानंतर क्रूसाची आकृति करण्याची कल्पना निघाली तेव्हां अर्थातच जीजस् ख्राइस्टच्या बॉप्तिझमच्या वेळीं त्याच्या कपाळावर क्रूसाची आकृति केलेली नसली पाहिजे. आतां जर जीजस् ख्राइस्टच्या कपाळावर क्रूसाचें चिन्ह केलेलें नाहीं, तर त्याचा बाप्तिस्मा अपरिपूर्ण राहिला असला पाहिजे असें होतें. किंवा नुसत्या पाणी शिंपडण्यानें जर जीजस् ख्राइस्टचा बाप्तिस्मा पुरा होत असेल, तर हल्लींचे ख्रिस्ती लोक मुलाच्या कपाळावर क्रॉस करण्याची जी कृति करतात, ती तरी विनाकारण अधिक, निरर्थक आणि असमंजसपणाची ठरते. क्रूसाचें चिन्ह करण्याची कल्पना जीजस् ख्राइस्टला क्रूसावर चढविण्याच्या आधींही होती, असें कोणी म्हणेल, तर त्याच्या पदरीं शब्दविरोधाचा दोष येईल. आणि शिवाय "आतांपासून हें बालक क्रूशीं दिलेल्या ख्रिस्ताचा विश्वास पत्करावयास लाजणार नाहीं" या वचनालाही बाध येऊं लागेल. सारांश, येशू ख्रिस्ताला क्रूसावर चढविण्याच्या आधीं क्रूसाची आकृति करण्याची कल्पना अस्तित्वांत आली होती, असें मानणें म्हणजे वेडेपणा आहे. जीजस् ख्राइस्टच्या बाप्तिस्म्याच्या वेळीं जर ही कल्पना नव्हती, तर अर्थातच त्याच्या कपाळावर क्रूसाचें चिन्ह केलेलें नसलें पाहिजे. पण त्या चिन्हावांचून जर त्याचा बाप्तिस्मा पुरा झाला, तर बाकीच्यांच्या ठिकाणीं हें संस्कारगौरव कशाला ? जर तें आवश्यक असेल, तर ख्राइस्टचा बाप्तिस्मा

अपरिपूर्ण ठरतो. म्हणजे ख्रिस्ती धर्माचा जो मूळपुरुष त्याचाच बाप्तिस्मा अपरिपूर्ण आणि म्हणून दूषित असल्याकारणानें त्याची पुढीलही सर्व परंपरा दूषित ठरते. आतां हा दोष टाळण्यासाठीं कोणी असें म्हणेल कीं, करूसचें चिन्ह आवश्यक नाहीं. तर ख्रिस्ती लोक बाप्तिस्म्याचे वेळीं अविहित आणि अनवश्यक अशा कांहीं तरी गोष्टी करून शास्त्रयुक्त संस्कार न करितां कांहींतरी गोंधळ घालतात अशा दोषाला ते पात्र होतात. मिळून कोणत्याही बाजूनें पाहिलें तरी ख्रिस्ती लोकांची या उभयतः पाशा रज्जूपासून सुटका होऊं शकत नाहीं. अशा अनेक अंतर्गत दोषांच्यामुळें ख्रिस्ती लोकांच्या या बाप्तिस्म्याच्या संस्कारामध्यें त्यांच्याच शास्त्रवचनाच्या दृष्टीनें पाहिलें असतां कांहीं अर्थ नाहीं असें सिद्ध होतें.

ऐहिक दृष्टीनें पाहतां ख्रिस्ती लोकांच्या या बाप्तिस्म्याच्या संस्कारामध्यें घोंटाळ्याशिवाय दुसरें कांहींच दिसत नाहीं. बाप्तिस्मा करावा अशाविषयीं स्पष्ट वचन नाहीं व तो करण्याचें जे प्रकार आहेत, त्यामध्यें मेळ आणि समंजसपणा हे गुण दिसत नाहींत. मिळून ऐहिक विचाराला बाप्तिस्मा करावा असें वाटण्याला कोठेंच कांहीं साधन नाहीं. बरें, आतां बाप्तिस्मा केल्यापासून पारलौकिक फळ तरी काय होतें, हें पाहूं. प्रस्तुत प्रसंगींच्या एका मंत्रामध्यें असें सांगितलें आहे कीं, " पाणी व पवित्र आत्मा यांच्या योगानें नवा जन्म पावल्यावांचून [ म्हणजे बाप्तिस्मा झाल्यावांचून ] कोणाच्यानें देवाच्या राज्यांत प्रवेश करवत नाहीं..." ह्या वचनावरून बाप्तिस्मा केल्यानें मनुष्याचा देवाच्या राज्यांत समावेश होतो अशी एक कल्पना दिसते. परंतु बाप्तिस्मा घेतल्यानें ही फलप्राप्ति होतेच आणि जे बाप्तिस्मा घेत नाहींत त्यांना ही फलप्राप्ति होत नाहीं, असा ख्रिस्ती लोकांपाशीं काय पुरावा आहे? जसे इतर लोक मरतात, तसें बाप्तिस्मा घेतलेले ख्रिस्ती लोकही मरतांना दिसतात. आणि बाकीच्या लोकांप्रमाणें तेही जमिनीमध्यें गाडले जातात. आणि थडग्यांमध्यें देवाचें राज्य आहे, असें तर कोणी मानीत नाहीं. अशी प्रत्यक्ष स्थिति सर्व लोकांना दिसत असतां, बाप्तिस्मा घेतलेले लोक देवाच्या राज्यांत प्रवेश करितात, असें ख्रिस्ती लोकांना कशावरून प्रतिपादन करतां येईल ? पाणी शिंपडून शुद्ध केलेले देह मातींत पुरलेले मातींतच न राहतां व किडे मुंग्यांकडून खाल्ले न जातां ते फिरून उठतात आणि देवाच्या

राज्यांत प्रवेश करितात, हें कोणी पाहिलें आहे ? याबद्दल चाक्षुषप्रत्यक्षज्ञान कोणी खिस्ती असला तरी त्यालाही होणें शक्य नाहीं. आतां कोणी खिस्ती असें म्हणेल कीं, आमच्या धर्मपुस्तकांत असें सांगितलें आहे. म्हणून मृत देह देवाच्या राज्यांत प्रवेश करीत असला पाहिजे. तर त्याला असें विचारलें पाहिजे कीं, जर तुमच्या धर्मपुस्तकांत सांगितलें आहे तेवढ्या-वरच तें खरें मानावयाचें, तर मग दुसऱ्या लोकांच्या धर्मपुस्तकांतून जें कांहीं सांगितलें असेल, तेंही कां खरें मानू नये ? तुमच्या धर्मपुस्तकांत सांगितल्यावरून बाप्तिस्मा घेतलेले लोक जर देवाच्या राज्यांत प्रवेश करीत असले तर इतर धर्मपुस्तकांतून सांगितल्याप्रमाणें भगवद्भक्ति केल्यानें इतर धर्मांतील लोकही स्वर्गामध्यें कां जाऊं शकणार नाहींत ? आणि जर तेही स्वर्गांत जात असले, तर मग बाप्तिस्म्यावांचून तारण नाहीं असा व्यर्थ कंठशोष करून इतर धर्मांतील लोकांना बाटविण्याला तुम्हीं कां प्रवृत्त होतां ? बाप्तिस्म्यावांचून तारण नाहीं असें ओरडणाऱ्या लोकांनीं आपल्या धर्म-समजुतीप्रमाणें फक्त बाप्तिस्मा घेतलेले लोक देवाच्या राज्यांत प्रवेश करितात इतकेंच मनःकल्पित मानून उपयोगी नाहीं. तर बाकीचे लोक स्वर्गांत जात नाहींत, असें प्रत्यक्ष पुराव्यावरून सिद्ध करून दाखविलें पाहिजे. परंतु जे बाप्तिस्मा घेतात ते स्वर्गांत जातात, हा आपला स्वतःचा सिद्धांत ज्यांना सिद्ध करून दाखवितां येत नाहीं, ते परधर्मीय लोक स्वर्गांत जात नाहींत, ही मुळचीच खोटी असलेली कल्पना प्रत्यक्ष पुराव्यानें खरी म्हणून कधीं दाख-विणार ? सारांश, प्रत्यक्ष पुराव्यावरून पाहतां बाप्तिस्म्यापासून होणारी भावी फलश्रुतिही खरी असेल असें ठरत नाहीं. या एकंदर विवेचनावरून खिस्ती लोकांचा बाप्तिस्मा हें एक निवळ थोतांड आहे, हें कोणाच्याही लक्षांत येईल. त्याला आधार नाहीं. संस्कारांत मेळ नाहीं आणि त्याच्या पारलौकिक परिणामाला पुरावा नाहीं. अशा सर्व बाजूनीं पाहता हें बाप्तिस्म्याचें थोतांड असमंजस, अनावश्यक आणि अनुपयोगी आहे असें ठरतें.

खिस्ती लोकांचींच मतें घेऊन त्यांच्या बाप्तिस्म्याच्या संस्काराची ही येथवर परीक्षा झाली. आतां परधर्मीय लोकांच्या दृष्टीनें या संस्कारामध्यें काय हंशील आहे, हें आपण पाहूं. मागील लेखांत दिलेल्या खिस्ती संस्का-राचा प्रयोग खिस्ती आईबापांच्या पोटीं जन्मास आलेल्या मुलावर जोंपर्यंत

ख्रिस्ती लोक करीत आहेत, तोंपर्यंत परधर्मीय लोकाना त्यांच्या बाप्तिस्म्याच्या संस्काराची चर्चा करीत बसण्याचें कांहीं एक कारण नाहीं. परंतु ख्रिस्ती मिशनरी लोक ह्यांच संस्काराच्या प्रयोगांनीं इतर धर्मांतील मुलें बाटविण्याला प्रवृत्त होतात. म्हणून इतर धर्मांतलि लोकांना या बाप्तिस्म्याच्या थोतांडांत आहे तरी काय आणि त्या थोतांडांपासून आपलीं मुलें बाटली तरी जातात कशीं, याविषयींची चिकित्सा करणें भाग पडतें. आणि म्हणूनच आम्ही या विषयाकडे वळलों आहों. ख्रिस्ती लोकांच्या मताप्रमाणें पाहिलें तर बाप्तिस्म्यांत कांहीं अर्थ नाहीं, हें वर सिद्ध करून दाखविलेंच आहे. आतां आपल्या दृष्टीनें त्यांत काय अर्थ आहे तो पहावयाचा. परंतु न्यायाचीं कोर्टें वगैरे ठिकाणच्या नेहमींच्या व्यवहाराच्या पद्धतीकडे पाहिलें असतां असें दिसतें कीं, फिर्यादीनें आधीं आपल्या फिर्यादींतील म्हणणें स्थापित केलें पाहिजे. आणि तें जर स्थापित होईल तर मग प्रतिवादीला पुढें बोलण्याचें कारण पडणार. परंतु फिर्यादिच्या बोलण्यांतच जर निराधारपणा, विसंगतपणा, आणि असमंजसपणा स्पष्ट दिसत असला, तर त्यांच्या या गुणांनींच त्यांची फिर्याद नाशाबित ठरते. तशा प्रकारची मिशनरी लोकांच्या ह्या बाटविण्याची स्थिति आहे. तुमचीं मुलें आम्ही बाप्तिस्मा देऊन बाटविलीं, असें मिशनरी लोक म्हणतात. पण तीं वर वर्णन केलेल्या प्रकारच्या बाप्तिस्म्यानेंच बाटलीं कशीं ? जो सापच नव्हे, तो 'चावला' 'चावला' म्हणून ओरड करून सर्पदंश कसा स्थापित होतो ? ज्या मृगजळाला अस्तित्वच नाहीं, त्या जळाच्या डोहामध्यें तुमचीं मुलें, 'बुडविलीं' 'बुडविलीं' अशी ओरड केल्यानें जलनिमग्नता कशी सिद्ध होणार ? आणि अशा ठिकाणीं आपण तरी आपलीं मुलें रज्जुसर्पदष्ट किंवा मृगजलनिमग्न झालीं आहेत, असें समजून त्यांना टाकून देण्याला कां प्रवृत्त व्हावें ? नुसत्या बाप्तिस्म्यानें आपल्या मुलांना काय झालें आहे ? रज्जुसर्पाच्या दंशाचें विष कसलें ? आणि तें कोणाला बाधतें ? मृगजलाच्या स्पर्शानें कोणाचें अंग ओलें होतें, आणि त्यांत कोण बुडतो ? मला सर्प चावला किंवा मी पाण्यांत बुडालों, अशी आपल्या मनाची नाहक कल्पना करून घेऊन जो त्याच कल्पनेला चिटकून बसतो, त्याच्याशिवाय रज्जुसर्प आणि मृगजळ याच्यापासून कोणालाही बाधा होणार नाहीं. वर दाखविल्याप्रमाणें निराधार विसंगत आणि निरुपयोगी अशा संस्कारांपासून ख्रिस्ती लोकावरही जर कांहीं संस्कार होत नाहींत,

तर इतर लोकांवर तो काय होणार? बाप्तिस्म्याचा संस्कार म्हणजे निवळ एक थोतांड आहे. त्या थोतांडाला फसून जाऊन आपल्या लोकांनीं आपल्या पोटचीं पोरें तीं 'बाटलीं' असें म्हणून टाकून द्यावीं, याच्यासारखें वेडेपणाचें आणि क्रूरपणाचें दुसरें कोणतेंही कृत्य नाहीं. ज्या मुलांना आपण टाकतों, त्या मुलांना झालें आहे काय? आम्ही याला बाप्तिस्मा दिला आहे, आतां हा तुमच्यांत येऊं शकणार नाहीं, असें आपली शिकार आपल्या ताब्यांत राखण्यासाठीं कावेबाज मिशनरी लोक म्हणाले म्हणून आपण तेवढ्यावरून आपल्या मुलांना काय म्हणून टाकावें? ते जर या बाबतींत आपले प्रतिपक्षी आहेत, तर आपण त्याचे दुष्ट हेतु विघटित करावे, किंवा ते शेवटास नेण्यासाठीं आपण जास्तच मदत करावी? त्यांनीं बाप्तिस्मा केला आहे म्हणजे काय केलें आहे, तें वर दाखविलेंच आहे. असल्या पोकळ थोतांडाला आणि खोट्या बुजगावण्याला बुजून आपल्या धर्माचार्यांनीं आपलीं मुलें उगीच ख्रिस्ताच्या भक्ष्यस्थानीं पडूं द्यावीं? बाप्तिस्मा दिला म्हणजे काय केलें, तर डोक्यावर पाणी शिंपडलें आणि कपाळावर क्रूसाची आकृति केली, हेंच कीं नव्हे? एखाद्या नळाचा कॉक सोडून त्याच्या खालीं कोणी उभे राहिल्यास त्याच्या डोक्यावर पाण्याचे लक्षावधि थेंब शिंपडले जात असतील, आणि त्या योगानें तेही सर्व ख्रिस्ती होऊं लागतील! आपण आपला हिंदु धर्म जर इतका नाजुक करून ठेविला तर आपण वास्तविक त्या धर्माचे रक्षक नसून ख्रिस्ती धर्माचे मदतगार आहों असेंच म्हटलें पाहिजे. पाण्याच्या थेंबांत काय आहे? नळाचे थेंब डोकीवर पडतात, पावसाचे थेंब डोकीवर पडतात, किंवा रंगपंचमीच्या एखाद्या पिचकारीचे थेंब डोकीवर पडतात. त्याच्यापेक्षां याच थेंबांत जास्त काय आहे? जर कांहीं जास्त असलें तर त्या पाण्याच्या थेंबांत नसून ते थेंब ज्या मंत्रांनीं अभिमंत्रित झालेले असतील त्या मंत्रांमध्यें आहे. पण त्या मंत्रांचें महत्त्व आपल्याला काय? आपण ते मंत्र मानतों? त्यांतील प्रार्थना आपल्याला कबूल आहेत? किंवा त्या प्रार्थना ज्या धर्मग्रंथांत सांगितलेल्या आहेत तो धर्मग्रंथ आपणाला मान्य आहे! अशांतील जर कांहींच प्रकार नाहीं, तर मग त्या पाण्याच्या आणि क्रूसाच्या परिणामाला आपण किंमत कां द्यावी? एखादा घाणेरडा डाग पडला असला तर तो धुऊन टाकण्यासाठीं आपण त्या पाण्याचा उपयोग करूं आणि तेंच पाणी आपल्याला कढत पाहिजे

असेल तर तो क्रॉस लांकडाचा असल्यास त्या लांकडावर पाणी तापवून घेऊं. इतकी ज्या पाण्याबद्दल आणि लांकडाबद्दल आपली आदरशून्यता स्वाभाविकपणें आहे, त्या पाण्याचा आणि लांकडाचा आपल्या धर्मांतील मुलांच्या कपाळाच्या कातडीला स्पर्श झाल्याबरोबर तीं मुलें टाकाऊ झालीं असें आपण समजतों, हें केवढें आश्चर्य आहे! असो. याप्रमाणें मिशनऱ्यांच्या बाप्तिस्म्याचा वास्तविक परधर्मीयांवरही कांहीं परिणाम होण्याचें कारण नाहीं व होतो असा जो भ्रम असेल तो आपण टाकून दिला पाहिजे, हें येथपर्यंत दर्शविलें आहे. याच्यापुढील मुद्यांचा विचार पुढील लेखांत करूं.

---

# पतितपरावर्तनांतील एक भाग : २१

[ ३ ]

ख्रिस्त्यांच्याच मताप्रमाणें ख्रिस्त्यांच्या बाप्तिस्म्यामध्यें कांहीं अर्थ नाहीं, व परधर्मीयांच्या मतानें तर तो बिलकूलच नाहीं, हें मागील लेखांत सामान्य रीतीनें दाखविलेंच आहे. असल्या संस्कारानें कोणत्याही मनुष्याचा, मग तो अल्पवयी असो किंवा सज्ञान असो, बाप्तिस्मा केला तरी तो बाप्तिस्मा होत नाहीं, हेंही मागील विवेचनावरून स्पष्ट होतच आहे. तरी पण, तो लहान मुलांच्या संबंधानें यत्किंचित्‌ही होत नाहीं, असें स्पष्टपणें सिद्ध करून दाख-

विण्याला कित्येक अतिशय महत्त्वाचे पुरावे आहेत. आणि अज्ञान मुलांना मिशनऱ्यांनीं बाटविलें असतां आपण त्यांना टाकावें कीं काय, ह्या प्रश्नाचा ऊहापोह करण्याकरितां तर मुख्यत्वेंकरून ह्या बाप्तिस्म्याच्या संस्काराच्या विचारणेला आपण आरंभ केलेला आहे. म्हणून त्या विचारणेच्या बाप्तिस्म्याच्या संस्काराचें सामान्य रीतीनें खंडण झाल्यानंतर अज्ञान मुलांसंबंधांच्या विशेष मुद्याकडे आतां आपण वळूं.

मागील लेखात दर्शविलेल्या कारणासाठीं अज्ञान मुलांचा बाप्तिस्मा त्यांना स्वधर्मभ्रष्ट करूं शकत नाहींच. परंतु अज्ञान मुलें अपातितत्वामध्यें कायम राहतात, असें दर्शविण्याला दुसरीं कारणें आहेत. हीं कारणे समजण्यासाठीं लेखांक १ मध्यें दिलेल्या बाप्तिस्म्याच्या अनुष्ठानाकडे थोडेसें वळणें जरूरीचें आहे. अज्ञान मुलाच्या संबंधानें त्या अनुष्ठानामध्येंच स्वतःच्या खंडनाचें बीज आहे. अज्ञान मुलांना बाप्तिस्मा देण्याच्या वेळीं काय प्रकार केला जातो ? अनुष्ठानामध्यें या प्रसंगाला अनुलक्षून पुढीलप्रमाणें वचन आहे. " जें तुम्ही प्रार्थना करून मागितलें, तें सर्व द्यायास आमचा प्रभू येशू खिस्त ह्यानें आपल्या शुभवर्तमानांत वचन दिलें आहे; तें वचन तो तर निश्चयें राखील आणि खरें करील. यास्तव अगत्य आहे कीं, खिस्तानें असें वचन दिलें असता, या बालकांनींही ( हे प्रौढ होऊन आपल्या अंगावर घेईपर्यंत ) तुम्ही आपल्या जामिनांकडून असें वचन द्यावें कीं, सैतान आणि त्याचीं सर्व कर्में यांचा मी त्याग करीन, देवाच्या पवित्र वचनावर स्थिर विश्वास ठेवीन, आणि त्याच्या आज्ञा मानून त्याप्रमाणें वर्तेन. " सैतानाचा त्याग करून देवाच्या आज्ञा पाळण्याचें वचन देणें, ही या बाप्तिस्म्याच्या विधींतील एक मुख्य गोष्ट आहे. पण हें वचन हिंदुस्थानांत इंग्रजी अघाशीपणामुळें पडलेल्या दुष्काळांत मरत असलेल्या लहान लहान मुलांना काय समजणार ? आणि ज्या वचनांचा अर्थही त्या मुलांना कळत नाहीं, त्या वचनांनीं तीं बांधलीं कशीं जाणार ? यावर मिशनरी लोक असें म्हणतील कीं बालकें अज्ञान असतात म्हणूनच त्यांच्याकडून कोणी तरी जामीन घेण्याचा नियम ठरवून ठेविलेला आहे. पण लहान मुलांना जामीन म्हणजे काय, हें तरी समजत असतें काय ? त्यांना देव आणि सैतान यांचा अर्थ जितका समजतो, तितपतच जामीन याचा अर्थ समजत असतो.

अशा अज्ञानाच्या स्थितीमध्यें—जेव्हां सैतानाचीं दुष्ट कर्में, देवाच्या पवित्र आज्ञा, किंवा जामिनाची जबाबदारी, यांपैकीं कांहींच समजत नसतें, अशा स्थितीमध्यें—झालेल्या वचनांनीं कोण बांधला जाणार आहे ? परंतु हल्लींच्या न्यायी इंग्रजी राज्यामध्यें अशी गम्मत आहे कीं, एखादा लहानसा जमिनीचा तुकडा विकावयाचा असला, तर तो सुद्धा विकत देण्याला अज्ञान मुलाला अधिकार नाहीं, परंतु आपला अमूल्य देह, अविनाशी आत्मा, किंवा सनातन धर्म, याच्यासारख्या महत्त्वाच्या गोष्टी विकण्याला त्याला पाहिजे तेव्हां अधिकार आहे ! या बाबतींत किती अन्याय होत आहे, हें हल्लींचें सरकार खिस्ती असल्यामुळें त्या सरकारला कधींही दिसावयाचें नाहीं. परंतु इतर लोकांनीं यासंबंधानें इतकी डोळेझांक का करावी ? त्यांना डोळे उघडून पाहिलें पाहिजे. आपल्या मुलानीं काय वचन दिलें आहे, आणि तें कोणत्या अवस्थेमध्यें दिलें आहे,ह्याविषयीं विचार झाला पाहिजे.ज्याचा अर्थ समजत नाहीं तें वचन कसलें? आणि त्याच्या योगानें उत्पन्न होणारी वचनबद्धता तरी कसली ? खिस्त्यांच्या संस्कारग्रंथांमध्यें बालकाचा बाप्तिस्मा आणि वयस्कांचा बाप्तिस्मा असे दोन निरनिराळे संस्कार आहेत.त्यांची तुलना करून पाहिली असतां वयस्कांच्या बाप्तिस्म्याचा विधी किती सरळ आहे, आणि बालकाच्या बाप्तिस्म्याच्या विधीमध्यें किती असमंजसपणा आहे, हें तेव्हांच लक्षांत येण्यासारखें आहे. वयस्कांच्या बाप्तिस्म्यामध्यें जामिनकीबद्दल एक अक्षरही नाहीं. ज्याचा तो आपल्या समजुतीनें प्रत्येक प्रश्नांचीं उत्तरें देतो. ज्या वयस्कांचा बाप्तिस्मा व्हावयाचा असेल, त्याला प्रेस्बुतर प्रश्न विचारतो कीं, तूं सैतान आणि त्याचीं सर्व कर्में, जगाचा व्यर्थ डामडौल व वैभव व त्याच्या सर्व लोभिष्ट इच्छा आणि देहाच्या भ्रष्ट वासना, यास अनुसरणार नाहींस, आणि यांच्या आधीन होणार नाहींस, असा याचा तूं त्याग करितोस काय ? यावर वयस्क मनुष्य आपल्या स्वतःच्या अक्कलहुशारीनें उत्तर देतो कीं, मी या सर्वांचा त्याग करितों. तसेंच देवाचा एकुलता एक पुत्र येशू खिस्त पवित्र आत्म्याच्या योगानें गर्भरूप झाला, कुमारी मारिया इज-पासून जन्मला, त्यानें पंत्य पीलाताच्या वेळेस दुःख भोगिलें, त्याला पुरलें, तो अधोलोकांत उतरला आणि तिसऱ्या दिवशीं मेलेल्यांमधून पुनः उठला, स्वर्गांत चढला, देवाच्या उजवीकडे बसला आणि तेथून जिवंताचा व मेले-

त्यांचा न्याय करावयाला तो पुनः कालाच्या समाप्तीस येणार आहे, इत्यादि साऱ्या जगांतील अतिशय वेडगळ असे जे विश्वास ते विश्वास धरून तूं बाप्तिस्मा घेण्यास इच्छितोस काय? असें प्रेस्बुतर वयस्क मनुष्याला हडसून खडसून विचारतो; आणि असें विचारल्यानंतरही जो वयस्क मनुष्य मी हे विश्वास धरून बाप्तिस्मा घेण्यास इच्छितों, असें म्हणतों, त्याजबद्दल कांहीं तक्रार नाहीं. जो वयस्क असून दोन आणि दोन मिळून पांच होतात असें मानण्याला तयार होतो, किंवा कुमारीला मुलें होतात आणि पुरलेला देह उठतो या गोष्टीला संमति देण्याला तयार होतो, त्याच्या-बद्दल काय म्हणावयाचें आहे? परंतु अज्ञान मुलांना भोंदून त्यांचा असल्या वेडगळ समजुतींत बाप्तिस्मा करावयाचा याच्यासारखें अधमपणाचें कृत्य दुसरें कोणतेंही नाहीं. वयस्काच्या बाप्तिस्म्यांत ज्याचा तो उत्तरें देत असतो. परंतु बालकाच्या बाप्तिस्म्यांत त्या बालकाकरितां त्याचे जामीन उत्तरें देत असतात. जामीन म्हणून पत्करण्याचीच जेथें अज्ञानामुळें योग्यता नाहीं, तेथें त्या जामिनाच्या उत्तरानीं अज्ञान मुलें बांधलीं जावीं, हा न्याय कोठला? शिवाय हे जामीन कोण असतात, याच्याबद्दलही थोडासा विचार करणें जरूर आहे. ख्रिस्ती आईबापांच्या पोटीं जन्मास आलेल्या ज्या मुलांचा बाप्तिस्मा व्हावयाचा असेल, त्यांच्या जामिनांबद्दल तूर्त आपल्यापुढें प्रश्न नाहीं. परंतु गुजराथेंत दुष्काळ पडला असतां तेथील जीं मुलें पुण्यास आणून बाटविलीं जातात, किंवा मद्रासेंतील जीं मुलें मिशनऱ्यांच्या सुगीच्या दिवसांत •ागपुरास आणून भ्रष्ट केलीं जातात, त्या मुलासंबंधानें आपल्यासमोर तूर्त प्रश्न आहे. अशा मुलांच्या बाप्तिस्म्याच्या वेळीं जामीन कोण राहतात? कोणी तरी पूर्वी बाटलेला महार, चांभार धरून त्याला पुढें बाटणाराचा धर्मबाप करावयाचे, आणि कोणीतरी अशाच प्रकारची बाई धरून तिला धर्मआई करावयाचें आणि ख्रिस्ती धर्माच्या खड्ड्यांत ह्या प्रथम बुडालेल्या लोकांनीं त्या नवीन बुडणाऱ्या अर्भकांना जामीन रहावयाचें असा ह्या जामिनकीचा प्रकार आहे. एका कुऱ्हाडीच्या दांड्यानें रानांतील बाकीच्या झाडांना तोड-ण्यासाठीं साधनीभूत होणें आणि ही वर वर्णन केलेली जामिनकी, ह्यांच्या-मध्यें मोठासा फरक आहे असें नाहीं. पुढें हीं मुलें मोठीं झाल्यावर त्यांना जर एखाद्या सावकाराकडून पांच दहा रुपये कर्जाऊ काढावयाचे असले

आणि त्या सावकारानें जर एखादा जामीन मागितला, तर जे त्या बिचाऱ्याच्या थाऱ्यालाही उभे रहावयाचे नाहींत, ते त्याच्या जन्माची हमी घेऊन आणि त्याच्या भावी धर्ममतांची जबाबदारी घेऊन त्याला जामीन होतात, हें केवढें आश्चर्य आहे, आणि ही केवढी लबाडी आहे, याच्याबद्दल वाचकांनींच विचार करावा.

शिवाय दुसरा एक मुद्दा असा आहे कीं, बाप्तिस्म्याचे वेळीं जीं वचनें घेतलीं जातात, त्या वचनाप्रमाणें वागणारे ख्रिस्ती लोक क्वचित् आढळतात. आणि त्यामुळेंसुद्धां त्या वचनांना वैयर्थ्य प्राप्त होतें. बाप्तिस्म्याच्या वेळचीं बाप्तिस्मा देणारा आणि बाप्तिस्मा घेणारा यांमधील जीं प्रश्नोत्तरें आम्ही पहिल्या लेखांत दिलीं आहेत, त्यांचें पृथक्करण करून पाहतां त्यांत दोन गोष्टींचा समावेश केलेला आढळतो. अविवाहित मुलीला संतती होणें, प्रेत पुरल्यानंतर उठणें, आणि सगळ्या जगाचा शेवटच्या दिवशीं न्याय होणें, वगैरे मतें ही एक गोष्ट होय. व सैतानाचीं सर्व कर्में, जगातील व्यर्थ डामडौल आणि वैभव, व सर्व लोभिष्ट इच्छा, आणि देहाच्या भ्रष्ट वासना, यांना न अनुसरणें आणि यांच्या आधीन न होणें, ही दुसरी गोष्ट होय, यांपैकीं पहिली गोष्ट ख्रिस्ती धर्माच्या मतांबद्दलची आहे, आणि दुसरी गोष्ट नीतीच्या नियमांबद्दलची आहे. पहिली ख्रिस्ती मतांपुरतीच विशिष्ट आहे, आणि दुसरी सामान्य आणि सार्वत्रिक अशी आहे. पहिल्या बाबींत कुमारीला संतति होण्याचे आणि मेल्यावर जिवंत होण्याचें सांगितलेले अपूर्व शोध कोणाला मान्य होवोत किंवा न होवोत, परंतु दुष्ट कर्में, व्यर्थ डामडौल लोभिष्ट इच्छा आणि भ्रष्ट वासना यांचा त्याग करणें, ही गोष्ट या जागांतील प्रत्येक मनुष्याला मान्य असलीच पाहिजे. व बाप्तिस्म्याच्या संस्कारातील फक्त या दुसऱ्या कलमापुरतें पाहिलें असतां सर्व जग ख्रिस्ती आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं, बाप्तिस्म्याचें भट्टींतून ओढून निघाल्याशिवायही प्रत्येकाला बाप्तिस्म्याचें हें दुसरें कलम मान्य आहे. तेव्हां असल्या ह्या नीतीच्या सार्वत्रिक नियमाप्रमाणें मी वागेन, असें म्हटल्यानें जर कोणी मनुष्य ख्रिस्ती होत असेल, तर तो जितका ख्रिस्ती होतो, तितकाच तो हिंदु होतो, मुसलमान होतो, बौद्ध होतो, यहुदी होतो किंवा कान्फ्यूशसचा अनुयायी होतो, हें सर्वांनीं लक्षांत ठेविलें पाहिजे. कारण हीं नीतीचीं तत्त्वें या सर्व धर्मांना मान्य आहेतच.

तेव्हां या नैतिक नियमांप्रमाणें मी वागेन, असें कोणी वचन दिल्यास तो खिस्ती झाला, असें मानण्याचें कांहीं एक कारण नाहीं. आतां बाप्तिस्म्या-च्या करारांतील बाकी राहिलेलें कलम जें कुमारीला संतति होण्याचें आणि मेलेला देह उठण्याचें, त्याबद्दल कोणी कितीही वचनें दिलीं, तरी तीं त्याला कधींही बांधूं शकणार नाहींत. दोन आणि दोन तुम्हांपासून घेतलेले पांच रुपये मी तुम्हांस परत देईन, अशाबद्दल कोणी कितीही वचनें दिलीं, तरी त्याची फिर्याद कोर्टांत गेल्यास कोणतेंही कोर्ट सावकाराला पांच रुपयांचा निवाडा देणार नाहीं. व सशाचें शिंग माझ्या हाताला लागलें अशाबद्दल कोणी कितीही शपथा घेतल्या, तरी त्याच्या हाताला कांहीं एक इजा झालेली नाहीं असें आपण सर्वजण समजतों. तात्पर्य हें कीं, खोट्या वस्तूबद्दलचें अभिवचन हें अभिवचन नव्हें, व त्या अभिवचनानें कोणी बांधला जात नाहीं. एवंच, बाप्ति-स्म्याच्या वेळच्या अभिवचनांपैकीं एका अवस्तुमूलक आणि खिस्तीमतमात्र-विषयक अभिवचनांनीं कोणीही बांधला जाऊं शकत नाहीं आणि दुसऱ्या सद्व-स्तुमूलक आणि नीतिविषयक अभिवचनांनीं या जगांतील प्रत्येक इसम बाप्तिस्म्या वांचूनही बांधला गेलेला आहे. अशी वस्तुस्थिति असल्यामुळेंही खिस्ती लोकांच्या ह्या बाप्तिस्म्याच्या संस्काराला वैयर्थ्य प्राप्त होतें. ही गोष्ट जरी उघड आहे, आणि या कारणासाठीं जरी बाटलेलीं हिंदु मुलें खिस्ती झालीं आहेत, असें मानण्याचें प्रयोजन नाहीं तरी क्षणभर ती खिस्ती झालीं आहेत, असा आपण अभ्युपगम करूं. पण खिस्ती होणें म्हणजे काय? कुमारीला मुलगा झाला, आणि एक प्रेत मेलेलें उठलें हें मला कबूल आहे असला असंबद्ध प्रलाप एकदां तोंडावाटें काढला म्हणजे तो खिस्ती झाला असें मुळींच नाहीं. सैतानाचीं कर्मे, व्यर्थ डामडौल, लोभिष्ट इच्छा आणि भ्रष्ट वासना, यांचा त्याग यांचेंही वरील वेडगळ मताशीं जें साहचर्य पाहिजे तें आज कोठें दिसत आहे? खिस्ती धर्मांत पूर्वीं कित्येक पवित्र महात्मे होऊन गेलेले आहेत, व हल्लींही कोणी कोनाकोपऱ्यांत कदाचित् काल-क्रमणा करीत पडलेले असतील. परंतु सामान्यतः खिस्ती लोकांकडे पाहिलें तर काय दिसतें! सैतानाचीं दुष्ट कर्मे, जगाचा व्यर्थ डामडौल आणि देहाच्या भ्रष्ट वासना यांचा त्याग, कोणत्या खिस्त्यांनें केलेला आहे? आज जग जर भरलेलें असेल, तर सैतानाचीं दुष्ट कृत्यें करणाऱ्या, जगांतील

डामडौल मिरविणाऱ्या, आणि देहाच्या भ्रष्ट वासना पुरविणाऱ्या ख्रिस्त्यांनीं भरलेलें आहे. रामावताराच्यापूर्वी किंवा कृष्णजन्माच्या अगोदर जसा पृथ्वीला भार झालेला होता तसा भार जर हल्लीं पृथ्वीच्या दोन्ही गोलार्धांना आणि चारी खंडांना झालेला असला, तर तो सैतानाचीं कर्मे, जगाचा डामडौल, आणि देहाच्या वासना यांच्यामध्यें आकंठ निमग्न झालेल्या ख्रिस्ती लोकांचा झालेला आहे. सैतानी कर्मे, ऐहिक डामडौल आणि दैहिक वासना यांचा तूं त्याग करशील ना, असें प्रेस्बुतरानें हडसून खडसून विचारिलें असतां, व वयस्कांनीं स्वतः आणि बालकांनीं जामिनांकडून होय म्हणून तोंड भरून सांगितलें असतां, आजपर्यंत कोणत्या ख्रिस्त्यानें या गोष्टीचा त्याग केला आहे? १८५८ च्या जाहीरनाम्यांत व इतर प्रसंगीं दिलेली वचनें ख्रिस्ती लोकांकडून पाळलीं जात नाहींत, म्हणून आपण हिंदुस्थानांतील अनाभिज्ञ लोक ओरडत असतो; परंतु हीं वचनें न पाळण्याचें बाळकडू ख्रिस्ती लोकांना त्यांच्या बाल्यावस्थेमध्येंच पाजिलेलें असतें, हें आपल्याला माहीत नाहीं. देवापुढें दिलेलें वचन पाळीत नाहींत, ते मनुष्यांना दिलेलीं वचनें कितपत पाळणार, हें आपल्याला समजावयाला पाहिजे. सैतानी कर्मांचा वगैरे आम्ही त्याग करूं, अशा प्रकारच्या देवासमोर घेतलेल्या शपथेचा पदोपदीं भंग करून ज्यांची वचनभंगाची भीति पूर्णपणें उडून गेली आहे, ते मानवी व्यवहारामध्यें वचनभंगाची फारशी पर्वा करणार नाहींत हें अगदीं उघडच आहे: देवाला दिलेल्या वचनानुरूप कोणत्या ख्रिस्त्यानें आपलें वचन ठेविलें आहे? सैतानाच्या कर्मांचा ख्रिस्त्यांपैकीं कोणी त्याग केला आहे? असत्य भाषण, फसविणें, लुच्चेगिऱ्या, चोऱ्या, दरवडे, खून, रक्तपात, लढाया, राज्यापहार, इत्यादि गोष्टी हीं सैतानाचीं कृत्यें नव्हेत काय? आणि तीं कोणत्या ख्रिस्त्यानें वर्ज्य केलीं आहेत? खुद्द सेटनचेंच चरित्र पाहिलें, तर त्यानें कांहीं देवदूतांना देवाच्या विरुद्ध फितूर करून लढाईला नेलें व सापाचें रूप धरून ॲडम आणि ईव्ह यांना देवाच्या बागेतील ज्ञानाच्या वृक्षाचें फळ खाण्याविषयीं भुरळ पाडली, एवढेंच काय तें केलेलें आहे. परंतु त्या मानानें पाहिलें असतां, अर्वाचीन सैतानांचीं कृत्यें किती तरी भयंकर आहेत! पातकाच्या आद्युत्पादक सैतानाला पातकाच्या भावी वंशविस्ताराची कल्पनाही

नसली पाहिजे. त्या बिचाऱ्यानें कोणाचीं राज्यें घेतलीं नव्हतीं, कोणाचे घातपात केले नव्हते, कोणाशीं खोटे तह केले नव्हते, विषप्रयोग करण्याच्या इटलींतील पोपांप्रमाणें त्यानें निरानिराळ्या युक्त्या काढल्या नव्हत्या, स्पेन-मधील इन्क्विझिशनप्रमाणें त्यानें कोणावर जुलूम केले नव्हते, किंवा फ्रान्समधील जेसुइट लोकांप्रमाणें त्यानें कोणाला फसविलें नव्हतें. असें असून, तो तेवढा बिचारा पापाचा पुतळा ठरलेला आहे ! जगांतील डाम-डौल आणि वैभव व्यर्थ आहेत असें तोंडानें मात्र म्हणावयाचें; परंतु राज्यारोहणाची संधि आली असतां हिंदुस्थानच्या राजांना हुजऱ्याचें काम सांगून दिल्लीच्या मसनदीवर आरूढ होण्याची व हत्तीवरून मिरवत जाण्याची, आपली वासना कोणी अतृप्त दशेमध्यें ठेविली आहे काय ? किंवा ज्यांनीं हीं कृत्यें केलीं त्यांनीं स्वतः किंवा त्यांच्या जामिनांनीं जगांतील व्यर्थ डामडौलाचा त्याग करण्याचें अभिवचन दिलेलें नव्हतें कीं काय ? लोभिष्ट इच्छा कोणत्या खिरस्त्याच्या मनाला सुटलेल्या आहेत? आणि भ्रष्ट वास-नांनीं ज्यांचे देह विटाळले नाहींत असे खिरस्त्यामध्यें कोण महात्मे आहेत ? सारांश, सैतानाचीं कर्मे वगैरे दुष्ट गोष्टींचा तूं त्याग करशील ना ? असा प्रश्न विचारणारे प्रेस्बुतर आणि त्या प्रश्नाला होय म्हणणारे वयस्क किंवा बालकांना जामीन राहणारे धर्मबाप, यांपैकीं एकही जण हे नीतीचे नियम पाळीत असल्याचें दिसून येत नाहीं. असल्या लोकांना ख्रिस्ती कसले म्हणावयाचें ? आणि ज्या मुलांच्या डोक्यावर पाणी शिंपडलें जातें आणि जीं पुढें असलीं वचनविरुद्ध नीच कृत्यें करण्यासाठींच मोठीं व्हावयाचीं, तीं तरी कसलीं ख्रिस्ती झालेलीं आहेत म्हणून समजावयाचें ?

सारांश, मागील व या लेखांत दिलेल्या एकंदर गोष्टींवरून कोणाच्याही हें लक्षांत येईल कीं, ख्रिस्ती लोकांचा बाप्तिस्म्याचा संस्कार हें एक निराधार आणि वैगुण्ययुक्त असें थोतांड आहे, व परधर्मीयांच्या दृष्टीनें तर त्या संस्काराला कांहींच किंमत नाहीं, आणि त्यामुळें असल्या संस्का-रानें बाटलेले लोक हे बाटले आहेत असें मुळींच होत नाहीं, व त्यांतून आपलें स्वतःचें वर्तन शास्त्रशुद्ध न ठेवणारे जामीन आपल्याकरितां जें वचन देतात, त्यांतील एक अक्षरही समजण्याची ज्यांना अज्ञान अवस्थेमुळें योग्यता नसते, अशीं बालकें भाडोत्री लोकांच्या वचनांनीं तर मुळींच बांधलीं जाणार

नाहींत, हें अगदीं उघड आहे. तर मग आतां ह्या बाप्तिस्म्याच्या द्वारानें लहानमोठीं माणसें आपल्या कळपांत ओढून हे ख्रिस्ती लोक करतात तरी काय, असा एक प्रश्न पुढें उभा रहातो. पण याचें उत्तर एवढेंच आहे कीं, ख्रिस्ती लोकांचा जमाव ही एक प्रकारची संघशक्ति आहे. आणि ती संघशक्ति वाढविण्याचा हा एक उपाय आहे. हिंदुधर्माची संघशक्ति वाढविण्यासाठीं आईबापच खटपट करीत असतात. परंतु ख्रिस्ती धर्माच्या संघशक्तीच्या वाढीसाठीं आईबाप आणि मिशनरी असे दोघेही खटपट करतात. असें या चळवळीचें निवळ व्यावहारिक स्वरूप असल्यामुळें आपण वेंडगळपणानें त्याला बाटणें, धर्मभ्रष्ट होणें वगैरे शब्द लावणें बरोबर नाहीं. अलीकडे पुष्कळ प्रकारच्या गुप्त मंडळ्या निघालेल्या आहेत. त्यांतलिच ख्रिस्ती धर्म ही एक उघडपणाची गुप्त मंडळी आहे. गुप्त मंडळी (Secret society) हा शब्द युरोपियन वाङ्मयामध्यें आणि इतिहासामध्यें कांहीं विशिष्ट अर्थानें प्रयोजिला जातो. परंतु आपल्याला तसें करण्याचें कांहीं कारण आहे, असें नाहीं. जरा जास्त स्थूल दृष्टीनें पाहिलें असतां अपाल्याला असें आढळून येईल कीं, आपल्या इकडेही पुष्कळ गुप्त मंडळ्या आहेत. पोलिस हें एक गुप्त मंडळीचें उघडें उदाहरण होय. सरकार हा सुद्धां एक प्रकारची गुप्त मंडळीच म्हटली असतां हरकत नाहीं. इंग्लंड वगैरे सारख्या ठिकाणीं सर्व लोकांच्या प्रतिनिधींच्या सल्ल्यानें राज्यकारभार चालतो, तेथील सरकारला सर्वांशीं गुप्त मंडळी हा शब्द जरी लागू पडला नाहीं, तरी त्या ठिकाणीं या शब्दाचा अंशतः उपयोग करण्याला कांहीं हरकत नाहीं. ह्या जशा अनेक मंडळ्या आहेत तशीच ख्रिस्ती धर्म ही एक मंडळी होय. निरनिराळे क्लब असतात, त्यांतलाच ख्रिस्ती धर्म हा एक क्लब आहे. एका क्लबांतून दुसऱ्या क्लबांत एखादा जाणता मनुष्य गेला तर त्यालासुद्धां आपण "बाटला" हा शब्द लावीत नाहीं. मग एका क्लबांतील एखाद्या मनुष्याच्या लहान मुलाला दुसऱ्या क्लबांतील एखाद्या भामट्यानें अगर उचल्यानें चोरून किंवा फूस लावून नेलें तर त्या मुलाला आपण "बाटला" हा शब्द काय म्हणून लावावा? एखाद्या प्रौढ मनुष्याला आपल्या हिंदु धर्माचीं तत्त्वें उत्कृष्ट वाटल्यास त्यालाही आपल्यांत ओढण्याला जेथें दरवाजा उघडा असावा, तेथें ज्यांना हिंदुधर्म किंवा ख्रिस्ती धर्म कशाशीं खावा हेंसुद्धां समजत नाहीं

अशा अर्भकांना आपण आपल्या संघामधून विनाकारण वगळून ठेवणें हें कधींही बरोबर होणार नाहीं. बाप्तिस्मा म्हणजे ख्रिस्ती धर्माची संघशक्ति वाढविण्याची एक ऐहिक युक्ति होय, हें जें आम्ही वर सांगितलें आहे, त्याला खुद्द बाप्तिस्म्याच्या अनुष्ठानामध्यें सुद्धां स्पष्ट पुरावा आहे. कारण, अनुष्ठानाच्या आरंभींच आदित्यवारीं बाप्तिस्मा कां करावा, याचा उद्देश सांगताना असें म्हटलें आहे कीं, "मुलांचा बाप्तिस्मा होऊन त्यांस ख्रिस्तीच्या एक्लेसियेच्या संख्येंत घेतलें अशी जमलेल्या मंडळीनें साक्ष द्यावी." याप्रमाणें आपल्या धर्मानुयायांच्या संख्येंत इतरांना ओढून घेऊन ती संख्या वाढविण्याचा जेथें केवळ ऐहिक हेतु आहे, तेथें तो सफळ होऊं न देतां आपल्या हिंदुधर्माची संघशक्ति वाढली नाहीं, तर निदान आहे तितकी कायम तरी ठेवणें, हें आपलें एक महत्त्वाचें कर्तव्यकर्म आहे.

ख्रिस्ती धर्मांतील बाप्तिस्म्याचा विधि हा कसा आहे, याच्याविषयीं चर्चा करण्याचें वास्तविक आम्हांला कांहीं कारण नाहीं. परंतु ख्रिस्ती लोक अज्ञानाच्या काळोखांत आमच्या कळपांतील कोंकरावर आपल्या संस्काराचें पंजे टाकतात, त्यामुळें त्यांच्या या संस्काराचें अंतर्बाह्य सत्य स्वरूप लोकांपुढें आविष्कृत करणें जरूर पडतें. आणि म्हणूनच आमच्या मुलांच्या संरक्षणाकरितां, त्यांच्या संस्काराच्या परीक्षणाकरितां नव्हे, आम्हाला हें प्रस्तुतचें परीक्षण करणें जरूर झालेलें आहे. व या परीक्षणावरून त्याच्या पाणी शिंपडण्यामुळें, किंवा क्रुसाच्या आकृतीमुळें किंवा अज्ञानावस्थेंतील अभिवचनामुळें अज्ञान मुलांवर पतितत्वाचा दोष येतो असें बिलकूल होत नाहीं, हें सिद्ध होत आहे. अशी अज्ञान मुलांच्या संबंधानें स्थिति आहे. हिच्याकडे आपल्या समाजाचें लक्ष लागणें जरूर आहे. परंतु समाजाच्या अध्वर्यूंनीं आणि धर्मगुरूंनीं या प्रश्नाकडे आपलें विशेष लक्ष पोंहचविलें पाहिजे. हा फक्त धर्माचाच प्रश्न नसून राष्ट्रीयत्वाचा आणि राष्ट्राच्या जिवंतपणाच्या प्रश्न आहे. आणि आपलें राष्ट्र हल्लीं इतक्या हीन दशेला जात चाललें आहे कीं, त्याला प्रत्येक मनुष्याच्या मदतीची आवश्यकता आहे. जो कॉंग्रेसमध्यें सरकारच्या विरुद्ध बोलतो, आणि कायदे कौन्सिलमध्यें 'My Lord' असें म्हणून सरकाराला आळवितो, तोच फक्त राष्ट्राची उन्नति करीत असतो असें नाहीं. तर आपला देश उन्नत करण्याचें प्रत्येक धंद्याच्या आणि व्यवसायाच्या माणसाच्या हातांत आहे, शंकरा-

चार्यांसारख्या धर्मगुरूंच्या हातांमध्यें तर ही गोष्ट अतिशयच आहे. त्यांचें लक्ष या विषयाकडे गेल्यास पुष्कळ फायदा होईल.

---

# दोन महत्त्वाकांक्षा : : : ११

आशावादी आणि निराशावादी असे दोन पक्ष हल्लीं आपल्यामध्यें झालेले आहेत. ह्यांपैकीं दुसऱ्यापक्षांतील लोक निराशावादी बनण्याला सद्यःस्थितीमध्यें पुष्कळ कारणें आहेत, यांत शंका नाहीं. परंतु त्याच स्थितीमध्यें कित्येक लोकांना आशावादी कसें बनतां येतें, हा मात्र एक मोठा आश्चर्यकारक प्रश्न आहे. हा प्रश्न पुष्कळांच्या मनांत उत्पन्न होत असेल, परंतु याचें समाधानकारक उत्तर फारच थोड्यांना सांपडलें असेल. हें उत्तर शोधण्यासाठीं धडपडत असून ज्यांना तें अद्यापि सांपडलें नाहीं, अशा लोकांना पुढील संवादामध्यें एक प्रकारचा चित्ताकर्षकपणा आढळल्यावांचून राहणार नाहीं. हा संवाद एक आशावादी आणि एक निराशावादी अशा दोन मनुष्यांमध्यें खरोखर घडून आलेला आहे.

निराशावादीः–( एका आशावादी स्नेह्याला उद्देशून ) तुम्ही मोठे भाग्यवान् आहां ! तुम्ही पूर्वी कांहींतरी मोठी पुण्याई केली असली पाहिजे, म्हणून तुम्हाला नेहमीं आशा वाटत असून, तुमचा सर्व काळ आनंदांत जातो. मलाही तुमच्यासारखें व्हावेंसें वाटतें. तेव्हां तुम्ही सध्यांच्यासारख्या हिंदुस्थानच्या स्थितीमध्यें इतके आशावादी कसे बनलां, हें मला सांगा.

आशावादीः–मी आशावादी कसा बनलों, हें तुम्हांला सांगतों. पण प्रथमतः तुम्ही निराशावादी कसे बनला, हें मला सांगा.

निराशावादीः–ठीक आहे. ऐका. मला जेव्हां थोडेंबहुत समजूं लागलें तेव्हां इतर पुस्तकांपेक्षां इतिहासाच्या पुस्तकाकडे माझें लक्ष जास्त लागलें. हिंदुस्थानचा इतिहास वांचून आणि सद्यःस्थितीचे पडताळे पाहून आपल्या देशाच्या आणि देशबांधवांच्या निकृष्ट राजकीय स्थितीचें ज्ञान मला होऊं लागलें व ही आपली दुःस्थिती नाहींशी झाली पाहिजे, असें मला वाटूं लागलें. ह्यानंतर ह्या दुःस्थितीच्या नाशासाठीं कोणी कांहीं प्रयत्न चालविले आहेत, किंवा या कामीं मीच पहिला प्रयत्न करणारा आहे, या प्रश्नाकडे साहजिकपणेंच माझें मन वळलें आणि मी तपास करूं लागलों;तों याबाबतींत प्रयत्न करणारांच्या झुंडीच्या झुंडी माझ्या दृष्टीस पडल्या. तेव्हां त्यांच्या प्रयत्नांचें, प्रयत्नांच्या हेतूंचें आणि त्या हेतूंच्या सफलतेचें मी पृथक्करण करूं लागलों. पण या पृथक्करणांत जसजसा मी पुढें जाऊं लागलों, तसतशी माझी निराशा जास्त जास्त वाढूं लागली. आपला देश दुसऱ्यांच्या ताब्यांत गेलेला, आपण सर्वस्वी परतंत्र झालेले, आपले देशबांधव दुष्काळानें मरत असलेले, आपली सुवर्णमय जन्मभूमी कंगाल झालेली, आपले व्यापारधंदे बुडालेले आणि असें असून आपले बहुतेक लोक स्वस्थितीबद्दल अज्ञानी अथवा बेफिकीर दिसत असलेले, अशी आपल्या देशाची एकंदर स्थिती असतां, ती स्थिती नष्ट करण्यासाठीं म्हणून जे प्रयत्न आरंभिलेले माझ्या दृष्टीस पडले, ते पाहून 'डोंगराला दुखणें आणि शिंपींत औषध' ही जुनी म्हण वारंवार माझ्या मनामध्यें येऊं लागली. जे स्वदेशोन्नतीसाठीं प्रयत्न करणारे होते, त्यांच्यापासून स्वदेशोन्नतीच्या दृढतर इच्छेचा संचार माझ्या मनामध्यें झाला. परतु त्यांच्या प्रयत्नांनीं माझें समाधान न होतां, उलट असमाधान मात्र जास्त वाढत गेलें. हिंदुस्थानासंबंधानें जो अंतिम इष्ट हेतु त्यांच्या

दृष्टीनें पाहिलें असतां, एकाही प्रयत्नामध्यें मला हंशील वाटेनासें झालें. हिमालयासारखा उंच पर्वत चढून जावयाचा आणि मुंगीसारख्या आमच्या उड्या, सात समुद्र ओलांडून जावयाचें आणि लहान मुलांना खेळण्याकरितां कागदाचीं गलबतें करून देतात तसलें गलबत हें आमचें साधन; अशी स्थिति पाहून सर्व प्रचलित प्रयत्नांवरून माझा विश्वास उडाला. ह्यांत काय आहे, त्यांत काय आहे, ह्यापासून काय व्हावयाचें आहे, अशा सत्यानुसारी विचारसरणीनें ज्या त्या गोष्टींतील क्षुद्रपणा आणि क्षुल्लकपणा मला ढळढळीत दिसूं लागला. अशा प्रयत्नांपासून देशस्थिति आपल्याला पाहिजे तशी सुधारेल, अशी बिलकूल आशा उरली नाहीं. आशेचा उजेड कोठेंहि दृग्गोचर होईना. प्रत्येक प्रयत्नावर निराशेचा शिक्का मारलेला मला दिसूं लागला, समजूं लागल्यापासून देशोन्नति हा एकच भव्य हेतु माझ्या डोळ्यांपुढें होता. त्याच्याशिवाय जगांत मला दुसरी कांहींच गोष्ट दिसत नव्हती. परंतु तो हेतु सफळ होण्याची कांहींएक चिन्हें न दिसल्यामुळें, माझें मन निराशेनें सर्व बाबतींतच व्याप्त होऊन गेलें व त्यामुळें देशोन्नतीचा हेतु तर लांबच राहिला, परंतु या जगांतील लोकयात्राही मला दुर्वह झाली. जें करावयाला पाहिजे आहे, तें करितां येत नाहीं आणि जें करतां येतें, तें करावयाला नको आहे, अशा विलक्षण स्थितीमुळें एक प्रकारची कर्तव्यशून्यता उत्पन्न झाली आहे. परंतु कर्तव्यशून्य असणें आणि जिवंत राहणें, या गोष्टी फार दुर्घट आहेत. अशा उदास स्थितमध्यें तुमच्याकडे पाहिलें म्हणजे तुमच्या स्थितीबद्दल माझ्या मनामध्यें मोठा हेवा उत्पन्न होतो. थोडे दिवसांपूर्वी मी तुम्हांला एकदां पाहिलें; तेव्हां तर तुम्ही या पृथ्वीवरील नंदनवनांतील प्रत्यक्ष इंद्रच आहां असें मला वाटलें ! तेव्हां तुम्ही म्युनिसिपल इलेक्शनच्या गडबडींत होता. तो त्या वेळचा तुमचा उल्हास पाहून मला किती आनंद झाला म्हणून सांगू ! मत देणारांकडे दररोजच्या टपालानें तुमच्याकडून चाललेलीं पत्रांवर पत्रें, तुमच्या त्या एका मतासाठीं पन्नास भिडा, तुमचा तो प्रॉक्झी घेण्याचा समारंभ, तुमच्या बगलेंतील त्या पैशाच्या पिशव्या आणि ते ऑनररी मॅजिस्ट्रेट, तुमच्यासाठीं शेंकडों मित्रांची ती धांदल, आणि प्रत्येक गाडीवर तुमच्या नांवाचा तो विजयध्वज, ही सगळी एवढी मोठी जंगी तयारी पाहून तुम्ही आज इंग्लिशांपासून हिंदु-

स्थान परत घेण्याच्या तयारींत आहां असा मला भास झाला! व ह्रा पुरुष मोठा भाग्यवान् आहे असे उद्गार माझ्या तोंडांतून निघाले! अप्राप्य महत्वाकांक्षेच्या निराशेमुळें माझें झालेलें शून्य हृदय आणि पाण्याच्या बुडबुड्याच्या मौक्तिकप्राप्तीनें उल्हसित आणि आनंदित झालेलें तुमचें मन, यांची तुलना करून पाहतां तुम्ही फार सुखी आहां असें माझ्या मनानें घेतलें. तेव्हां आपला हिंदुस्थान देश इतक्या विपन्न अवस्थेमध्यें असतांही तुम्ही इतके आनंदी कसे असूं शकतां व यांतील रहस्य काय आहे, हें आपण कृपा करून मला सांगा.

आशावादीः—तुमच्या मानसिक स्थितीचें मला फार हसूं येतें. तुम्ही आपल्या मनाच्या ज्या कल्पना करून घेतल्या आहेत, त्या अगदीं चुकीच्या आहेत. देशस्थिति तुह्मांलाच तेवढी समजते व आम्हांला समजत नाहीं, असें मुळींच नाहीं. मी तुमच्यापेक्षां विद्वत्तेच्या बाबतींत किती श्रेष्ठ आहे, आणि माझ्यापेक्षांही कितीतरी जास्त विद्वान असे लोक अशावादी बनलेले आहेत, त्यांना काय देशस्थिति समजत नाहीं? आणि ती सारी तुम्हांलाच समजते? तुम्ही प्रथमतः भलत्याच कल्पनांनीं आपलें डोकें त्रासवून घेतां. तुम्ही म्हणतां आपला देश परतंत्र आहे. पण ह्यांत काय आहे? कोणता देश परतंत्र नव्हता? देश म्हटला म्हणजे तो केव्हांतरी परतंत्र असावयाचाच. खुद्द इंग्लंड हा देशसुद्धां एकदां परतंत्र होता. पण देश परतंत्र असला म्हणून त्यांत तुमचें काय अडत आहे? परतंत्र देशांत तुम्ही चिरुटाला काडी लाविली तर त्यांतून धूर निघत नाहीं, किंवा ऊन्हून पोळीवर तूप घातलें तर तें वितळत नाहीं, असें कांहीं झालें आहे काय? मी बरेच मुलुख पाहिले आहेत, आणि त्यांवरून तुम्हांला सांगतों कीं, स्वतंत्र देशांत जसा पाऊस पडतो, तसाच तो परतंत्र देशामध्येंही पडतो. मग तुमचा देश परतंत्र असला म्हणून तुमचें काय बिघडत आहे? एक मनुष्य हा आपल्या घराचा मालक आहे. त्यानें आपल्या घरापुरतें पहावें. त्याला तेवढ्यापुरती स्वतंत्रता असली, म्हणजे त्याचें काम भागलें. सगळा देश हें कांहीं त्या एकट्या मनुष्याचें घर नव्हे. तेव्हां जें त्याचें नव्हे, त्याबद्दल त्यानें उठाठेव करीत बसण्याचें कांहीं कारण नाहीं. शिवाय दुसरी गोष्ट अशी कीं, प्रत्येक मनुष्याची आशा नियमित असली पाहिजे. थोडकी अशा धरणें आणि ती सफळ

करून घेणें, यामध्येंच सर्व समाधानाचें बीज असतें. आणि अशक्य महत्त्वाकांक्षा हें तुमच्या निराशेचें कारण आहे. मी आपल्या महत्त्वाकांक्षांत अगदीं नेमस्तपणा ठेवितों आणि त्यामुळें मी नेहमीं आनंदवृत्तीमध्यें असतों. जेवढें आज शक्य किंवा मोकळें असेल, तेवढीच माझी महत्त्वाकांक्षा.जें सुलभ असेल,तें दीर्घ प्रयत्नानें मी मिळवितो.आणि म्हणूनच माझी चोहोंकडे वाखाणणी होते. जी महत्त्वाकांक्षा बाळगावी, ती परिपूर्ण झाली म्हणजे मनाला समाधान होतें,असा मनाचा धर्म आहे. म्हणून ज्याला समाधान पाहिजे असेल त्यानें पूर्ण होणारीच महत्त्वाकांक्षा आपल्या करितां निवडून घ्यावी.महत्त्वाकांक्षा अशक्य पत्करून, उदास व शून्यहृदय होण्यापेक्षां अल्पस्वरूप महत्त्वाकांक्षेमध्यें यशस्वी होऊन आनंदीवृत्तीमध्यें कालक्रमणा करणें, हेंच जास्त फायदेशीर होय.सगळ्या देशाची काळजी करण्याला आपण एक व्यक्ति कोण ? तशानें धड देशाचेंही कल्याण होत नाहीं आणि धड व्यक्तीचेंही हित साधत नाहीं; तेव्हां दोन्हीं कामें बिघडून टाकण्यापेक्षां आपलें व्यक्तीचें हित तरी चांगलें साधावें हें जास्त शहाणपणाचें नाहीं काय ? शिवाय, मोठी महत्त्वाकांक्षा बाळगण्याला मोठींच माणसें पाहिजेत. सगळ्या हिंदुस्थान देशाला एकट्यानें आळा घालण्याला आपण कोण सीझर आहों, किंवा वाशिंग्टन आहों, किंवा शिवाजी आहों, किंवा नेपोलियन आहों ? आपल्याला इलेक्शनमध्यें जय मिळविणें, कोर्टामध्यें भांडणें, युनिव्हर्सिटींत परीक्षा देणें, ऑफिसांत चाकरी धरणें, वृद्धापकाळींही पुनर्विवाह करणें, सभांत अर्ज करणें, कौन्सिलांत भाषण करणें, कॉंग्रेसमध्यें ठराव करणें आणि रात्रींच्या प्रहरीं चुगल्या सांगून आल्यानंतर झोंप घेणें याच महत्त्वाकांक्षा योग्य आहेत. एवढीच मी दृष्टी ठेवतों. आणि अशी संकुचित दृष्टी ठेविल्यामुळें मला समाधान होतें. शिवाय दुसरी गोष्ट अशी आहे कीं, आपल्या प्रस्तुतच्या स्थितीला याच महत्त्वाकांक्षा योग्य आहेत. या अल्पस्वल्प महत्त्वाकांक्षांच्या चक्रव्यूहांतून जर आपले लोक सदोदित गुरफटून राहिले नाहींत, तर त्यांच्या मनाची काय भयंकर स्थिति होईल,याची तुम्ही कल्पना करा. सर्व लोक जर अशक्य महत्त्वाकांक्षांच्या नादीं लागून तुमच्यासारखे निराश आणि शून्यहृदय झाले, तर आपल्या ह्या हिंदुस्थानामध्यें केवढें रखरखीत अरण्य उत्पन्न होईल, याची तुम्हांला कल्पना नाहीं. जो तो नैराश्यवादी, कर्तव्यशून्य आणि उदासवृत्ति झाला,

तर हा व्यवहार कसा चालेल? अज्ञान आणि आशा हें या जगांतील सर्व व्यवहारांचें मूळ आहे. मायेनें सर्व जग चाललें आहे, असें वेदांती म्हणतात त्यांतीलही भावार्थ हाच आहे. या मायेची भुरळ जोंपर्यंत अव्याहत आहे, तोंपर्यंत संसारही अप्रबाधित चालूं शकतो. ज्या दिवशीं ही भुरळ नाहींशीं होईल, त्या दिवशीं सर्वच लोक निराशवादी, मुक्त किंवा वृक्षपाषाणतुल्य बनतील, यांत शंका नाहीं. परंतु तसें जोपर्यंत होत नाहीं, तोंपर्यंत स्वप्रमाणानुरूप अल्पस्वल्प अशा आशांच्या जाळ्यांमध्यें प्रत्येक प्राण्यानें गुरफटून राहिलें पाहिजे; म्हणजे त्यांतच त्याचें सुख आहे. परंतु हें ईश्वरी तत्त्व न समजतां भलत्याच महत्त्वाकांक्षेनें जो निराश बनत असतो, तो आपलें सुख देऊन आपल्याकरितां अक्षय दुःख विकत घेत असतो. अंतःकरणाच्या क्षितिजावर अशक्य महत्त्वाकांक्षेमुळें आशेचे किरण कधींही न दिसणें, ही फार भयंकर स्थिति आहे. ईश्वराचा ज्याच्यावर क्षोभ होतो, त्याला भयंकर शासन आणि असह्य यातना देण्याकरितां परमेश्वर प्रथम त्याला अशक्य महत्त्वाकांक्षा देतो; आणि नंतर तज्जन्य निराशेच्या दुःखांनीं त्याचें मन व्याकुळ होऊन जेथें सुंदर आणि रमणीय उद्यान उगवलें असतें, अशा त्याच्या अंतःकरणभूमिकेमध्यें कंटकमय चोथ्याची वाढ सुरू होते. माया हें दुःख आहे खरें; परंतु त्याच मायेमध्यें सुख वास करीत असतें, हें विसरतां कामा नये. माया हेंच या व्यावहारिक सुखाचें अधिष्ठान आहे. ह्यांत काय आहे, त्यांत काय आहे, अशा प्रकारच्या विचारांनीं त्या मायेचा पडदा फाडून टाकिल्यानंतर मग तेथें सुख कोठून उत्पन्न होणार? वेल उपटून टाकून तिजवरील फुलांची अपेक्षा धरणें आणि मायेचा विच्छेद करून सुखाची आशा धरणें या दोन्ही गोष्टी कधींच शक्य नाहींत. सुखप्राप्तीसाठीं खोट्या ज्ञानाचा अध्यास हा अवश्यच आहे. एखाद्या नाटकांतील एखाद्या स्त्रीपात्राच्या सोंगापासून आणि अभिनयापासून जर आपल्याला आनंद व्हावयाला पाहिजे असेल, तर ही स्त्री आहे, हें मिथ्या ज्ञान आपण दृढपणें कायम राखिलें पाहिजे. ह्यांत काय आहे, हें सोंग आहे, हा मूळचा पुरुष आहे, हे केंस आणि रंग नैसर्गिक नसून लावलेले आहेत वगैरे ज्ञानें जरी सत्य असलीं, तरी तीं सुखोत्पत्तीला विघातक अशींच आहेत. याकरितां प्रत्येक वस्तूवर आणि व्यवहारावर, मग तो

व्यवहार राजकीय असो, किंवा दुसऱ्या कोणत्या तऱ्हेचा असो, जें एक प्रकारचें अज्ञानाचें आणि मायेचें आवरण असतें, तें काढून टाकण्यांत अर्थ नाहीं. जगांतील निम्याहून अधिक सुख ह्या अज्ञानाच्या आवरणामध्यें गुरफटून राहिलेलें आहे. व जो कोणी हें मायेचें आवरण दूर करतो तो जगांतील निम्याहून अधिक सुख नाहींसें करितो. ह्याकरितां ह्यांत काय आहे, त्यांत काय आहे, ह्यापासून काय व्हावयाचें आहे, त्यापासून काय व्हावयाचें आहे अशा प्रकारची जी एक विघातक विचिकित्सेची मनाला संवय लागते ती स्वतःच्या किंवा जगाच्या हिताला कारणीभूत होत नाहीं आणि म्हणूनच असाध्य महत्त्वाकांक्षा सोडून देऊन अल्प महत्त्वाकांक्षेच्या सिद्धिनें मनाचें समाधान करून घ्यावें हेंच समाधानवृत्तीचें बीज होय. शिवाय योग्य वेळेच्या पूर्वी भलतीच अशक्य महत्त्वाकांक्षा धारण करणें हा राजकीय दृष्ट्या गुन्हा आहे. चांगली आणि मोठी महत्त्वाकांक्षा मनांत बाळगून तदनुरूप प्रयत्न करणें यांत काय गुन्हा आहे असें कदाचित् कोणाला वाटेल. परंतु सगळे लोक, शहाणे शहाणे लोक, मोठे मोठे लोक, वजनदार, ऐपतदार आणि इभ्रतदार लोक अल्प महत्त्वाकांक्षामध्यें निमग्न झाले असतां एखाद्यानेंच दुर्घट महत्त्वाकांक्षेवर आपलें मन बसवावें हा एक गुन्हा नव्हे, सात गुन्हे आहेत. सगळ्या समाजाला सोडून एकाच व्यक्तिला दुसरीकडे जाण्याचा बिलकुल अधिकार नाहीं. व असा जर कोणी भलत्या वाटेला जात असेल तर ती वाट कितीही चांगली असली तरी त्याला मागे ओढण्याचा समाजाला प्रत्येक अधिकार आहे. जेव्हां अशा दुर्घट महत्त्वाकांक्षा बाळगण्याची वेळ येईल तेव्हां आम्हांलाही त्या बाळगितां येणार नाहींत कीं काय? पहाटेच्या आधीं कोंबड्याची ओरड आणि वसंत ऋतूच्या आधीं कोकिलांचा कलकलाट ज्याप्रमाणें अस्थानीं होय त्याप्रमाणे तुमच्या ह्या अशक्य महत्त्वाकांक्षांच्या ओरडीची स्थिति आहे. ज्या गोष्टीला अजून पांचशेंहूनही अधिक वर्षें अवकाश आहे, तिच्याबद्दलची महत्त्वाकांक्षा आज बाळगणें हें सर्वथैव गैर आहे. हल्लीं अल्प महत्त्वाकांक्षांचाच समय आहे, म्हणून आम्ही अल्प महत्त्वाकांक्षांतच सुख मानून रहात आहों. ज्या वेळीं मोठ्या महत्त्वाकांक्षांचा दिवस येईल, त्या वेळीं आम्ही त्याही महत्त्वाकांक्षांच्या गोष्टी बोलूं. कालाचा नदीप्रमाणेंच एक ओघ आहे. त्या ओघाबरोबर सुलभ रीतीनें तरंगत जाणारे

जे लोक असतात तें सुख पावतात. तुम्ही ह्या ओघाच्या विरुद्ध पोहूं पाहतां. त्यामुळें तुम्ही श्रमाला आणि दुःखाला पात्र होतां. पण हें बरोबर नाहीं. जसा ओघ बदलले, त्याप्रमाणें त्या ओघाबरोबरच आपण वहात गेलें पाहिजे. परंतु तशी बुद्धि न होतां त्या ओघाच्या उलट आपण पोहत जाऊं, अशी जी तुम्हांला बुद्धि होते, तें तुमच्या पूर्वजन्मांतर्गत पातकांचें द्योतक आहे. तुमच्या मनांत जी महत्त्वाकांक्षा आहे, त्याप्रमाणें जर परमेश्वराला गोष्टी घडवून आणावयाच्या असत्या, तर त्यानें तीच महत्त्वाकांक्षा सर्व लोकांच्या मनामध्यें निर्माण केली असती; परंतु तसें कांहीं एक न करितां फक्त तुमच्याच मनामध्यें परमेश्वर असाध्य महत्त्वाकांक्षा उत्पन्न करितो आणि त्या महत्त्वाकांक्षा परिपूरित करण्याचें योग्य साधन तुमच्या हातांत देत नाहीं, यावरून तुमच्या पातकांबद्दल तुम्हांला शासन करण्याकरितां देवानें हा यातनादानाचा एक नवीन राजकीय उपाय योजिलेला असला पाहिजे, असें उघड होत नाहीं काय ? योग्य वेळ येईल, तेव्हां परमेश्वर सगळयांच्या मनांतच मोठया महत्त्वाकांक्षांची प्रेरणा करील. तोंपर्यंत आपण अल्प महत्त्वाकांक्षांमध्येंच समाधान मानलें पाहिजे. आणि याच तत्त्वावर मी चालतों. अल्प महत्त्वाकांक्षा हें माझ्या सुखाचें बीज आहे.

निराशावादीः—तुमचें भाषण मी ऐकिलें, व अल्प महत्त्वाकांक्षा हें, जें तुम्ही आपल्या सुखाचें बीज सांगितलें तेंही मला समजलें. परंतु तसल्या सुखांत मला कांहीं अर्थ दिसत नाहीं. तें खरें सुख नव्हे. तुमचा आनंद पाहून त्या आनंदाकडे माझ्या मनानें ओढ घेतली खरी, परंतु हें त्या आनंदाचें पृथक्करण तुमच्या तोंडून ऐकिल्यापासून मला तो तुमचा आनंद तुच्छ वाटूं लागला आहे. हें तुम्ही सांगितलेलें किड्यांचें तत्त्वज्ञान मला नको. असल्या आनंदापेक्षां माझें दुःखच मला जास्त प्रियकर आहे ! कारण त्यांत निदान नैतिक अधःपतन तरी नाहीं. ह्या तुमच्या आनंदाच्या तुलनेनें माझ्या दुःखामध्यें किती आनंद भरलेला आहे, याची कल्पना मला आली ! व याबद्दल तुमचे माझ्यावर उपकार आहेत. सगळयांच्या मनांत क्षुद्र महत्त्वाकांक्षा असतां एखाद्याच्या मनांत मोठी महत्त्वाकांक्षा येणें, हा बिलकुल गुन्हा नव्हे. कोठें तरी प्रारंभ झाल्यावांचून बाकीच्यांच्या मनांत तरी असल्या महत्त्वाकांक्षा कोठून उद्भवणार ? एखाद्याच्याच मनामध्यें परमेश्वर असल्या

महत्त्वाकांक्षा घालतो. त्या त्याला दुःख देण्यासाठीं तो घालतो, ही तुमची कोटीही चुकीची असून तें मोठया महत्त्वाकांक्षेचें देवाच्या हातचें पहिलें आणि पवित्र बीजारोपण होय. त्या बीजापासून पुढें सर्वांच्या अंतःकरणांमध्यें मोठया महत्त्वाकांक्षांचे मोठाले वृक्ष वाढावयाचे आहेत, असाच ईश्वराचा यांत संकल्प असला पाहिजे.

---